# माझें चिंतन



लेखक

डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे

एम्. ए., पीएच्. डी.

मराठीचे प्राध्यापक, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें.

# अनुक्रमणिका






प्रथमावृत्ति : सन १९५५

: मुद्रक :

न. शं. कुलकर्णी, एस्. टी. सी., टी. डी.,

टीचर्स प्रिंटिंग प्रेस,

७७ शनिवार पेठ, पुणें २ करितां.

: प्रकाशक :

न. शं कुलकर्णी, एस्. टी. सी., टी. डी.,

दी टीचर्स आयडियल पब्लिशिंग हाउस लि.,

७७ शनिवार पेठ, पुणें २ करितां.

# माझें चिंतन

## १. सरस्वतीची हेळस

### समर्थांच्या वाङ्मयांत

समर्थ रामदासस्वामींच्या कार्याची आतां मराठी पंडितांनीं खूप चिकित्सा केली आहे. त्या चिकित्सेंत कितीहि भिन्न मतें प्रगट झालीं असलीं, तरी सतराव्या शतकांत महाराष्ट्रांत झालेल्या क्रांतीच्या श्रेयांत समर्थ अंशभागी होते याबद्दल दुमत नाहीं. क्रांतिपूर्व जागृति घडवून आणण्यासाठीं समर्थ स्वतः व त्यांचे शिष्य हे सर्व हिंदुस्थानभर वणवण भटकत होते व आपल्या वाणीनें लोकांना त्यांच्या परिस्थितीची जाणीव करून देत होते. क्रांतीला संघटित सामर्थ्याची फार आवश्यकता असते. समर्थांनीं या भूमींत शेंकडों मठ स्थापन करून त्या दृष्टीनें सिद्धता करून ठेविलीच होती. पण समर्थांचें खरें कार्य याहून निराळें आहे. त्यांच्यापूर्वीं महाराष्ट्रांत निवृत्तिमार्गाचें प्राबल्य फार होतें. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ इत्यादि संतमंडळींनीं संसारविमुखतेचा तीनशें वर्षें उपदेश करून लोकांच्या मनांतील राजसगुणी ऐहिक आकांक्षा उच्छिन्न करून टाकल्या होत्या. ऐहिक प्रपंचाविषयीं, या भूमीच्या उत्कर्षापकर्षाविषयीं लोक उदासीन होऊन बसले होते. परमार्थांतील विश्वकुटुंबवाद ऐहिकांत घुसविल्यामुळें राजकीय आकांक्षांना अवश्य असणारा आपपरभाव, शत्रुमित्रभाव हा नाहींसा झाला होता. संसार करणें हें पाप आहे, निदान तो गौणपक्ष आहे असा विचार सर्वत्र रूढ झाला होता. समर्थांनीं ही विचारसरणी, हें तत्त्वज्ञान नष्ट करून लोकांना प्रपंचाचें, राजकारणाचें, ऐहिक आकांक्षांचें, स्वराज्यसाम्राज्याचें तत्त्वज्ञान शिकविलें. प्रपंच केला नाहीं तर परमार्थहि बुडेल हे लोकांना दाखवून दिलें. सुंदर स्त्री व मुलेंबाळें असणें हें दुर्भाग्य नसून हा ‘सुकृताचा योग आहे’ असें सांगितलें. राज्यें मिळतात तीं बाहुबल, मुत्सद्देगिरी यांनीं मिळतात,

नामस्मरणाने मिळत नसतात, ही शिकवण दिली. शत्रुमित्र सर्व सारखें हें बुळगें तत्त्वज्ञान नष्ट करून प्रखर आपपरभाव त्यांनी निर्माण केला. सदैव कटावर कर ठेवून अठ्ठावीस युगें निष्क्रियपणें उभा राहणारा विठोबा दूर सारून त्या जागीं धनुर्धर परंतप अशा रामाची उपासना रूढ केली. हातांत वारकऱ्याची पताका न घेतां 'शर्थीची तलवार करावी' असा उपदेश केला. दैववादानें हतबल, निःसत्त्व, हीनदीन झालेल्या लोकांना, 'यत्न तो देव जाणावा' हा मंत्र दिला. आणि ही सर्व विद्या लोकांमध्यें हळूहळू पेरण्यासाठी अनेक शिष्य निर्माण करून नेणत्या लोकांना जाणते करून 'महाराष्ट्रराज्य करावें जिकडे तिकडे' हें स्वप्न खरें करून दाखविलें.

समर्थांची ही जी नवी शिकवण, त्याचें हे जें क्रांतिकारक तत्त्वज्ञान त्याचें सम्यक् आकलन व्हावें म्हणून आपण त्यांचें वाङ्मय पाहूं लागलो तर एक मोठी विस्मयजनक गोष्ट ध्यानात येते. ती ही की, समर्थांच्या समग्र ग्रंथात या तत्त्वज्ञानाचें सविस्तर, सांगोपांग असे विवेचन कोठेहि केलेले नाहीं. समर्थांचे दासबोध, रामायण, अष्टकें, इत्यादि समग्र ग्रंथ एकत्र केले तर सुमारें बाराशें पृष्ठें भरतील. यांपैकी या नव्या तत्त्वज्ञानाला अवघीं साठपासष्ट पृष्ठें दिलेलीं आहेत. आणि तीं वाचून पाहिलीं तरी त्यांत या तत्त्वज्ञानांतील संघटना, प्रयत्नवाद, ऐहिकाची आवश्यकता, तर्काची श्रेष्ठता, महाराष्ट्रधर्म, शत्रुमित्रभाव या तत्त्वाचें साकल्यानें विवेचन कोठेंच आढळत नाहीं. दासबोधात किंवा अन्यत्र नवविधाभक्ति, आधिभौतिक ताप, बद्धलक्षण, मोक्ष, माया, पुरुषप्रकृति, रजोगुण, तमोगुण इत्यादि परमार्थातील तत्त्वांचे आणि सिद्धांतांचे जें विवरण आहे तें अगदीं सविस्तर आहे. मूल सिद्धांतांचे विवरण, त्यावर येणाऱ्या शंका, आक्षेप याचें निरसन व खंडन, स्वमताचें पुन्हा मंडन, त्याला आधार, प्रमाण, त्याची अनेकवार पुनरुक्ति, हे सर्व प्रकार या परमार्थ विषयाच्या विवेचनांत आढळतात. तसा विषयाचा प्रपंच या नवविचाराच्या बाबतींत, थोडे अपवाद सोडले तर, कोठेहि आढळत नाहीं. संघटना, प्रयत्नवाद, तर्कनिष्ठा हीं तत्त्वें अशीं आहेत कीं समाजाला त्यांचें पूर्ण आकलन व्हावयास हवें असेल तर त्या

प्रत्येकावर एकेक दासबोध लिहिणें अवश्य आहे. आणि जेव्हां जनमताचा ओघ विरुद्ध दिशेला वाहात असेल तेव्हां त्याला वळवून आणण्यासाठीं तर याहिपेक्षां मोठा प्रयत्न अवश्य आहे. समर्थांनीं जनमताचा ओघ आपल्या वाणीनें व प्रत्यक्ष कृतीनें वळविला ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे. पण वाणीनें त्यांनीं जन्मभर जें विवेचन केलें तें सर्व ग्रंथनिविष्ट झालें नाहीं ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. ग्रंथनिविष्ट जें वाङ्मय आहे त्याचा सर्व भर परमार्थविचारावर आहे. नवे तत्त्वज्ञान त्यांत अगदीं थोडें आहे. आणि तेंहि फुटकळ विचाराच्या रूपानें आलेलें आहे. या प्रकरणांतून, त्या प्रकरणांतून, अशीं कांहीं वाक्यें जमवून त्यांच्या आधारानें समर्थांच्या राजकीय तत्त्वज्ञानाची उभारणी करावी लागते. महंतांचें कार्य, शक्तीची उपासना, प्रपंचाचें महत्त्व, राजकारण अशा काहीं विषयांवर सबंध समास किंवा प्रकरण फार तर खर्चीं पडलेलें दिसतें. इतर विषयावर तेंहि नाहीं. ‘ संभाजीस पत्र ’, ‘ आनंदवनभुवन ’ इत्यादि प्रकरणांत मधूनच त्याविषयीं आलेल्या वचनांवरून समर्थांच्या विचारांचा अदमास बांधावा लागतो. आणि हें सर्व जरी एकत्र केलें तरी वर सांगितल्या-प्रमाणें एकंदर हजार बाराशें पृष्ठांपैकीं फार तर साठ-सत्तर—अगदीं पराकाष्ठा म्हणजे ऐंशी—पृष्ठें भरतील. म्हणजे समर्थांचें जें खरें कार्य त्याला त्यांच्या वाङ्मयांत अगदीं गौण, अल्प असें स्थान मिळालेलें आहे. आणि पूर्वींच्या संतमंडळींनी जे परमार्थ-विचार, जो वेदांत, जो भक्तिमार्ग, जो निवृत्तिमार्ग उपदेशिला त्याच्या विवेचनासाठीं, प्रतिपादनासाठींच समर्थांचें बहुतेक वाङ्मय खर्चीं पडलें आहे.

## तत्त्वज्ञान ग्रंथबद्ध झालें नाहीं

याचा अर्थ असा होतो कीं समर्थांनीं राजकीय क्षेत्रांत जें महान् कार्य केलें, ज्या चळवळी सुरू केल्या, स्वराज्य-संस्थापनेसाठीं जी वैचारिक क्रांति केली, जें नवें तत्त्वज्ञान प्रसृत केलें तें खरें पाहातां ग्रंथबद्ध झालेंच नाहीं. जें कांहीं थोडेबहुत झाले तें परमार्थ-विचार-महोदधींत इतकें विरून गेलें कीं

त्यांच्या वेळच्या पिढीसहि त्याची जाणीव राहिली नाहीं. आणि हीच महाराष्ट्राच्या व भरतखंडाच्या इतिहासांतील मोठी दुर्दैवी घटना होय असें मला वाटतें.

मराठ्यांच्या इतिहासांतील शिव-समर्थांचा काल व पुढील काल यांची तुलना केली तर त्या दोहोंत एक फार महत्त्वाचा फरक दृष्टीस पडतो. पहिल्या कालखंडांत परकीय आक्रमणाशीं झुंज दिलेली जशी आढळते त्याचप्रमाणें हिंदु समाजव्यवस्थेंत जे दोष आढळतील ते नष्ट करून, त्या समाजाच्या अनेक शतकांच्या दौर्बल्याची कारणें नाहीशीं करून त्याची पुनर्घटना करण्याचे प्रयत्न झालेले दिसतात. पुढील काळात नुसता पराक्रम दिसतो. लढाया, स्वाऱ्या, मोहिमा यांचाच तो इतिहास आहे. समाजाचें बल हें त्यांतील धार्मिक संस्था, सामाजिक रुढि, अर्थव्यवस्था, राजकीय तत्त्वज्ञान, म्हणजे एकंदर त्याची संस्कृति यावर अवलंबून असतें. केवळ तलवारींत तें बळ नसतें. तें तलवारीच्या मागच्या तत्त्वज्ञानांत असतें. तें तत्त्वज्ञान उंच करावें, सामाजिक, धार्मिक संस्थांतील दोष नाहींसे करून, नव्या रूढि प्रसृत कराव्या, आणि विघटनेचीं बीजें नाहींशी करून समाज संघटित करावा असा विचारपूर्वक केलेला प्रयत्न पहिल्या कालखंडांत दिसून येतो. दुसऱ्या कालखंडांत असा प्रयत्न मुळींच दिसत नाहीं.

शिवछत्रपति हे केवळ राज्यकर्ते, सेनापति किंवा मुत्सद्दी होते असें नाहीं. ते एक थोर तत्त्ववेत्तेहि होते, ते राजर्षि होते. धर्म, अर्थ, समाजरचना या क्षेत्रांत पुनर्घटना करण्याचे त्यांचे जे प्रयत्न झालेले दिसतात त्यावरून हें स्पष्ट दिसून येतें. परकीय शत्रु हा खरा शत्रु नव्हे, तर नव्या काळाला प्रतिरोध करणारी जुनी समाजव्यवस्था, जुन्या धर्मकल्पना, जुनी अर्थव्यवस्था म्हणजेच जुनें तत्त्वज्ञान हा खरा शत्रु होय हें त्यांनीं जाणलें होतें. आणि म्हणूनच पतितांची शुद्धि, भाषाशुद्धि, समुद्रगमन, वतन-व्यवस्थेचा उच्छेद, क्षत्रियत्वाची स्थापना इत्यादि नवीं तत्त्वें त्यांनीं रूढ केलीं व आचरलीं. मराठेशाहीच्या पुढील काळांत समाजाच्या जडदेहधारी शत्रूवरच फक्त लक्ष होतें

असें दिसतें. प्रगतीला विरोध करणारी जुनी संस्कृति या शत्रूकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें.

### याची जबाबदारी पंडितांवर

पण या वैगुण्याची, या अवनतीची बरीचशी जबाबदारी शिवाजी व समर्थ यांच्या काळच्या पंडितांवर आहे. त्या दोन महापुरुषांनीं निर्माण केलेल्या नव्या परंपरा, त्यांचे क्रांतिकारक विचार, त्यांचें नवें धोरण, त्यांची काल भेदून मागेंपुढें पहाणारी दृष्टि, यांचें विवेचन करणारे विपुल ग्रंथ या पंडितांनीं लिहून ठेवले असते, तर पुढील काळांत आलेली दुर्दशा टळली असती. ते ग्रंथ हातीं घेऊन पुढीलांनीं मार्ग आंखले असते आणि त्यांच्या आधारानेंच कालाच्या धांवत्या ओघाला अनुसरून दर वेळीं नवें तत्त्वज्ञान, नवे धर्मबंध त्यांनीं निर्माण केले असते. कालाला कलाटणी देणारे शिव-समर्थांसारखे पुरुष कांहीं दर शतकांत होत नसतात. पण सरस्वतीच्या साह्यानें त्यांना अमर करणें मात्र शक्य असतें. त्यांच्या काळच्या पंडितांनीं हें केलें नाहीं. त्यामुळें शिवछत्रपतींचें व समर्थांचें तत्त्वज्ञान त्यांच्याबरोबरच लुप्त झालें. थोर पुरुष विद्यमान असतात तोंपर्यंत त्यांची वाणी व कृति यावरून त्यांचें तत्त्वज्ञान लोकांत पसरत असतें. पण त्यांचे विचार, त्यांची शिकवण ग्रंथनिविष्ट झाली नाहीं, तर पुढील पिढीस त्यांचें दर्शन घडत नाहीं. मराठी राज्यसंस्थापकांची हीच स्थिति झाली. त्यांच्या दिव्य दृष्टीचें, क्रांतिकारक विचारांचें आकलनच तत्कालीन पंडितवर्गाला झालें नाहीं. आणि या त्यांच्या प्रज्ञाहीनतेमुळें पुढील पिढ्यांचें अपरिमित नुकसान झालें आहे.

समर्थांच्या समकालीन शिष्यांनीं व भक्तांनीं त्यांच्याविषयीं व त्यांचा ग्रंथ जो दासबोध त्याविषयीं अनेक स्तोत्रें, आरत्या, धांवे करून ठेवले आहेत. हें सर्व वाचलें म्हणजे मनाला मोठा उद्वेग वाटतो. समर्थांच्या वाङ्मयांत बाराशें पृष्ठांपैकीं राष्ट्रीय तत्त्वज्ञानाला अवघीं सत्तरऐंशीं पृष्ठें दिलीं आहेत, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट होय असें जें वर पुन्हां पुन्हां म्हटलें आहे, त्याचें कारण त्यांच्याविषयीं त्यांच्या शिष्यांनीं केलेल्या आरत्या वाचल्या म्हणजे

चांगलें कळून येतें. या शिष्यकृत सर्व वाङ्मयांत समर्थांच्या राष्ट्रीय कार्याचा चुकून सुद्धां कोठे उल्लेख केलेला नाहीं. भवडोहातून तारलें, चौऱ्यायशीचा फेरा चुकविला, जन्ममृत्यु दूर केले, अज्ञानजडजीवां मार्ग सुकर केला, नवविधा भक्ति विशद करून सांगितली, त्यामुळें बद्ध हे सिद्ध झाले, भक्तांचा उद्धार झाला, शांति, क्षमा, विरक्ति, वैराग्य, भक्ति, ज्ञान यांचा प्रसार झाला, याविषयींच सर्व कौतुक आहे. त्यांनीं संघटना घडविली, क्षात्रधर्माचें उद्दीपन केलें, संसाराची महती सांगितली, राष्ट्रधर्म शिकविला, याचा एका अक्षरानेंहि कोणी निर्देश केलेला नाही. त्यांच्या शिष्यांनाच समर्थांच्या कार्याचें स्वरूप कितपत कळलें होतें हें यावरून दिसून येते! ही शिष्यांची कथा! मग त्यानंतरच्या भक्तांची गोष्ट कशाला! समर्थांची शिकवण इतर संतांच्यापेक्षां निराळी होती, जुन्या रूढ परंपरा उच्छिन्न करून लोकमताचा ओघ बदलून टाकण्याचा त्यांचा प्रयत्न होता, ते क्रांतिकारक होते असें आज जरी कोणी प्रतिपादन केलें तरी त्यावर त्यांचे भक्त आजहि अगदीं उसळून उठतात. इतर संत व समर्थ यांच्यांत फरक केलेला त्यांना मुळीच खपत नाही. भक्ति, ज्ञान, वैराग्य यांच्या प्रसाराहून त्याचें कार्य निराळे होते हे म्हणणें त्यांना सहन होत नाहीं, इतकें समर्थांच्या कार्याचें त्यांना आकलन झालें आहे!

जी गोष्ट समर्थांची तीच शिवछत्रपतींची. त्यांनीं ज्या वेळी राज्यव्यवहार कोश करण्याची आज्ञा दिली, त्या वेळी भाषेच्या शुद्धतेची महती सांगितली असलीच पाहिजे. पतिताची शुद्धि करण्याची चाल सुरू केली, त्या वेळीं तिची कारणमीमांसा केली असलीच पाहिजे. ' कलावाद्यन्तयो: स्थिति: । ' या मूर्ख विचारसरणीचा उच्छेद करून ' मी क्षत्रिय आहे ' असें सांगून स्वत:स राज्याभिषेक करवून घेतला, त्या वेळीं श्रीकृष्णाप्रमाणेंच त्यांनीं धर्माधर्माविषयीं विवेचन केलें असलेंच पाहिजे. पण श्रीकृष्णाच्या मुखींचे अमृतबिंदु जसेच्या तसे संग्रहीत करून सरस्वतीच्या साह्यानें ते अमर करून ठेवणारे वेदव्यास भारतकाळीं होते तसे शिवछत्रपतींच्या तत्त्वज्ञानाला अमररूप देणारे पंडित त्यांच्या काळीं झाले नाहींत, हें दुर्दैव होय. त्यामुळें त्यांनीं

अंगीकारलेलें क्रांतिकारक तत्त्वज्ञान एका पिढींतच लुप्त होऊन गेलें व पुढील काळांत जड बाहुबल तेवढें उरलें.

शिवसमर्थांचें तत्त्वज्ञान, त्यांची शिकवण, त्यांचा नवा धर्म हा ग्रंथनिविष्ट झाला नाहीं ही जी दुर्दैवी घटना ती मुद्दाम विस्ताराने वर्णन करून सांगण्याचें कारण असें कीं ती घटना एकाकी नसून हिंदुस्थानाच्या गेल्या एक हजार वर्षांचा इतिहासाचे तें एक लक्षणच आहे. मला मुख्यत: हे सांगावयाचें आहे कीं, या दीर्घ कालखंडांत या भूमींत पित्यानें पुत्राला सरस्वतीच्या साह्यानें शिकविलेंच नाहीं. या कालांत या भूमींत ऐहिक क्षेत्रांत अनेक कर्ते राजे झाले, सेनापति झाले, मुत्सद्दी झाले, तत्त्ववेत्ते झाले, राजनीतिज्ञ झाले; पण त्यांतल्या कोणीहि आपली शिकवण ग्रंथरूपानें पुढील पिढीस दिली नाहीं. त्यानीं स्वत: तसें केलें नाही; आणि त्यांच्या शिष्यांनीं, भक्तांनीं किंवा समाजांतील इतर पंडितांनींहि ही काळजी घेतली नाहीं. आणि त्यामुळें येथें ज्ञानाचा संचय झाला नाहीं. दर पिढीला पुन्हां श्रीगणेशापासून प्रारंभ. श्रीमंत थोरले बाजीराव यांनीं ज्या अनेक लढाया मारल्या त्यांचीं आज जीं थोडीशीं वर्णनें आपण वाचतों त्यावरून युद्धविषयक कितीतरी सिद्धांत त्यांच्या मनांत निश्चित झाल्याचें दिसून येतें. निजामाशीं त्यांनीं ज्या लढाया केल्या त्यावरून आपल्याला हवें त्या ठिकाणीं शत्रूला आणून तेथें त्याचा नि:पात करण्याचें नेपोलियनचें हुकमी कसब त्यांच्या ठायीं होतें असें दिसून येतें. पण याचें विवेचन करून त्यावरून सिद्धांत बांधून त्याचें युद्धशास्त्र करून सांगणारा कोणीहि रणविशारद येथें झाला नाहीं आणि त्यामुळें पुढच्या सेनापतीला स्वत:चें युद्धशास्त्र प्रारंभापासून तयार करावें लागलें. आणि ही कहाणी प्रत्येक क्षेत्रांतल्या कर्त्या पुरुषाची आहे. प्रत्येकाचे विचार, त्यानें मनांत बांधलेले सिद्धांत त्याच्याबरोबर लुप्त होऊन जात. आणि त्याच्या पुढील पिढीला पायापासून प्रारंभ करावा लागे. त्यामुळें राजनीति, युद्ध, व्यवहारनीति समाजरचना या शास्त्रांचा येथें विकासच झाला नाहीं. न्यूटनचा सिद्धांत त्यानें लिहून ठेवला नसता आणि प्रत्येक विद्यार्थ्याला तो स्वतंत्रपणें शोधून काढावा

लागला असता, तर वस्तुशास्त्राची जी प्रगति शक्य झाली असती तितकीच प्रगति येथें समाजशास्त्राची झाली. कारण येथें पित्यानें आपलें सिद्धांत लिहून ठेविले नाहींत, पुत्राला शिकविले नाहींत.

रजपुतांनीं जवळजवळ आठशें वर्षें मुसलमानांशीं संग्राम केला. तेवढ्या अवधींत त्या भूमींतल्या पुरुषांना लक्षावधि अनुभव आले असतील. मुसलमानांची कडवी धर्मनिष्ठा, त्यांची युद्धनीति, आपली युद्धपद्धति, किल्ल्यांचें महत्त्व, बचावाचें धोरण, चढाईचें धोरण, शरण आलेल्यास अभयदान, जोहार, यवनांची कपटनीति, रणांत सर्वांनीं आत्मबलिदान करणें, या आणि यांसारख्या असंख्य सामाजिक व राजकीय विषयांवर कितीतरी विचार रजपूत पुरुषांनीं केला असेल. पण प्रत्येकाचा विचार ज्याचा त्याच्याबरोबर गेल्यानें आठशें वर्षांच्या अखेरीस पुन्हां सर्व धोरण पहिल्यासारखेंच ! ज्ञानाचा संचय, वाढ, विकास व त्यामुळें निर्माण होणारें नवें तत्त्वज्ञान यांचा येथें ठावठिकाणाच नाहीं. त्यामुळें येथल्या घडामोडी या निसर्गांतील वायु, वीज, अग्नि यासारख्या अंधशक्तींच्या संघर्षासारख्याच बहुतांशीं भासूं लागतात. पिढ्यान् पिढ्या डोळसपणें लोक मार्ग आक्रमीत आहेत असें दिसत नाहीं.

## युरोपीयांतील आणि आमच्यांतील फरक

ड्यूक ऑफ वेलिंग्टन हा या मोठ्या पदवीस जाण्यापूर्वी हिंदुस्थानांत प्रसिद्धीस आला होता. येथें ही प्रसिद्धी मिळण्यापूर्वींच एकदां त्यानें मद्रासहून बंगलोरपर्यंत प्रवास केला होता. पण हा प्रवासहि त्यानें फुकट घालविला नाहीं. या प्रवासांत असतांना टिपणें करून ठेवून परत आल्यानंतर या सर्व प्रदेशाच्या भूपृष्ठाची युद्धदृष्टीनें त्यानें माहिती लिहून काढली व ती पुस्तकरूपानें राजकर्त्यांच्या हवाली केली. पुढें त्याला व इतर सेनापतींना तिचा उपयोग किती झाला असेल हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. आणि हें धोरण एकट्या वेलिंग्टनचेंच होतें असें नाहीं. इंग्रजांचा प्रत्येक गव्हर्नर, प्रत्येक सेनापति, प्रत्येक मुत्सद्दी आपले अनुभव असें लेखनिविष्ट करीत आलेला आहे. मराठे लोक कसे आहेत, त्यांचा पराक्रम काय, युद्धपद्धति कोणच्या, त्यांच्या निष्ठा

कोणच्या, त्यांची आपसांत फूट कशी आहे, त्यांच्यांत बुद्धिमान् कोण, शूर कोण,—सर्व तपशील अनेकांनीं लिहिला आहे. आणि त्यामुळेंच नवीन आलेल्यांना या भूमीचें आकलन करणें फार सुलभ होत असे. गुरुत्वाकर्षण पहिल्यापासून शोधावें हा प्रसंग त्यांच्यावर येत नसे !

राष्ट्रांत जे विचारी व कर्ते पुरुष निर्माण होतात त्यांच्या विचाराचें व कर्तृत्वाचें धन ग्रंथबद्ध झालें कीं पुढील पिढीवर त्याचे संस्कार होतात व त्या पिढींत कर्तीं माणसें निर्माण होतात. त्यांचें तत्त्वज्ञान पुन्हां ग्रंथबद्ध झालें कीं, तें पुढील पिढीस उपयोगीं पडतें. आणि अशा रीतीनें राष्ट्राचें ज्ञानधन वाढत जाऊन त्यांतून अनेक प्रकारचीं शास्त्रें निर्माण होऊन समाज बलशाली होतो. बाराव्या तेराव्या शतकापासून युरोपांत नेमका हाच प्रकार सुरू झाला. आठदहा शतकें अंधारांत घोरत पडलेला हा भूभाग या वेळीं जागा झाला आणि विचार करूं लागला. पोपचे अधिकार किती, राजाचे किती, ग्रंथप्रामाण्य काय म्हणून मानावें, धर्माचा अंतिम हेतु काय, जीवनांत आनंद भोगण्याचा मानवाला हक्क आहे कीं नाहीं, बायबलांतील पापाची मीमांसा खरी आहे काय, पारलौकिकाचा ऐहिकावर पगडा किती असावा, हे व या तऱ्हेचे अनंत प्रश्न लोकांच्या मनांत उद्‌भवूं लागले. आपल्याकडे हे उद्‌भवले नसतील, हें शक्य नाहीं. पण युरोपच्या पंडितांनीं व कर्त्या पुरुषांनीं सरस्वतीचें सामर्थ्य ओळखून दरवेळीं आपले विचार ग्रंथबद्ध करून ठेवले व ज्ञानधन वाढवीत नेलें, आणि येथीलांनीं तें केलें नाहीं हा मुख्य फरक आहे, मार्सिग्लियो, विल्यम ऑफ् ओकॅम, जॉन हस्, वायक्लिफ, पेट्रार्क, लूथर, इरॅसमस् अशा किती तरी ग्रंथकारांनीं पुढील पिढ्यांना शिकविण्याचें कार्य अव्याहत चालू ठेविलें होतें. तेराव्या शतकापासून युरोपचा जो उत्कर्ष झाला त्याचें एक प्रमुख कारण म्हणजे सरस्वतीच्या साह्यानें अमर करून ठेवलेले हे विचार, हें तत्त्वज्ञान, हें आहे. युरोपांत बुद्धिवादाचा उदय झाला, ग्रंथप्रामाण्यवादी धर्मोपदेशकांचें वर्चस्व नष्ट झालें, राष्ट्रनिष्ठा ही प्रबळ शक्ति उदयास आली आणि विज्ञान वाढीस लागून पुढें औद्योगिक क्रांति घडून

आली. यांपैकीं कोणचीहि घटना हें एका व्यक्तीचें कार्य नाहीं. शेंकडों पंडित, तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ यांचें तें कार्य आहे, आणि या पंडितांचें हें कार्य चारपांच शतकें चालू होतें व अजूनहि चालू आहे. पण या पंडितांनीं आपले विचार लिहून ठेवले नसते तर हें कार्य घडून आलें नसतें. तेराव्या शतकांतील पंडितांच्या तत्त्वज्ञानाचा पत्ता चौदाव्या शतकांतील पंडितांना लागला नसता. त्यांना पुन्हां पायापासूनच सुरुवात करावी लागली असती. आणि दर शतकांत, दर प्रांतांत हेंच होऊन प्रत्येकाचें ज्ञान वातावरणांत विरून गेलें असतें. आणि मग त्यांतून राजकीय किंवा धार्मिक असें कोणतेंच तत्त्वज्ञान निर्माण होणें शक्य झालें नसतें.

महाराष्ट्रात व भरतखंडांत नेमकें हेंच झालें. ऐहिक क्षेत्रांत जे विचार त्याच काळी पाश्चात्यांच्या चित्तांत स्फुरत होते ते येथील लोकांच्या मनांत आलेच नसतील हें अशक्य आहे. मराठेशाहींत तर असे विचार उसळत होते याविषयीं वाटेल तितके पुरावे उपलब्ध आहेत. शिवछत्रपति आणि समर्थ यांनीं तर ते अमलांत आणण्याचा प्रयत्नहि केला होता. बाजीरावाच्या मनांत मस्तानीला हिंदु करून घेऊन तिच्या मुलाची मुंज करावयाची होती. माधवरावांच्या वेळीं सैन्यांतली अस्पृश्यता नष्ट करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला होता. आणि ' राज्य हें कोणाच्या मालकीचें नसून आपण केवळ त्याचे संरक्षक आहों, ' हा महनीय सिद्धांत त्यांनीं सांगितला होता. रामशास्त्री, परशुरामभाऊ यांचे विधवाविवाह चालू करण्याविषयींचे प्रयत्न प्रसिद्धच आहेत. पण या तऱ्हेचे हे क्रांतिकारक विचार सरस्वतीच्या कृपेच्या अभावीं वातावरणांत विरून गेले; त्यांचें तत्त्वज्ञानांत रूपांतर झालें नाही. त्यांचें कोणी शास्त्र केले नाहीं. स्वत: या पंडितांनीं किंवा त्यांच्या आसपासच्या लोकांनीं हे विचार ग्रंथबद्ध करण्याचा प्रयत्न केला असता तर दर दशकास एकांत दुसऱ्याची भर पडून या क्रांतिकारक विचारांचा एक बलशाली प्रवाह निर्माण झाला असता आणि मग त्याच्या ओघांत जुने घातकी विचार वाहून

गेले असते; पण हें घडलें नाहीं. म्हणूनच शिवकालानंतरच्या मराठेशाहीला जडशक्तींच्या संघर्षाचें स्वरूप आलें.

समाज जगण्यास कोणच्यातरी एका निष्ठेची आवश्यकता असते. उत्तर मराठेशाहीत या तऱ्हेची प्रबल, बहुजनमान्य अशी निष्ठा कोणचीच नव्हती. इंग्रज हा इंग्रजाविरुद्ध लढणार नाही, फ्रेंच हा फ्रेंचाविरुद्ध लढणार नाहीं अशी निष्ठा युरोपांत ठरून गेली होती. पण येथें हिंदु हिंदूविरुद्ध, मराठा मराठ्याविरुद्ध, भोसल्यांचे सेवक भोसल्यांच्या सेवकांविरुद्ध, सारखे लढत होते. दृढ अशी कोणचीच निष्ठा नव्हती, आणि याचे कारण म्हणजे राष्ट्रीय, राजकीय, सामाजिक तत्त्वज्ञानाचा अभाव हे होय.

कोणच्याहि क्षेत्रांत पंडितांनीं आपले विचार ग्रंथबद्ध केले तर त्याचा प्रभाव केवढा पडतो याचें उदाहरण महाराष्ट्राच्या इतिहासांतच सांपडतें. परमार्थ, भक्तिमार्ग अद्वैतवेदांत याविषयी ज्ञानेश्वरानें ग्रंथ लिहिण्याची जी परंपरा घालून दिली ती आजतागायत चालू आहे. त्यामुळें परमार्थातले कर्म, पुनर्जन्म, आत्मा, मोक्ष, माया, सगुणनिर्गुण असले गहन विचार सुद्धां अगदीं निरक्षर शेतकऱ्यापर्यंत जाऊन पोहोचले आहेत. ज्ञानेश्वरानें गीतेवर अठरा हजार ओव्या लिहिल्या. पण त्या कमी वाटून दासोपंतानें त्याच गीतेवर एक लक्ष ओव्या लिहिल्या. पण 'मराठा तेवढा मेळवावा', 'यत्न तो देव जाणावा', 'शक्तीनें मिळती राज्यें', या समर्थांच्या सिद्धांताचें विवेचन करण्यासाठीं एक ओवी सुद्धां कोणी लिहिली नाहीं. जनमनावर एकादें तत्त्वज्ञान बिंबवावयाचें असलें तर त्यासाठी केवढा विपुल ग्रंथसंभार निर्माण करावा लागतो हें मराठींतील परमार्थ-वाङ्मयाकडे पाहिलें म्हणजे कळून येतें. बाराव्या शतकापासून दरशतकांत, पुढें तर दरदशकांत आणि पुढें दरवर्षी या विषयींचे ग्रंथ निर्माण होऊं लागले. हजारों हरदास, कीर्तनकार, पुराणिक समाजावर त्याचे संस्कार करूं लागले. आणि त्याचाच परिणाम होऊन हा भारतीय समाज इहविन्मुख होऊन पराक्रमशून्य बनला. समर्थांनीं भिन्न तत्त्वज्ञान निर्माण करण्याचा अल्पसा प्रयत्न केला. त्यामुळें महाराष्ट्रापुरती जागृति

निर्माण झाली. पण समर्थांना कोणी दासोपंत न भेटल्यामुळें त्या निवृत्तीच्या ओघांत त्यांचा खरा ‘ दासबोध ’ लुप्त होऊन गेला.

अलीकडच्या काळांत मागल्यासारखी स्थिति नाहीं हें जरी खरें असलें तरी जी सामाजिक, राजकीय, धार्मिक क्रांति व्हावयास पाहिजे आहे, तिच्या मानानें पाहातां निर्माण झालेलें वाङ्मय अगदीं अल्प आहे. अस्पृश्यता-निवारण, मिश्रविवाह, पतितपरावर्तन, संसारप्रेम, कर्मयोग, चातुर्वर्ण्यनाश, इत्यादि ज्या सुधारणा आवश्यक आहेत त्या आपण करीत चाललों आहोंत. पण त्याचें सर्व प्रतिपादन केवळ मानव्याच्या, सहानुभूतीच्या, उदारतेच्या दृष्टीनें होत आहे. आरंभीं तसें व्हावें हें युक्तच आहे. कारण कोणत्याहि सुधारणेची पहिली प्रेरणा सहृदयतेंतूनच निर्माण होत असते. पण हें दीर्घकाल टिकणार नाहीं. दीर्घकाल रूढ असलेल्या आचारविचारांचें तत्त्वज्ञानपूर्वक निर्मूलन झाले नाहीं तर क्रांतिकारक सुधारणा या चिरस्थायी होत नाहींत. आणि त्या दृष्टीनें विचार करतां आपल्या सामाजिक पुनर्घटनेचें तत्त्वज्ञान शास्त्रीय दृष्टीनें लिहिलें गेलेंच नाहीं असें म्हणावें लागतें.

जीवनशास्त्र, वंशशास्त्र यांचा जगांतल्या पंडितांनीं अपरिमित अभ्यास केला आहे, तो विचारांत घेऊन आपल्या जातिसंस्थेचें व चातुर्वर्ण्याचें तत्त्व-ज्ञानपूर्वक उन्मूलन करणें अवश्य आहे. हिंदुस्थान हें आपणांस एकराष्ट्र घडवावयाचें आहे. या तत्त्वावर सध्यां असंख्य आक्षेप येत आहेत. तेव्हां राष्ट्रनिष्ठेची महती समाजाला पटविण्यासाठीं वाङ्मयाचा वर्षाव केला पाहिजे. भांडवलशाही आहे या स्वरूपांत टिकवून धरून कोणचाच समाज टिकणार नाहीं. कामगारवर्गाचें हित हाच ध्रुवतारा कोणत्याहि समाजांच्या अग्रणींनीं पुढें ठेविला पाहिजे. या क्षेत्रांत तर वर्गविग्रह, आंतरराष्ट्रवाद, विरोध-विकासवाद इत्यादि अनेक तत्त्वें प्रचलित झालीं आहेत. त्या सर्वांचा खोल अभ्यास करून पंडितांनीं समाजाला मार्गदर्शन करणारे ग्रंथ लिहिणें अवश्य आहे. लोकसत्ता, संघसत्ता याविषयीं आपण बहुतेक सिद्धांत दत्तक घेऊन चाललों आहों. त्यांचाहि शास्त्रीय अभ्यास झाला पाहिजे. विज्ञानांत आपण कांहीं प्रगति

करीत आहोंत. विज्ञान मुलांना थोडें शिकवीत आहों, पण विज्ञाननिष्ठा निर्माण करण्याचे अल्पहि प्रयत्न होत नाहींत. अशा रीतीनें जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत आपण क्रांतिकारक विचार करीत असलों तरी क्रांतिकारक तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या वाङ्मयाची उणीव फार आहे. आणि ती भरून निघाली नाहीं तर समाजाची आपण जी नवी घडण करूं तिला स्थैर्य येणार नाहीं.

फार पूर्वीच्या काळीं सरस्वतीच्या या सामर्थ्याचें महत्त्व पूर्वसूरींनीं जाणलें होतें आणि महाभारतांत समाजाच्या सर्व अंगोपांगांची तात्त्विक चर्चा अगदीं विपुल प्रमाणांत त्यांनी करून ठेविली होती. संस्कृत भाषेशी प्रत्यक्ष संबंध सुटल्यानंतर ज्या देशी भाषा निर्माण झाल्या त्यांनीं महाभारतांतील कथा व कांहीं वेदान्ती प्रकरणें यांचाच फक्त प्रचार केला. समाजरचनेविषयीं जे अत्यंत प्रगल्भ विचार त्यांत सांगितलेले आढळतात त्यांचा मागमूसहि देशी वाङ्मयांत दिसत नाही. त्या शतकांतील पुरुषांना नवीन विचार सुचले, त्यांनीं कांही प्रमाणांत ते प्रत्यक्षांतहि आणले पण वाङ्मयाचा आश्रय करून त्यांनीं ते चिरस्थायी करून ठेविले नाहींत. म्हणून नव्या काळाला अवश्य ते तत्त्वज्ञान, अवश्य तो नवा धर्म निर्माण झाला नाहीं व आपला अपकर्ष झाला. आजहि आपण तोच प्रमाद करीत आहोंत. सरस्वतीच्या सामर्थ्याचें महत्त्व आपण आकळिलें आहे असें वाटत नाही. आणि यामुळें आपले सामाजिक पुनर्घटनेचें प्रयत्न तितकेसे यशस्वी होत नाहीत. म्हणून महाराष्ट्रीय पंडितांना माझी आग्रहाची विनंति अशी आहे कीं त्यांनीं हें प्रचंड कार्य शिरावर घ्यावें आणि सामाजिक, राजकीय, धार्मिक, आर्थिक पुनर्घटनेचें तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांचा या भूमीवर अविरत वर्षाव करावा. तसें त्यांनीं केलें तर गेल्या पांचसहाशें वर्षांत जे संत होऊन गेले त्यांना निवृत्ति, संसारविन्मुखता, वैयक्तिक धर्म यांचा प्रसार करण्यांत जें यश आलें तेंच यश आपल्याला मिळून संघटना, राष्ट्रनिष्ठा, विज्ञाननिष्ठा हीं नव्या धर्माचीं तत्त्वें समाजांतील अगदीं खालच्या थरापर्यंत पसरतील व पुनर्घटनेचें कार्य सुकर होईल.

---

मे १९४६

## २. नरोटीची उपासना

### मिर्झा राजे

औरंगजेबाच्या इस्लामी राज्याची वाढ करण्यासाठीं शिवछत्रपतीवर चालून येणारे मिर्झा राजे जयसिंग यांचें नांव इतिहासांत प्रसिद्ध आहे. बाराव्या वर्षापासून यांनीं शिपाईगिरी चालविली होती व मध्यआशियापर्यंत मोहिमा करून श्रेष्ठ सेनापती, कुशल रणपंडित म्हणून अतुल कीर्ति मिळविली होती. पण आपल्या अंगचें हें सर्व संगरनैपुण्य त्यांनीं इस्लामी राज्याच्या अभिवृद्ध्यर्थ अर्पण केलें होतें. आणि असें करण्यांत आपण हिंदुधर्माशीं कांहीं द्रोह करीत आहों असे त्यांना वाटत नव्हतें. दक्षिणेंत शिवछत्रपती हिंदवी स्वराज्याची स्थापना करण्याच्या प्रयत्नांत होते. त्याचे ते प्रयत्न धुळीस मिळविण्याची जबाबदारी मिर्झा राजे यांनी शिरावर घेतली व छत्रपतींना पराभूत करून पारहि पाडली. पुढें छत्रपतींनीं आग्र्याहून निसटून जाऊन डाव उलटविला ते निराळें. पण हिंदवी स्वराज्य संस्थापनेचें कार्य नेस्तनाबूद करण्याची आपली प्रतिज्ञा मिर्झाराजे यांनीं पार पाडली होती. छत्रपती आग्र्याहून सुटून गेल्यावर औरंगजेबानें मिर्झाराजे जयसिंग यांना ठपका दिला. तुम्हींच बापलेक शिवाजीला सामील झाला असा त्यानें बोल लाविला. तेव्हा मुसलमानी तख्ताशीं आपण एकनिष्ठ आहों हे सिद्ध करण्यासाठीं जयसिंगानें बादशाहास लिहिलें कीं, ‘ आपली परवानगी असेल तर अजूनहि कांहीं युक्ति करून मी शिवाजीचा कांटा काढून टाकीन. मी माझ्या मुलासाठीं शिवाजीच्या मुलीला मागणी घालीन. आम्हां उच्चकुलीन रजपुतांशीं संबंध जोडण्याची त्याला फार हौस आहे. तो ही मागणी निश्चित मान्य करील. मग विवाहविधीसाठी आम्ही एकत्र आल्यावर मी त्यास तेथेंच छाटून टाकीन किंवा विष घालीन. मात्र हा बेत आपण सर्वथा गुप्त ठेविला पाहिजे.’

असें अत्यंत हीन व ओंगळ कारस्थान करण्यांत, आणि हिंदवी स्वराज्याची संस्थापना करण्याची आकांक्षा धरणाऱ्या क्षत्रियकुलावतंस श्रीशिव-

छत्रपतीविरुद्ध तें कारस्थान रचण्यांत कांहीं धर्मभ्रष्टता आहे, असें मिर्झाराजे जयसिंग यांनीं स्वप्नांतहि मान्य केलें नसतें. हे सर्व प्रकार घडल्यावर त्यांना जर कोणी म्हणालें असतें कीं, 'राजे, तुम्ही धर्मभ्रष्ट आहां. हिंदुधर्मावर तुमची श्रद्धा नाहीं. तुम्ही स्वधर्माची सेवा करीत नाहीं. तुम्ही धर्मद्रोही आहां.' तर त्यांना पराकाष्ठेचा विस्मय वाटला असता, संताप आला असता. हिंदुधर्माचा व शिवाजीवर चालून जाण्याचा संबंध काय ? औरंगजेबाचे सर्व प्रयत्न इस्लाम धर्माच्या अभिवृद्धीसाठीं चालू आहेत हें न जाणण्याइतके मिर्झाराजे दुधखुळे नव्हते. छत्रपतीनी दिल्लीला बादशहाच्या भेटीसाठीं जाण्याचें मान्य केल्यावर त्यांना बादशहाने जें पत्र धाडलें त्याच्या मायन्यांत त्यानें छत्रपतीना 'मुसलमानी धर्मरक्षक शिवाजीराजे' असें संबोधिलें आहे. राजे जयसिग यांना औरंगजेबाच्या या सर्व आकांक्षा माहीत होत्या. तरीहि त्याच्या तख्ताशीं एकनिष्ठ राहण्यांत आपण धर्मद्रोहीपणा केला असें त्यांना कधींच मान्य झालें नसतें.

'आपली हिंदुधर्मावर श्रद्धा आहे हें सिद्ध करा.' असें त्यांना कोणी हटकलें असते तर त्यांनीं काय पुरावा दिला असता ? त्यांनीं वाटेल तेवढा पुरावा दिला असता. त्यांनी त्या हटकणाऱ्याला आपल्या वाड्यांत नेऊन सांगितलें असते कीं पहा, येथें भगवान् एकलिंगजीची रुद्राभिषेकानें नित्य पूजा चालू आहे, माझ्या वाड्यांत नित्य ब्राह्मणभोजनें चालू आहेत, अग्नीमध्यें मी नित्य आहुति देतों, मी कितीतरी गाई पाळलेल्या आहेत, त्यांचें मी नित्य दर्शन घेतों, एकादशी, सोमवार हे उपास मी चुकूं देत नाहीं. गंध, शेंडी, घेरा हीं हिंदुत्वाचीं लक्षणें मी अभिमानानें धारण करतों, जन्मापासून मरेपर्यंत आमच्या घरांत सारे संस्कार हिंदु पद्धतीनें होतात, काशी, रामेश्वर, पुष्कर, सोमनाथ, या यात्रा मी करतों. गंगा, यमुना या नद्यांना मी घाट बांधले आहेत. तेथे कोटि लिंगार्चन व्हावें म्हणून मीं जमिनी दिल्या आहेत, हे व या तऱ्हेचे शेंकडो आचार मी पाळीत असतांना माझी हिंदुधर्मावर श्रद्धा नाहीं, मी हिंदुधर्माची सेवा करीत नाही, असे तुम्ही म्हणतां याचा अर्थ काय ?

नरोटी

कोणत्याहि समाजाची धारणा व्यवस्थित व्हावी, त्याचा योगक्षेम नीट चालावा, त्याची उन्नति व्हावी यासाठीं त्यांतील धुरीणांनीं वेळोवेळीं कांहीं तत्त्वें मनाशीं निश्चित करून त्याअन्वयें कांहीं नियम, कांहीं शासनें, सांगितलेलीं असतात. त्या शासनांच्या मागचीं जीं तत्त्वें, त्यांचा जो मूळ हेतु त्याकडे लक्ष ठेवून जोपर्यंत समाज त्यांचें पालन करीत असतो तोपर्यंत तीं फलदायी होतात. समाजाच्या धारणपोषणास, रक्षणास, अभ्युदयास त्यांचें साह्य होतें. पण कालांतरानें स्वार्थामुळें, मोहामुळें, अज्ञानामुळें, आळसामुळें श्रद्धाशून्यतेमुळें त्या मूळतत्त्वांचा विसर पडून समाज त्या शासनांच्या केवळ जडस्वरूपाचा उपासक बनतो, तो फक्त त्याची चौकट, त्याचा सांगाडा, त्याचें बाह्यरूपच तेवढें जाणतो. अंतरीचें तत्त्व, त्याचा आत्मा तो जाणीत नाहीं. नारळाची नरोटीच फक्त त्याला दिसते. आंतलें खोबरें कोणी नेलें, तें नासलें, तरी त्याच्या ध्यानांतच येत नाहीं. तो फक्त त्या नरोटीची उपासना करीत असतो. पण त्याची श्रद्धा मात्र अशी असतें कीं आपण श्रीफळाचीच उपासना करीत आहों. समाजाचा अधःपात तेथूनच सुरू होतो. धर्म, विद्या, नीति, राजकारण, समाजव्यवस्था या प्रत्येक क्षेत्रांत जेव्हां जेव्हां बाह्य, जड रूपावर, केवळ कर्मठ आचारांवर, टिळेटोपीगंधमाळांवर, यांत्रिक कसरतीवर समाज आपलें लक्ष केंद्रित करतो त्यावेळीं त्या त्या संस्थेचा ऱ्हास होऊं लागतो. आणि सर्वच क्षेत्रांत नरोटीची उपासना सुरू झाली कीं एकंदर समाज रसातळास जातो. मिर्झाराजे जयसिंग व त्यांचे समकालीन लक्षावधि, कोट्यावधि हिंदुलोक यांची धर्मश्रद्धा या प्रकारची होती. हिंदु धर्माचा व हिंदु समाजाच्या धारणेचा, रक्षणाचा, स्वातंत्र्याचा, योगक्षेमाचा, संपन्नतेचा, अभ्युदयाचा कांहीं संबंध आहे ही कल्पना त्यांच्या मनाला कधींहि शिवली नव्हती. धारण,पोषण, रक्षण, समृद्धि, स्वातंत्र्य, अभ्युदय हें ज्यानें साध्य होईल तो धर्म याची जाणीव कित्येक शतकांपासून त्यांच्या मनांतून लुप्त झाली होती.

ब्रिटिशांचा राज्यविस्तार हिंदुस्थानांत चालू होता. त्यावेळीं ‘ गुप्त ’ या नांवाचें एक जैन पेढीवाल्यांचें घराणें त्यांना अखंड साह्य करीत असे. ते ब्रिटिशांना सढळ हातानें द्रव्यसाहाय्य तर करीतच, पण त्याशिवाय येथील राजांचे कारभार, त्यांच्या लष्करी हालचाली, त्यांच्या मसलती, याच्या गुप्त बातम्या हेरांकडून मिळवून त्या ब्रिटिशांना पुरवीत. लॉर्ड क्लाइव्ह यानें गुप्त घराण्यांतील जगत्-शेट व अमीरचंद यांना दिलेल्या शिफारसपत्रांत म्हटलें आहे कीं, ‘ पूर्वेकडील मुलखाची बातमी आम्हांस पुरविण्यासाठीं तुम्हीं स्वतंत्र टपालच उघडण्याचें ठरविलें आहे व सर्व सरदार व रयत यांना आपले पैसे खर्चून आमच्या अमलाखालीं शरण आणण्याचा आपला बेत आहे हें ऐकून आम्हांला फार आनंद होतो. ’ १८१७ सालीं खडकीची लढाई झाली. त्यावेळीं एक अत्यंत महत्त्वाची गुप्त बातमी आयत्या वेळीं कळविण्याची कामगिरी या घराण्यानें केली. तीसंबंधीं जेकिन्स लिहितो—‘ ही बातमी अशी वेळेवर न मिळती तर आम्हांस जय मिळविण्यास फार काळ लागता व सायास पडते. ’ ग्वाल्हेरचा किल्ला ब्रिटिशांनीं घेतला तेव्हां महाराजाधिराज सवाई शिकंदर स्वरूपचंद गुप्ता यांनीं किल्ल्यावर जाण्यासाठी एक चोरवाट होती ती अत्यंत प्रयासानें समजून घेऊन ब्रिटिशांना तिची माहिती दिली. त्यामुळें तो किल्ला विनाश्रम ब्रिटिशांच्या ताब्यात गेला.

हें गुप्त घराणें अत्यंत धर्मनिष्ठ म्हणून त्यावेळी नांवाजलेलें होतें. आश्चर्य असें कीं ब्रिटिशांना साह्य करतांना वेळोवेळी जे यांचे करारमदार झाले त्यांत त्यांनीं एक अट ब्रिटिशांना नेहमीं घातलेली आहे कीं, ‘ तुम्हीं आमच्या धर्मांत कधींहि हात घालूं नये. ’ आणि ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं त्यांना तशीं आश्वासनेंहि दिलीं आहेत. आपण परक्यांना द्रव्यसाह्य केलें, येथले सरदार व रयत यांना परक्यांना शरण जाण्यास भाग पाडिलें, आपल्याच लोकांवर हेरगिरी करून त्यांच्या गुप्त बातम्या इंग्रजांना दिल्या, किल्ल्याच्या चोरवाटा

दाखवून मूळ मालकांना दगा केला तरी आपण यांत कांहीं धर्महानी केली, धर्मद्रोह केला असें गुप्तांना वाटलें नाही. आणि इंग्रजांनी येथल्यांचें स्वातंत्र्य हिरावलें, धन लुबाडलें, छळ केला, अनन्वित क्रूर कृत्यें केलीं तरी त्यांनी धर्मात हात घातला नाहीं, असेंच त्यांचें मत होतें. तोंडावर पट्टी बांधूं दिली, उपास-तापास करूं दिले, सणवार पाळूं दिले, श्वेतांबर, दिगंबर हे भेद कायम ठेवूं दिले, मंदिरें बांधूं दिली, तेथे पूजाअर्चा करूं दिली म्हणजे इंग्रजांनीं धर्मात हात घातला नाहीं, ते अलिप्त राहिले, अशी गुप्ताची श्रद्धा होती. आणि अशी काळजी घेतल्यानंतर आपण प्रत्यक्ष व्यवहारांत स्वदेश, स्वजन यांशीं कसलाहि द्रोह केला, त्याचा परिणाम म्हणून येथल्या समाजाचें स्वातंत्र्य गेलें, त्याची अन्नान्नदशा झाली, त्याची लूट झाली, नागवणूक झाली—इंग्रज हे सर्व करीत होते हे गुप्ता प्रत्यही पहातच होते—तरी त्यांत धर्मनिष्ठेला बाध आल्यासारखे होत नाहीं अशी त्यांची समजूत होती. आणि समाजाचीहि वृत्ति तशीच होती. मिर्झाराजे किंवा स्वरूपचंद, अमीरचंद याना त्या काळात धर्मभ्रष्ट असें कोणीच म्हटलें नाहीं.

१७४२–४३ सालीं नानासाहेब पेशवे उत्तर हिंदुस्थानांत स्वारीला गेले होते. यावेळीं हिंदूंची तीर्थस्थळे, प्रयाग, काशी वगैरे क्षेत्रे मुसलमानांच्या अमलातून सोडवावी असा त्यांचा विचार होता. त्याप्रमाणे फौज घेऊन ते काशीक्षेत्राकडे निघाले. त्यावेळीं काशीक्षेत्र यवनाच्या राज्यातून मुक्त करून तें हिंदूंच्या आधिपत्याखालीं आणण्याचा त्यांचा मनोदय विफल करण्याची व तें हिंदूंचे क्षेत्र मुसलमानांच्याच वर्चस्वाखालीं राहील अशी व्यवस्था करण्याची कामगिरी कोणी केली ? काशीच्या त्यावेळच्या ब्राह्मणांनीं ! त्यावेळचा नबाब सफदरजंग याने त्या ब्राह्मणांना अशी धमकी दिली कीं तुमच्या राजास आमचे मुलखांतून परत फिरवा. नाहीतर तुम्हांला बाटवून सर्वांना मुसलमान करतों. त्यामुळें काशीकर ब्राह्मण हे नारायण दीक्षित काय-गांवकर यांना पुढे घालून रडत, भेकत पेशव्याच्याकडे आले आणि पायां धरून, विनवण्या करून, त्यांनीं पेशव्यांना परत जायला लावले.

**विपरीत श्रद्धा**

धर्म हा खाण्यापिण्यावर, शेंडीगंधावर, सोवळ्याओवळ्यावर—म्हणजे जड बाह्यरूपावरच अवलंबून आहे, आंतरिक निष्ठेचें त्यांत महत्त्व नाहीं अशी विपरीत श्रद्धा निर्माण करून हिंदुधर्मानें स्वतःच्या आसनाखालीं एक कायमचा सुरुंग लावून ठेवला आहे. त्यामुळें स्त्रीला ज्याप्रमाणें इच्छा नसली तरी बलात्कार करणाऱ्या पुरुषाचा गर्भ धारण करावा लागतो, त्याप्रमाणें हिंदुधर्मीयाला आपली मुळींच इच्छा नसली तरी परक्याचा धर्म स्वतःवर लादून घ्यावा लागतो. स्वधर्मावर त्याची कितीहि श्रद्धा असली, त्यासाठीं आत्मार्पण करण्यासहि तो सिद्ध असला तरी त्याचा उपयोग नाहीं. हिंदु रहाणें न राहणें हें त्याच्या हाती नाही. मुसलमानाना वाटलें याला मुसलमान करावें तर हिंदूला मुसलमान झालें पाहिजे. ख्रिस्त्याना वाटलें, याला ख्रिस्ती करावें तर त्याला प्रभु येशूच्या गटात गेलें पाहिजे. कारण धर्म ही नरोटीची उपासना आहे, श्रीफळाची नव्हे अशी हिंदूंची श्रद्धा आहे. काशीच्या ब्राह्मणांना असें वाटत नसतें तर त्यांना भीति कशाची होती? नबाबाने त्यांना बाटवलें असतें म्हणजे काय केलें असते? कांही अभक्ष्यभक्षण, अपेयपान करायला लावलें असतें. त्यांच्या शेंड्या कापल्या असत्या, त्यांचीं जानवीं तोडलीं असतीं, त्यांना लुंग्या नेसविल्या असत्या. पण अतरातल्या धर्मनिष्ठेला त्याला काडीमात्र धक्का लावता आला नसता. पण तीवर धर्म अवलबून नाहींच मुळीं! एखाद्यानें गंध, शेंडी, जानवे, गोमूत्र पिण्याचा अधिकार, यांना हात लावला नाहीं की त्याने आमच्या धर्मात हात घातला नाहीं असें होतें. आणि दुसऱ्या कोणी त्यांची छाटाछाट केली की त्यानें आमचा धर्म बुडविला असें ठरतें. काशीक्षेत्र हिंदुराज्यात यावें, तेथील प्रजेच्या स्वत्वाचें रक्षण व्हावें, तिला स्वाभिमानाने जगतां यावे, मुसलमानांनीं चालविलेल्या अत्याचारांना पायबंद बसावा, आपल्या स्त्रियाचें विटंबनेपासून रक्षण व्हावे, पुढे मागे रामाची अयोध्याहि हिंदुराजाच्या राज्यांत येऊन रामचद्राच्या जन्माच्या जागीं मशीद आहे ती जाऊन तेथे त्याचें मंदिर व्हावें, काशीविश्वेश्वराच्या देवळाच्या निम्म्या

भागांत मशीद आहे ती दूर व्हावी याचा हिंदुधर्माशीं कांहीं संबंध आहे असें त्या ब्राह्मणांचें मुळींच मत नव्हतें. शेंडी, गंध, गोमूत्र, पंचगव्य, यांवरच सर्व धर्म अवलंबून आहे, त्यांचें पालन, त्यांची उपासना हीच खरी हिंदु-धर्माची उपासना अशी त्यांची श्रद्धा असल्यामुळें मुसलमानांचेंच राज्य कायम ठेवावें अशी त्यांनीं हिंदुराजाला प्रार्थना केली. आणि त्यानेंहि ती ऐकली !

## धर्मभ्रष्ट म्हणजे काय ?

पन्नास पाऊणशें वर्षांपूर्वीं इंग्रजी विद्येचा आपल्या देशांत प्रसार होऊं लागला आणि त्यामुळें नवे आचार विचार सुरू झाले. त्यावेळीं धर्म बुडाला, आतां कलियुग आलें, विनाशकाल जवळ आला असे उद्गार सर्वत्र सनातनी लोकांच्या तोंडून ऐकूं येऊं लागले. घरोघरीं आईबाप, आपलीं मुलें धर्मभ्रष्ट झालीं—त्यावेळच्या भाषेंत—सुधारक झालीं, असें म्हणूं लागले होते. त्यावेळीं मुलें धर्मभ्रष्ट झालीं म्हणजे काय झालें, असें जर त्यांना कोणीं विचारलें असतें तर त्यांनीं काय उत्तर दिलें असतें ? विश्वनाथ नारायण मंडलीक, दादोबा पांडुरंग यांच्या चरित्रांत हीं उत्तरें सांपडतात. आमक्या दिवशीं हजामत करणें निषिद्ध असतांना ती केली, अमक्यावारीं अमुक खावयाचें नसतांना खाल्लें, घेऱ्याचा आकार कमी केला, एकादशीला बटाटे, रताळीं हें खाण्या-ऐवजीं मुळे, गवारी, गहूं हें खाल्लें, अशा स्वरूपाच्या त्या तक्रारी होत्या. धर्म म्हणजे मानसिक उन्नति आहे, धर्म म्हणजे हृदयाचा, सद्गुणांचा विकास आहे, असें कोणाच्या मनांतहि आलें नाहीं. धर्म म्हणजे संयम, निग्रह, भूतदया, परमेश्वरावरील श्रद्धा, सत्यनिष्ठा, दया, क्षमा, शांति, विद्येचा अभिलाष, स्वत्वाचा अभिमान असे अर्थच त्यावेळीं कोणी केले नाहींत. जडदेहाच्या संस्कारापलीकडे धर्म म्हणजे काहीं आहे अशी या जनांची समजूत असती तर त्यांनीं आपला मुलगा निग्रही नाहीं, दयाशून्य आहे, स्वत्वशून्य झाला आहे, अशा तक्रारी केल्या असत्या. पण त्याकाळच्या वाङ्मयांत अशा तक्रारी सांपडत नाहींत. धर्म म्हणजे केवळ जड आचार, त्याचा मनाशीं,

संस्कृतीशीं कांहींएक संबंध नाहीं, इतक्या विपरीत टोकाला कांहीं जणांची बुद्धि गेल्याची साक्ष संस्कृतांत आहे. एकादशीचें महत्त्व सांगतांना–

वरं हि मातृगमनं, वरं गोमांसभक्षणम्

ब्रह्महत्या, सुरापानं, एकादश्यां न भोजनम् ।

असें कालतरंगिणीकारानें म्हटलें आहे. जगांतलीं अत्यंत भयानक व किळसवाणीं अशीं पापें केलीं तरी चालतील, पण एकादशीला जेवलेलें चालणार नाहीं, असा त्याचा अभिप्राय आहे. आणि जेवणें याचा अर्थ भातभाकरी खाणें. बटाटे, साबुदाणा, इत्यादि पदार्थ खाणें हें भोजन नव्हे. जड शरीर आचाराला, धर्माच्या बाह्यस्वरूपाला, माणसें किती महत्त्व देऊं लागलीं होतीं, आणि तसें करतांना त्यांची बुद्धि किती बहकली होती, किती पतित झाली होती तें यावरून कळून येईल.

कोणत्याहि समाजाच्या ऱ्हासकाळाचें हें प्रधान लक्षण आहे. या काळीं तो समाज मूलतत्त्वांपासून लांब जाऊन जडाचा उपासक बनतो. बहुतेक सर्व तत्त्वें, संस्था, निष्ठा या प्रथम मानवाच्या कल्याणासाठीं निर्माण झालेल्या असतात. सर्व मानवांना इहलोकींचीं व परलोकींचीं सुखें मिळावीं, त्यांच्यांत प्रेमभाव नांदावा, समाजाचें रक्षण व्हावें, त्यांत समता, बंधुता, स्वातंत्र्य हीं नांदावीं, प्रत्येकाला उन्नतीला अवसर मिळावा इत्यादि अनेक हेतु मूळ प्रवर्तकाच्या मनांत असतात. त्यासाठीं तो कांहीं सिद्धान्त सांगतो, एखादी संस्था किंवा मठ स्थापन करतो, कांहीं आचार आवश्यक म्हणून सांगतो आणि प्रारंभींच्या काळांत तो अंतिम हेतु लोकांच्या मनांत असेपर्यंत त्या संस्थेचा कारभार व लोकांचे आचार यांना अर्थ असतो. पण पुढें पुढें मूळ हेतु हा जो आत्मा तो नाहींसा होऊन केवळ कलेवर शिल्लक रहातें. तें कुजूं लागलें तरी लोक त्यालाच लोभावलेले असतात. आणि मग त्याच्या दुर्गंधीनें, त्यांतील जंतूंमुळें समाजपुरुषाचा नाश होतो.

**तत्त्वांना जडरूप**

पण माणसाच्या मनाची ही ठेवणच होऊन बसली आहे. आपल्या कृति

व त्यांच्यामागील प्रेरक हेतु यांच्यांत विसंगति निर्माण होत नाहीना हें पहात रहाणें त्याला नको असतें. त्याची दगदग त्याला झेपत नाहीं. नित्य जागरूक रहाणें ही जिकीर त्याला सोसत नाहीं. सामान्य जनांना ही नाहींच सोसत. पण समाजधुरीणहि तिचा कंटाळा करतात. किंवा ती सोसण्याची ऐपत त्यांच्या ठायींहि नसते. म्हणून ते थोर तत्त्वांना जडरूप देतात आणि तोच खरा धर्म असें स्वतःच्या मनाचें समाधान करतात. अकबराच्या स्वाऱ्यामुळें राणा प्रतापसिंहजी यांना चितोड सोडून रानोमाळ भटकावें लागत होतें. आणि अखेरीस चितोड परत घेण्याची त्यांची आकांक्षा तृप्त न होतांच त्यांना कालवश व्हावे लागलें. त्यावेळीं त्यांचे अनुयायी, त्यांचे वारस, वंशज यांनी प्रतिज्ञा केली कीं, चितोड परत मिळेपर्यंत आम्ही गवतावर निजूं, गादीवर निजणार नाही, पानावर जेवूं, चांदीच्या ताटात जेवणार नाहीं. पुढें ही घोर प्रतिज्ञा पार पाडण्याचें सामर्थ्य त्याच्या वंशजात राहिले नाहीं. आणि प्रतिज्ञा पार पाडीपर्यंत तें बिकट व्रत संभाळण्याचा कणखरपणा, ती तीव्र निष्ठा त्यांच्या ठायीं नव्हती. तेव्हां त्यांनीं निष्ठेला जडरूप दिलें. ते मांडलीक म्हणून चितोडला परत आले, सुखासीन झाले, गादीवर निजू लागले, चांदीच्या, सोन्याच्या ताटांत जेवूं लागले. पण त्यांनीं व्रतहि चालविलें. म्हणजे काय केले? मऊ परांच्या गादीखालीं ते थोडेसे गवत घालून ठेवीत व मग निजत, आणि सोन्याच्या ताटाखालीं एक वडाचें पान ठेवून मग जेवीत. अशा रीतीनें गवतावर निजूं, व पानावर जेवूं हीं व्रतें त्यांनीं अखंड आचरिली. नरोटीची उपासना ती हीच. त्या व्रतांतला स्वाभिमान, त्याग, तेज हा आत्मा नष्ट झाला होता. तें श्रीफल राणाजींच्या प्राणज्योतीबरोबर अंतर्धान पावलें होतें. फक्त शब्द राहिले होते. व्रताची यांत्रिक कृति उरली होती. कलेवर शिल्लक होतें. पण आपण प्रतिज्ञेचें पालन करीत आहों, आपण तिच्याशीं द्रोह केलेला नाहीं, ही त्या वंशजाची श्रद्धा तरीसुद्धां कायम होती.

मनुष्याच्या मनाचें हें जें दौर्बल्य, स्वत्वापासून, स्वधर्मापासून च्युत होऊन

जडाची उपासना करीत असतांना आपण धर्माचीच उपासना करीत आहोंत असें समाधान मानण्याची ही जी वृत्ति ती अर्वाचीन काळीं कमी झाली आहे असें मुळींच नाहीं. मार्क्सवाद, लोकसत्ता हे जे नवे युगधर्म त्यानें स्वीकारले आहेत, त्यांचें प्रतिपालनहि तो याच सनातन पद्धतीनें करीत आहे.

## मार्क्सधर्माचें जडरूप

भांडवलशाही नको असें मार्क्स कां म्हणाला? अल्पसंख्यांच्या हातीं सर्व धन एकवटतें आणि मग ते त्याच्या जोरावर सत्ता काबीज करून इतरांना छळतात, नागवितात म्हणून. रशियानें मार्क्सवाद स्वीकारला. भांडवलदार, जमीनदार नष्ट केले. पण सर्व धन पुन्हां सत्ताधारी अल्पसंख्याच्या हातींच आणून ठेविलें. पूर्वी भांडवलदारांचे राजसत्तेवर वर्चस्व असे, पण तें दूरतः, अप्रत्यक्षपणें असें. आतां सत्ता व धन एकाच अल्पसंख्य गटाच्या हातीं देऊन रशियानें जास्तच भयानक परिस्थिति निर्माण केली आहे. तरी पण आपण मार्क्सधर्म पाळीत आहोंत, हे त्याचें समाधान अभग आहे! भांडवलदार नष्ट केल्यानतर सैन्य, पोलीस, तुरुंग हीं चोवीस तासांच्या आत नाहींशीं केलीं पाहिजेत; कारण याच्याच बळावर सत्ताधारी लोक नागरिकांना छळीत असतात, ही मार्क्सची पहिली अट रशियाच्या धुरीणांनी दृष्टीआड केली आहे. मार्क्स म्हणाला की, भांडवलशाही नष्ट केल्यावर कामगारांचें राज्य झाले पाहिजे. सर्व दलिताच्या व्यक्तिमत्वविकासाला अवसर मिळावा, जीवनाचीं, उत्कर्षाचीं किमान साधनें सर्वांना सुलभ व्हावी हा त्या महापुरुषाचा तसें सांगण्यांत हेतु होता. रशियांत 'कामगारांचें राज्य' या घोषणा चालू आहेत, कामगारांना मतदानाचा अधिकार दिला आहे. पण कारखाने व एकंदर कारभार यांचें नियंत्रण सरकारनें स्वतः नेमलेल्या अधिकाऱ्याकडे देऊन, सर्व सुलतानी अधिकार त्याच्याकडे सुपूर्द करून या कामगारराज्याचा हेतु विफल करून टाकिला आहे. राजसत्तेचे अधिकार राहोच, साधा संप करण्याचा अधिकारहि कामगारांना नाहीं. त्यांना फक्त स्टॅलिनचा जयजयकार

करण्याचा व परदेशांतल्या प्रवाश्यांच्या पुढें आपल्या सुखाचें प्रदर्शन मांडण्याचा अधिकार आहे. मार्क्सधर्माचें पालन तें हेंच.

मार्क्सधर्मात क्रांति, उत्पात, स्फोट, विध्वंस यांना फार महत्त्व आहे. विरोधविकासवाद हें या धर्मातील आदितत्त्व आहे. जगाची प्रगति साध्या-विकास पद्धतीनें न होतां दर वेळीं संघर्ष, द्वंद, उत्पात होऊन त्यांतून प्रगति होते असें मार्क्सधर्म सांगतो. यांतील जगाची प्रगति, हा आत्मा काढून टाकून विध्वंस, अत्याचार, दंगेखोरी, बेदिली, फूट, एवढ्याचा मात्र कम्युनिस्ट लोक दर ठिकाणीं, जुन्या काळच्या शाक्तपंथीयांप्रमाणें आश्रय करतात. गेल्या पंचवीस वर्षांत फ्रान्स, जर्मनी, इटली, झेकोस्लोव्हाकिया, पोलंड, या देशांत दुही माजविणें, फूट पाडणें, अत्याचार करणें, दंगल माजविणें हा उद्योग त्यांनीं चालविला आहे. यामुळें त्या त्या देशांची कसलीहि प्रगति न होतां ते देश दुबळे होऊन बसले आहेत; किंवा होण्याच्या मार्गावर आहेत. तरी या अत्याचारांनीं आपण मार्क्सधर्मांचेंच प्रतिपालन करीत आहों, अशी मार्क्स-वाद्यांची श्रद्धा आहे.

धर्म ही अफू आहे, असें कार्ल मार्क्सनें सागून टाकलें होतें. परलोक पुनर्जन्म, स्वर्ग, या कल्पनांच्या नादीं लोकांना लावून त्यांच्यावर होणाऱ्या जुलुमाचा त्यांना विसर पाडणें, प्रतिकाराची त्यांची बुद्धि बधिर करून टाकणें हीं कामें धर्मानें केल्यामुळें त्यानें तसे उद्‌गार काढले होते. काल्पनिक सुखाच्या विलोभनानें लोकांचीं मनें बेहोष करून टाकून त्यांना वस्तुस्थितीचा विसर पाडणें हें पातक आहे, असा मार्क्सच्या विधानाचा आशय आहे. तो आशय सोव्हियेट नेते विसरले आहेत, एवढेंच नव्हे तर त्यांनीं मार्क्सधर्मालाच अफूचें स्वरूप दिलें आहे. स्टॅलिनचें ते परमेश्वराप्रमाणें गुणगान करतात. तो पृथ्वीवरच स्वर्ग आणून देणार आहे, कामगारांचें नंदनवन निर्माण करणार आहे, अशीं आश्वासनें देतात. कांहीं वर्षांनीं रशियांत विपुल, अतिविपुल समृद्धि निर्माण होणार आहे, प्रत्येकाला त्याच्या सगळ्या गरजा पुरवितां येतील इतकें धन आम्ही लवकरच देऊं, अशी अभिवचनें देतात. या कल्पना-

सृष्टींत रशियन कामगार गुंग आहेत. या सध्यांच्या जगांत सारखे विषप्रयोग व अन्यायी खटले चालू आहेत, कोटी दीड कोटी कामगारांना मजूरवाड्यांत, सैबेरियांत गुलामापेक्षांहि हीन जिणें जगावें लागत आहे, या घोर परिस्थितीचा त्यांना विसर पडावा यासाठींच ही योजना आहे.

शासनसंस्थेचा विलय, कामगारांचें नेतृत्व, जगांतील कामगारांची संघटना स्त्रीचें दास्य-विमोचन, व्यक्तीचें आर्थिक स्वातंत्र्य, आंतरराष्ट्रीयता, या प्रत्येक तत्त्वाच्या बाबतींत सोव्हियेट रशियानें नरोटीची उपासना चालविली आहे. त्यांतील श्रीफल नष्ट झालें आहे. त्यांनेंच तें नष्ट केलें आहे. आणि मुसलमानांच्या राज्यविस्तारासाठीं, हिंदुराज्यांच्या विनाशासाठीं तनमनधन अर्पण केलें तरी तो हिंदुधर्माशीं द्रोह होत नाहीं, ही ज्याप्रमाणें येथील समाजधुरीणांची श्रद्धा होती त्याचप्रमाणें मानवाचें व्यक्तित्व, त्याचें सुख, त्याची उन्नति, त्याचें सर्व क्षेत्रांतील स्वातंत्र्य यांना पदोपदीं हरताळ फांसूनहि आपण मार्क्सधर्माशीं द्रोह करीत नाहीं, अशी सोव्हियेट धुरीणांची अचल श्रद्धा आहे. मार्क्सवादाचा सांगाडा, त्याचें जडस्वरूप याला तें बिलगून बसले आहेत. आज त्यांनीं जाणूनच हें चालविलें आहे. कालांतरानें लोकांच्या तें अंगवळणीं पडेल, आणि खरा मार्क्सधर्म तो हाच, असें त्यांना वाटूं लागेल. गादीवर निजावयाचें व थोडें गवत गादीखालीं ठेवावयाचें, ताटांत जेवावयाचें पण एक पान त्याच्याखालीं ठेवावयाचें, एवढें केलें की राणाजींच्या मृत्युसमयीं केलेल्या प्रतिज्ञांचें पालन केल्याचें पुण्य मिळतें ही जशी रजपूत राजांची श्रद्धा होती त्याप्रमाणें शासन-यंत्र पूर्ण जोरांत चालवावयाचें पण त्याच्याखालीं एखादा कामगार उभा करावयाचा म्हणजे शासनसंस्थेचा नाश केल्याचें पुण्य मिळतें, अशी कार्ल मार्क्सच्या अनुयायांची दृढ, अढळ श्रद्धा आहे.

जिवंत तत्त्वाला जडरूप देऊन त्याचीच उपासना करीत बसावयाचें, आणि अशा रीतीनें त्याचा मूलहेतु विफल करून टाकावयाचा या मानवाच्या वृत्ती-मुळेंच जगांत आजपर्यंत अनेक थोर महात्मे जगदुद्धाराच्या प्रयत्नांत खर्ची पडूनहि जग आहे तेथेंच आहे. बुद्धाची अहिंसा, जीजसची दया, महात्मा-

जीचें सत्य या प्रत्येकाची मानवानें अशी दशा करून टाकली आहे. आज जेथें मार्क्सवाद नाहीं तेथें लोकशाहीची उपासना चालू आहे. पण तेथेंहि पद्धत हीच आहे; बाह्यरूपाविषयीं माणसें पराकाष्ठेची दक्षता दाखवितात. अंतरात्म्याची त्यांना काळजी नसते, इतकेंच नव्हे तर त्यांना त्याची दखलहि नसते. जड सांगाडा म्हणजेच लोकशाही अशी त्यांची श्रद्धा असते. निवडणुका, मतदान, लोकसभा, अध्यक्ष, उपाध्यक्ष, पॉइंट ऑफ् ऑर्डर, कोरम, सभासदांचे हक्क, मतमोजणी, यांविषयी लोक जसे दक्ष असतात तसे सर्व राष्ट्राची जबाबदारी प्रत्येकानें घेणें, समाजहितासाठी अंग झिजविणें, आपणच केलेल्या कायद्याचें पालन करणे, सार्वजनिक कारभार निर्मळ राखणें, बुद्धिवादाची जोपासना करणे, प्रत्येकाच्या कर्तृत्वाचा विकास करण्याचा प्रयत्न करणें—इत्यादिविषयीं मुळींच नसतात. लोकशाहीच्या धर्माच्या उपासनेंत याचा अंतर्भाव होतो हें त्याना वाटतच नसते. म्युनिसिपालिटीच्या खताच्या गाड्या आपल्या शेतात नेणें, जकात न देतां गांवांत माल आणणें, प्राप्तीवरील कर चुकविणें, आपल्या घराच्या सोयीनीं रस्ते करणें, पब्लिकसर्व्हिस कमिशनचे आदेश धुडकावून आपल्याच पित्त्यांची वर्णी लावणें, जातीयवादाला चिथावून निवडणुका लढविणें हे आचार करणाऱ्यांना ‘ तुम्ही लोकशाहीशीं द्रोह करीत आहां ’ असें जर कोणीं म्हटलें तर ते मिर्झा राजा जयसिंग यांच्याप्रमाणेंच चकित होतील. आपण मतदान केले आहे, निवडणुका लढविल्या आहेत, लोकसभेत भाषणें केलीं आहेत इत्यादि आपल्या आचारांकडे बोट दाखवून आपली लोकशाहीवरील श्रद्धा ते क्षणार्धात सिद्ध करतील.

## शिक्षणांतील कर्मकांड

जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत मनुष्याच्या या वृत्तीचा प्रत्यय आपणांस येतो. सध्यांच्या शिक्षणशास्त्राच्या व्यवहारांत तर तिचा कळस झालेला दृष्टीस पडतो. अमुक एका पद्धतीनेंच पाठ घेतला पाहिजे असा आग्रह या क्षेत्रात असतो. तो इतका कीं अर्थ न कळला तरी चालेल, विषय न समजला तरी चालेल, पण पद्धत अवलंबिली गेलीच पाहिजे अशीं उत्तरें तज्ज्ञ म्हणविल्या जाणाऱ्या

शिक्षकांनीं दिलेलीं मीं ऐकलीं आहेत. हा रानटीपणाचा कळस आहे. आणि या रानटीपणावर शिक्कामोर्तब झालेलें आहे. पाठांची परीक्षा घेणारे जे परीक्षक त्यांना पाठाचा विषय येत नसला तरी चालतें. कित्येक वेळां तो येत नसतो. संस्कृताचा गंधहि नसणारा परीक्षक संस्कृतचा पाठ किंवा रसायनांत मुळींच गति नसणारा मनुष्य रसायनाचा पाठ पाहून त्या शिक्षकाला पासनापास करतो. आणि हें शास्त्राला, विद्यालयांना व विद्यापीठांनाहि मंजूर आहे. याचा अर्थ असा कीं अध्यापन ही एक कसरत झाली आहे. ही कर्मकांडांतील प्रक्रिया झाली आहे. अमुक कृति केली कीं अमुक फल मिळतें, असें अंधपणें अदृष्टधर्मांतल्याप्रमाणें येथें ठरविलें जातें. तेथें कार्यकारण, अनुभव, प्रत्यक्ष मूल्यमापन यांचा संबंध राहिलेला नाहीं. कांहीं हातवारे झाले कीं जादू होते. त्याप्रमाणें कांहीं ठराविक चाकोरींतून शिक्षक वा विद्यार्थी यांचीं प्रश्नोत्तरें व तदनुषंगानें कांहीं हातवारे झाले कीं अध्यापनाचें कार्य झालें अशी शिक्षकांची श्रद्धा आहे आणि या शिक्षणामुळें मुलांच्या बुद्धीचा, कर्तृत्वाचा, चारित्र्याचा विकास कितपत झाला याचें मापन पुढे कोणीच करीत नसल्यामुळें कर्मकांडाचें फल स्वर्गांत किंवा नरकांत किती मिळतें हे जसें अज्ञात आहे तसें या पद्धतीचें झालें आहे. निश्चित ज्ञान, जिज्ञासा, चारित्र्य, कर्तृत्व हा जो आत्मा तो बुद्धिपुरस्सर दुर्लक्षिला जावा ही नरोटीच्या उपासनेची अगदी परमसीमा होय.

मावळांतील खेड्यांत गणेशचतुर्थीच्या दिवशीं शेतकरी शेतांत जाऊन पिकाच्या मध्यभागीं झाडाची एक लहानशी फांदी पुरून ठेवतो. ही चाल आज अनेक वर्षे रूढ आहे. तसें करण्याचें कारण तेथें कोणालाच माहीत नाहीं. एका जुन्या पुस्तकांत त्याचें कारण पुढीलप्रमाणे दिलेलें आहे. या महिन्यापासून पाऊस कमी होतो. शेतजमीन थोडी उघडी पडते व मग तेथें उंदीर फिरूं लागतात आणि पिकांची खराबी करतात. शेतांत यावेळीं पुरुषभर उंच असे डांभे पुरून ठेवले कीं त्यावर कावळे येऊन बसतात व ते उंदरांना मारतात. त्या भयानें मग उंदीर येईनासे होऊन पिकांची खराबी

होत नाहीं. पण शेतकऱ्यांना यांतलें कांहींच माहीत नाहीं. ते हा एक धार्मिक विधि म्हणून करतात. त्याचें फल सर्व धार्मिक विधीप्रमाणें अदृष्टच आहे. त्यामुळें म्हणजे फलाचें मूल्यमापन नसल्यामुळें, हेतु व कृति यांचा प्रत्यक्ष संबंध अज्ञात राहिल्याकारणानें शेतकरी दहापंधरा डांभे न पुरता एकच पुरतात व तोहि साधारण हातभर उंचीचा! तो पिकाच्या खालीं झांकून जात असल्यामुळें त्याचा कांहींच उपयोग नसतो. पण धार्मिक विधीच्या प्रत्यक्ष उपयोगाची चिकित्सा करावयाचीच नसते. यांत्रिक कसरत झाली कीं आपलें काम संपलें, पुढें सर्व दैवाधीन आहे अशीच भावना असते.

आपले वनमहोत्सव, आपल्या 'अधिक धान्य पिकवा' यासारख्या मोहिमा, आपला ग्रामोद्धार, आपल्या विकास योजना, या सर्वांना कालांतरानें हें धर्म-विधीचें रूप प्राप्त होणार आहे अशी मला भीति वाटते. अन्नधान्याच्या मोहिमा कां फसल्या याची चिकित्सा करतांना अनेक तज्ज्ञांनीं असें सांगितलें आहे कीं, नेमलेल्या अधिकाऱ्यांनीं जड यंत्राप्रमाणें हुकमाची तालीम करण्या-पलीकडे कांहींच केलें नाहीं. विहिरी खणा म्हटलें तेव्हां त्यांनीं विहिरी खणल्या. गांवांत जुन्या विहिरी किती आहेत, डागडुजीनें दुरुस्त किती होऊं शकतील, त्यांचें पाणी किती पुरेल याचा विचारहि त्यांनीं केला नाहीं. विहिरी खणणें हा त्यांच्या मतें अदृष्टफल देणारा धार्मिक विधि होता. तो त्यांनीं केला. खतें वाटणें, शेतकऱ्यांना बियाण्याचा पुरवठा करणें, तगाई देणें या सर्वांचा कारभार असाच चालू आहे. कांहींनीं तर पुण्यामुंबईच्या ऑफीसांत बसून, इतकीं खतें दिलीं आहेत, इतकें बीं दिलें आहे, तेव्हां इतकें पीक येणारच असा हिशेब करून वर्षअखेर तसा अहवालहि लिहून टाकला. कांहीं अभ्यासकांनीं अशी तक्रार केली आहे कीं हिंदुस्थान सरकारकडे येणारे पुष्कळ आंकडे असे असतात. वनमहोत्सवांतहि असे अनेक प्रकार घडल्याचें ऐकू येतें. झाडे लावा असा हुकूम येतांच झाडें लावलीं गेलीं. त्यांची निगा, त्यांचें खत पाणी, त्यांची उपयुक्तता, त्यांतील तारतम्य याचा विचार बऱ्याच ठिकाणीं झाला नाहीं. म्हणजे हा धर्मविधि झाला. हें कर्मकांड झालें.

आज या योजना आंखतांना त्या योजकांच्या मनांत हेतु स्पष्ट असतो. तो वर्तमानपत्रांतून जाहीर झालेला असतो. त्यावर व्याख्यानें करविलेलीं असतात. असें असूनहि त्यांचा व्यवहार होतांना हेतु व कृति यांचा संबंध स्पष्ट रहात नाहीं, हेतूचा विसर पडतो, विपर्यास होतो व कृती अर्थशून्य होऊन त्यांना धार्मिक विधींचे व कर्मकांडाचें रूप येतें. मग कालांतरानें काय होईल याची सहज कल्पना करतां येईल. शेंडी, घेरा, गंध, स्नानसंध्येच्या वेळचे हातवारे, या जशा जुन्या कसरती आहेत, त्याचप्रमाणें आरोग्य-सप्ताहांतील स्वच्छता, वनमहोत्सवांतील वृक्षारोपण, गांधीसप्ताहांतील सूतकताई, बी. टी. कॉलेजमधील शिक्षकांचे पाठ, अन्नधान्य मोहिमेंतील विहिरी खणणें, बांध घालणें, खतें टाकणें, ग्रामविकास योजनेंतील चरांचे संडास, खतांचे खड्डे, यांना कसरतीचें स्वरूप येईल. आणि राष्ट्रद्रोहाचीं इतर कृत्यें कितीहि केलीं तरी सूतकताई, खतांचे खड्डे, वृक्षारोपण, चरांचे संडास यांकडे बोट दाखवून त्यावेळचे नागरिक आपण पूर्ण राष्ट्रनिष्ठ असल्याची ग्वाही देतील. राष्ट्रधर्म तो हाच अशीच त्यांची श्रद्धा होईल. मग पाकिस्तानशीं संगनमत करणें, पोलिसी राज्य प्रस्थापित करणें, जातीयता पेटवून तिच्या आधारें अधिकारारूढ होणें, घटनेचा दरक्षणीं उपमर्द करणें यांसारखीं पातकें करूनहि आपण राष्ट्राशीं किंवा लोकशाहीच्या तत्त्वाशीं द्रोह केला असें त्यांच्या स्वप्नांतहि येणार नाहीं. त्यांच्यावर तसा कोणीं आरोप केला, तर ते मिझो राजाप्रमाणें विस्मित होतील. कारण राष्ट्रनिष्ठा, लोकशाही यांचे तोपर्यंत सांगाडे बनलेले असतील आणि तेंच त्यांचें उच्चरूप अशी श्रद्धा त्यांच्या मनांत दृढ होऊन जाईल. मग धर्माप्रमाणेंच राष्ट्रनिष्ठा, लोकसत्ता यांची विटंबना होईल. आज होतच आहे. पण ती स्वार्थी हेतूनें, दुष्टपणानें होत आहे. पुढें श्रद्धेनें, भाविकपणें होऊं लागेल. कारण तेंच राष्ट्रधर्माचें रूप, तोच उच्च राष्ट्रधर्म, तीच खरी लोकसत्ता असा भोळा भाव लोकांच्या मनांत दृढ होईल.

जुनें धर्मशास्त्र व आर्वाचीन मार्क्सवाद यांच्या प्रवर्तकांनीं एक गोष्ट

गृहीत धरलेली आहे. एकदा समाजाला कांहीं व्यवस्था लावून दिली, कीं ती कायम टिकते, तसा| तिच्यांत स्वयंभू गुण असतो असा त्यांचा समज आहे. हा समज अगदीं भ्रामक आहे. मानव हा चल घटक आहे. तो घोटीव नियमांत कधींहि बसत नाही. त्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें दरवेळीं त्या त्या काळीं प्रवर्तित केलेल्या धर्मतत्त्वांतील आत्मा कालांतरानें नष्ट होतो, व त्याला जडरूप येतें. म्हणून ही गृहीत गोष्ट चूक आहे हें ध्यानांत घेऊन आपण सतत जागरून राहिलें पाहिजे. लोकशाहीला अखंड जागरूकता, सावधानता अवश्य असते, असें नेहमीं म्हणतात. पण कोणच्याहि समाजव्यवस्थेला या सावधतेची आवश्यकता आहे असें दिसून येईल. आपल्या डोळ्यांवर क्षणभर जरी झांपड आली, मुहूर्तभर जरी आपण बेसावध राहिलों तरी आपल्या हातांतलें श्रीफल नाहीसें होऊन नरोटी तेवढी शिल्लक राहील. म्हणून—

न हि प्रमादात् परमस्ति कश्चिन् । वधो नराणामिह जीवलोके
प्रमत्तमर्थाहि नरं समन्तात् । त्यजन्त्यनर्थाश्च समाविशन्ति ।

( या लोकीं मनुष्यांना बेसावधपणापेक्षां घातक असें कांहींच नाहीं. बेसावध मनुष्याला सर्व प्रकारचें वैभव सोडून जातें व त्याला आपत्ति चहूं बाजूंनीं घेरतात ) महाभारत—सौप्तिकपर्व १०।१९

या वचनाची जाणीव नित्य ठेवून आपल्या समाजरचनेच्या तत्त्वांना जडरूप येऊं नये अशी आपण सतत चिंता वाहिली पाहिजे.

नोव्हेंबर १९५३

# ३. भारतीय जीवनांतील क्रिकेट व हॉकी

## जीवनाचें प्रतिबिंब

क्रिकेटचा खेळ हें इंग्लिश राष्ट्राच्या जीवनाचें प्रतिबिंब आहे असें म्हणतात. इंग्लिशांची जीवनाकडे पहाण्याची वृत्ति, त्यांची चिकाटी, शिस्त, धिम्मेपणा, दिलदारी या सर्व राष्ट्रीय गुणांचें आपणांस त्यांच्या क्रिकेटच्या खेळांत दर्शन घडतें. वॉटर्लूची लढाई जिंकली तेव्हां इंग्रजानीं जे गुण प्रगट केले त्या सर्वांचा विकास ईटन व हॅरो या इंग्लंडमधील दोन शाळांच्या खेळाच्या मैदानावर झाला होता असें नेहमीच सांगितलें जातें. गेलीं पन्नास पाउणशें वर्षे आपण भारतीयांनीहि हा क्रिकेटचा खेळ उचलून आत्मसात केला आहे. त्यांत प्राविण्यहि संपादन केलें आहे. आणि फार...फार निराळ्या अर्थानें तो खेळ आपल्याहि राष्ट्रीय जीवनाचें प्रतिबिंब होऊन बसला आहे!

फार निराळ्या अर्थानें म्हणजे कोणत्या ?

## फार निराळा अर्थ

या खेळांत भारतीयांनीं अगदीं असामान्य प्रभुत्व संपादन केलें आहे यांत शंका नाही. रणजी, धुलीप हीं नांवे क्रिकेट खेळणाऱ्या सर्व देशांत गाजलीं आहेत. रणजी हे तर त्या खेळाचे राजे, तो खेळ खेळणाऱ्यांचे परात्पर गुरु होऊन बसले आहेत. कॅ. नायडू, देवधर, जोशी, पै, विठ्ठल हीं पूर्वींचीं आणि मर्चंट, मनकड, हजारे, अमरसिंग हीं आतांचीं नांवेंहि या क्षेत्रात फार उंच जागीं आरूढ होऊन बसलीं आहेत. इंग्लंडमध्येंहि त्यांना फार मान आहे. तेथील खेळाडूंच्या बरोबरीचा, क्वचित् वरचाहि मान त्यांना दिला जातो. हें सर्व पाहून एक विचार सारखा मनांत येत असतो; तो आज येथे विशद करून मांडावयाचा आहे. आमचे हे खेळाडू, वैयक्तिक रीतीने पाहिले तर जगांतील कोणत्याहि संघांतल्या खेळाडूंच्या तोलाचे आहेत असें दिसतें. मर्चंट, अमरसिंग, मनकड, हजारे हे तर इंग्लंड-ऑस्ट्रेलियांतील अव्वल दर्जाच्या खेळाडूंच्याहि तोडीचे आहेत; यांनी कांही गुण त्यांनाहि शिकवावे अशी यांची योग्यता आहे. हे आम्हीच म्हणतों असें नाहीं; इंग्लिश

लोकांनींहि याच सुरांत त्यांची मुक्त कंठानें स्तुति केली आहे. असें असल्या-मुळें मनांत एक कल्पना, एक आशा, एक स्वप्न नेहमीं उभें राहतें. हे एकेक खेळाडू जर असे भारी आहेत, तर असे अकरा खेळाडू एकत्र आणून त्यांचा संघ केला, तर तो संघ निश्चितच अजिंक्य होईल !

**एक विचित्र हिशेब !**

तर्कानें, गणिताच्या हिशेबानें हें बरोबर आहे. पण स्वप्नसृष्टि ही असल्या हिशेबानें चालत नाहीं. तिचे स्वतंत्र कायदे आहेत. ते कायदे प्रबल ठरतात आणि आमचें स्वप्न भंगून जातें ! ती आशा सफल होत नाहीं; ती कल्पना वाऱ्यावर विरून जाते. भारतीय जीवनांतला; हा सर्वांत मोठा दोष आहे. आमच्यांत हत्तींचें बळ असलेले अनेक पुरुष सांपडतात; पण असे अकरा पुरुष एकत्र झाल्यावर त्यांच्या संघांत अकरा हत्तींच्यापेक्षां जास्त बळ निर्माण व्हावें. तसें न होतां तें कमी होतें ! एकेकटे असतांना शूर व समर्थ असणारे हे पुरुष एकत्र येतांच त्यांचें सामर्थ्य वृद्धिंगत होण्याऐवजीं कमी होतें ! वैयक्तिक दृष्टीनें आम्ही वाटेल तितकें उंच–अगदीं नक्षत्रापर्यंत जाऊं शकतों; पण समाज म्हणून, संघ म्हणून एकत्र येऊन त्यापेक्षांहि जास्त उंच जावें हें आम्हांला जमत नाहीं. आम्हीं खालींखालींच जातों. सांघिक, सामाजिक, सामुदायिक जीवनाची राजविद्या निराळीच आहे. ती आम्हीं हस्तगत केलेली नाहीं.

नेपोलियननें एकदा रणांगणांतला एक हिशेब सांगितला होता. फ्रेंच सेना घेऊन तो इजिप्तमध्यें गेला होता. तेथील अरबांच्या एका जमातीचें नांव ' मामेलुक ' असें होतें. ते लोक अंगापिंडानें कणखर व शरीराने धिप्पाड होते. फ्रेंच लोक त्या मानानें बारीक दिसत. तेव्हां या धिप्पाड लोकांशीं लढतांना फ्रेंचांचा धीर खचूं नये, त्यांचा आत्मविश्वास ढळूं नये म्हणून त्यानें फ्रेंचांना मानवी गणिताचा हिशेब सांगितला. तो म्हणाला, एक फ्रेंच व एक मामेलुक यांचा सामना झाला तर मामेलुक निश्चित भारी आहे. शंभर फ्रेंच व शंभर मामेलुक असा सामना झाला तर बरोबरी होईल. आणि दहा हजार फ्रेंच व एक लक्ष मामेलुक अशी लढाई झाली, तर फ्रेंच मामेलुकांचा सपशेल

पराभव करतील ! याचा अर्थ असा, कीं फ्रेंचांची संख्या वाढत जाते तसतसें त्यांचें बळ संख्येपेक्षां जास्त होत जातें आणि मामेलुकांची संख्या वाढूं लागली कीं ते कमजोर होत जातात ! हें मानवी गणित आहे. जड वस्तूंच्या गणिता-पेक्षां तें फार निराळें आहे.

आपण भारतीय हे मामेलुकांच्या गणितांत बसतों; फ्रेंचांच्या नाहीं. वैयक्तिक हिशेब केला तर आपण खरोखरच जगांत अद्वितीय ठरूं; पण आपण संघ करूं लागलों, चार माणसें एकत्र आलों कीं आपलें सामर्थ्य तितक्या पटीनें न वाढतां उलट कमी होतें. असें कां व्हावें याची मीमांसा करावयाची आहे. पण तसें करण्यापूर्वी आपण वैयक्तिक दृष्टीनें खरोखरच कसे गुणसंपन्न आहों हें दिग्दर्शित करतों. म्हणजे याच गुणाची संघटना केली तर जगांत आपण पराक्रमाच्या कोणत्या कोटी करूं शकूं त्याची कल्पना येईल.

### त्यांचें सामुदायिक जीवनांतील सामर्थ्य

यासाठीं जपानशीं तुलना करणें उद्बोधक होईल. आपली अर्वाचीन काळांतील सर्व प्रगति ब्रिटिश विद्येच्या प्रसारानंतरची म्हणजे शंभर-सव्वाशें वर्षांतली आहे. अर्वाचीन जपानचा उत्कर्ष त्याच काळांतला आहे. मेजी युगापासून जवळजवळ गेलीं पाउणशें वर्षें जपान प्रगतीच्या मार्गानें अत्यंत वेगानें अंतर कापीत चालला आहे. समाजाची पुनर्घटना, औद्योगीकरण, राष्ट्रनिष्ठा, विज्ञान—अभ्यास, लष्करी सामर्थ्य या बाबतींत जगाला थक्क करून सोडील अशा गतीनें जपान चालला आहे. पण असें असूनहि जपानच्या या सर्व वैभवांतील एक वैगुण्य जाणवल्याखेरीज राहात नाहीं. आम्ही भारतीय वैयक्तिक कर्तृत्व निर्माण करूं शकतों, सामुदायिक जीवनाचा उत्कर्ष आम्हांस साधत नाहीं. जपान दुसऱ्या टोकाला आहे. सामुदायिक जीवनांतील सामर्थ्याची त्यानें अगदी तड गांठली आहे; पण वैयक्तिक वैभवांत जपान फार खुजा आहे. गेल्या शंभर वर्षांत किंवा त्याच्या मागल्या काळांतहि जगाचे डोळे आपल्या गुणवैभवानें, व्यक्तित्वानें दिपवील असा एकहि महापुरुष

जपानमध्यें झाला नाही. अॅब्राहाम लिंकन, रूझवेल्ट, लेनिन, एडिसन, मेरी क्युरी, डार्विन, पाव्हलाव्ह, शॉ, इब्सेन, गॉर्की, टॉलस्टॉय, नेपोलियन, नेल्सन, आयसेनहोअर, नॉर्मा शेअरर, ग्रेटा गार्बो, पॉल म्युनी यांसारखें एकहि नांव जपानच्या इतिहासांतून ऐकूं येत नाहीं.

उलट हिंदुस्थानच्या गेल्या शंभर वर्षांच्या इतिहासांतच अशी कितीतरी नांवें आढळतात. टिळक, सावरकर, महात्माजी, नेहरू, सुभाषचंद्र, जगदीशचंद्र, चंद्रशेखर रमण, सुब्बाराव, (अमेरिकेंतील) शंकरराव गोखले, भाभा, राममोहन रॉय, विवेकानंद, रवींद्रनाथ, शरच्चंद्र, राधाकृष्णन्, उदयशंकर या व्यक्तींची कीर्ति जगांत दुमदुमली आहे. याच्या तोडीचा एकहि पुरुष जपानमध्यें निर्माण झाला नाही. आपल्या भूमीचें हें वैभव स्पृहणीय आहे यांत शंका नाही; पण असे असूनहि गेल्या पन्नास वर्षांत जपानने सामुदायिक जीवनांत जें अलौकिक सामर्थ्य निर्माण केले आहे, त्याच्या शतांशानेंहि आपल्याला निर्माण करता आलेलें नाहीं. या गोष्टीचा आपण अगदीं जिवाला लावून घेऊन विचार केला पाहिजे.

## अपयश वैयक्तिक व राष्ट्रीय

मला याची जी कांही मीमांसा सांगावीशी वाटते, ती स्पष्ट करण्यासाठीं दोन उदाहरणे सांगतो. १७६१ सालीं पानपतची लढाई झाली. तीत दोनप्रहरपर्यंत विजयश्री मराठ्यांची होती. पुढें विश्वासराव पडले आणि सैन्य एकदम कच खाऊन सैरावैरा धावूं लागलें. अशा वेळीं भाऊसाहेब वीराच्या आवेशाने एकदम सैन्यांत घुसलें व त्यांनी धारातीर्थी आत्मार्पण केलें. हें दिव्य करतांना त्याच्या मनांत असे आलें, कीं आपण पुण्याहून एवढ्या प्रतिज्ञा करून आलों, आतां हें अपयशी तोंड पुण्याला कसें दाखवावें? या स्थितींत जगणें असह्य आहे, असे म्हणून त्या वीर पुरुषानें मृत्यूला कवटाळलें. वैयक्तिक जीवनाच्या दृष्टीनें भाऊसाहेबांचें हें कृत्य भूषणावह असेंच आहे. जो आत्मार्पणाला सिद्ध झाला, त्याच्यापुढें आपलें मस्तक नम्र झालेंच पाहिजे.

पण तसें नम्र करून, सामाजिक जीवनाच्या दृष्टीनें भाऊसाहेबांच्या या कृत्याचें मूल्यमापन करण्यास हरकत नाहीं. मराठी सत्तेच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें, हिंदवी स्वराज्याच्या दृष्टीनें भाऊसाहेबांनी असें करावयास नको होतें असें वाटतें. त्या वेळीं शांत मनाने रणांतून माघार घेऊन, जितकें सैन्य बचावणें शक्य होते तितकें बचावून, अपयश पतकरून, पुण्याला अपयशी तोंड दाखविण्याची आपत्ति त्यांनी स्वीकारावयास हवी होती. त्यांत वैयक्तिक मानहानि झाली असती हे खरे आहे; पण राष्ट्राचें मोठें सैन्य आणि मग राष्ट्राचें मोठें धन सुरक्षित राहून त्या पराभवाचा काळिमा धुऊन काढतां आला असता. वैयक्तिक अपयश व राष्ट्राचें अपयश यांत भाऊसाहेबांनीं पहिल्याची परवा न करतां, दुसऱ्याची चिंता वाहणें अवश्य होतें.

पण आपल्याकडे शौर्यधैर्याच्या, वीरपरंपरेच्या, क्षात्रधर्माच्या कसोट्या अशा पहात नाहींत. रजपूत लोक, रणांतून परत फिरावयाचें नाहीं, अशा प्रतिज्ञेनें निघत व धारातीर्थी देह ठेवीत. वैयक्तिक शौर्याचीं व त्यागाची ती परम सीमा होय हें खरें आहें; पण थोडा वैयक्तिक कमीपणा पतकरून, हें वैभव सोडून देऊन रजपूत वीरांनी त्या त्या वेळीं माघार घेऊन, पुन्हां तयारी करून शिवछत्रपतींच्याप्रमाणें पुन्हां चढाई केली असती तर मुसलमानांचें आक्रमण कायमचे मोडून काढण्यांत पुढे मराठ्याना जें यश आले तें आधींच रजपुताना आलें असते; आणि राजस्थानची व मग अखिल भारताची राष्ट्रीय हानि टळली असती. वैयक्तिक क्षात्रधर्माच्या अतिरिक्त कल्पनेमुळें इतके रजपूत वीर रणांत पडले, मारले गेले, कीं राजस्थान या राष्ट्राचा त्यामुळे कणाच मोडून गेला.

## हा विवेक फार मोलाचा !

भाऊसाहेब किंवा हे रजपूत वीर यांचें हें कांहींसें मनोदौर्बल्य होय असें म्हटले तर वाचकांना तें अत्यंत विपरीत वाटेल. म्हणून इंग्रज या बाबतींत कसा विचार करतात तें सागून पाहतों. पटलें तर पटेलहि. ट्राफल्गारच्या

लढाईत नेल्सन हा इंग्लिशांचा अत्यंत मोठा सेनापति कामास आला. आरमारी लढाई चालू होती; नेल्सन हा अगदीं वरच्या बाजूला डेकवर उभा राहून आज्ञा देत होता. त्यानें त्या वेळीं क्राऊन, इपॉलेट इत्यादि त्याच्या थोर सेनापतिपदाचीं सर्व बिरुदें अंगावर धारण केलीं होतीं. त्यामुळें तो सहज ओळखूं येऊन फ्रेंच गोलंदाज नेमका त्याच्यावर गोळा टाकतील अशी भीति वाटून, त्याचे सरदार त्याला विनवूं लागले, कीं "महाराज, आपण एक तर हीं बिरुदें उतरून ठेवा किंवा लढाई आम्ही सांभाळतों, तिच्यावर लक्ष ठेवून आपण केबिनमध्यें बसून नुसत्या आज्ञा द्या." पण नेल्सननें यांतलें कांहींच मान्य केलें नाहीं. "हीं बिरुदें मीं भूषण म्हणून मिळविलीं आहेत आणि भूषण म्हणूनच मी तीं छातीवर धारण करीन" असें त्यानें उत्तर दिलें. दुर्दैवानें त्याच्या अधिकाऱ्यांची भीति खरी ठरली. फ्रेंचांनीं त्या बिरुदांवरून त्याला ओळखून त्याच्यावर नेमका गोळा टाकला आणि त्यामुळें भयंकर जखमी होऊन शेवटीं नेल्सन मृत्यु पावला. या घटनेचें वर्णन करून तिच्यावर भाष्य करतांना नेल्सनचा चरित्रकार साऊदे यानें म्हटलें आहे, "थोर पुरुषाच्या मनाला हा मोह शेवटीं वश करतोच; हें दौर्बल्य त्याच्या ठायीं शेवटीं दिसतेंच."

नेल्सनवर साउदेनें ही जी टीका केली आहे ती अतिशय वरच्या मूल्यमापनांतून केली आहे. आपल्या राष्ट्रासाठीं प्राणाचें बलिदान करणाऱ्या थोर पुरुषाच्या मनाचें हें फार सूक्ष्मपणें केलेलें विश्लेषण आहे आणि त्यांतून दिसून आलेलें हें वैगुण्य आहे. आघाडीवर जाऊन निर्भयतेनें प्राणत्याग करणें जेथें अवश्य असेल, त्यावरच सैन्याचें चैतन्य व अंतिम यश अवलंबून असेल, तेथें तें करणें अवश्यच आहे. तेथें माघार घ्यावी असें कोणीच म्हणणार नाहीं. पण कांहीं प्रसंग असे येतात, कीं याच्या उलट धोरण ठेवणें विजयाच्या दृष्टीनें अवश्य असतें. पण कित्येक थोर पुरुषांच्या प्रकृतीला तें मानवत नाहीं; त्यांना यांत कमीपणा वाटतो. पण राष्ट्रासाठीं, अंतिम यशासाठीं तो पत्करणें अवश्य असतें. तेथें आत्मार्पण हें व्यक्तीच्या यशाला पोषक, पण राष्ट्राच्या

हिताला मारक असतें. तरीहि जे थोर पुरुष हा विवेक न करतां आत्मबलिदान करतात ते प्राणाचा त्याग करतात; पण स्वयशाचा, स्वकीर्तीचा करीत नाहींत. एरवीं हें युक्तच आहे. पण त्या यशाचा त्याग करून राष्ट्राचें यश वाढविलें पाहिजे अशी वेळ आली असतांनाहि तसें न करणें ही कांहींशी मोहवशता आहे, तें दौर्बल्य आहे, असा साउदेचा अभिप्राय आहे. नेल्सन तीं बिरुदें उतरण्यास तयार नव्हता, खालीं केबिनमध्यें जाण्यास तयार नव्हता; कारण त्याला त्यांत स्वतःच्या कीर्तीला कलंक लागेल ही भीति वाटत होती. पण या त्याच्या कृत्यामुळेंच लढाई फसण्याचा संभव होता. मग त्यामुळें इंग्लिश राष्ट्राच्या कीर्तीला कलंक लागला असता. हा विवेक न सांभाळणें हीच मोहवशता असें साउदे म्हणतो.

वैयक्तिक कीर्ति व राष्ट्राची कीर्ति यांत राष्ट्राच्या कीर्तीला वरचें स्थान देणें अवश्य होतें असें त्याचें म्हणणें आहे. त्याच अर्थानें भाऊसाहेबांच्याविषयी मीं लिहिलें आहे. १६६५ सालीं जयसिंगापुढें शरणागति पतकरतांना शिवछत्रपतींनीं हा विवेक संभाळला होता. वैयक्तिक मानापमानाच्या भावनेच्या आहारीं जाऊन त्यांनीं त्या वेळीं धारातीर्थीं आत्मबलिदान केलें असतें, तर राजस्थानचीच पुनरावृत्ति महाराष्ट्रांत घडून येऊन हिंदवी स्वराज्याची भाषाच संपली असती ! भाऊसाहेबांनीं तोच विवेक संभाळून, त्या वेळीं माघार घेऊन, वर्ष दोन वर्षें जरूर तर थांबून, पुन्हां चढाई केली असती तर महाराष्ट्राची एक पिढी गारद होण्याऐवजीं त्याचें आसन त्या वेळींच दिल्लीला स्थिर झालें असतें. पण भाऊसाहेबांच्या त्या मनोवृत्तीमुळें हें साधलें नाहीं.

पण ही वृत्ति हीच भारताची प्रकृति आहे ! शिवछत्रपति हे अपवाद आहेत.

### जीविताची घडणच तशी !

आपण एका राष्ट्राचे, समाजाचे, एका समूहाचे एक घटक या दृष्टीनें स्वतःकडे पहावें हा संस्कार आमच्या मनावर नाहीं. या दृष्टीनें आम्ही स्वतःकडे पहात नाहीं. एक स्वतंत्र, स्वयंपूर्ण व्यक्ति अशा दृष्टीनें आपण

स्वतःचा विचार करतों. आपली स्वतःची उन्नति, परिणति, पूर्णता, मोक्ष ही गोष्ट सर्वस्वीं समाजनिरपेक्ष आहे, अशी आमची बाल्यापासून वार्धक्यापर्यंत भावना असते व तदनुसार आपलें वर्तन असतें. मराठ्यांनीं कुंभेरीच्या किल्ल्यास वेढा घातला होता. त्या वेळी मल्हारराव होळकरांचा मुलगा खंडेराव गोळा लागून ठार झाला. त्यामुळे भयंकर संतापून मल्हाररावाने प्रतिज्ञा केली कीं " सुरजमल्ल जाटाचा शिरच्छेद करीन व कुंभेरीची माती खणून यमुनेंत टाकीन ! "

या प्रतिज्ञेचें वर्तमान ऐकून जाट घाबरून गेला. त्या वेळीं वेढ्याच्या एका बाजूचें काम जयाप्पा शिंदे पाहात होते. त्यांच्याकडे रात्रीं गुप्तपणें जाऊन जाटानें त्यांच्या पायावर डोकें ठेविलें. ' शरण आलेल्यास मरण देऊं नये ' हा धर्म आठवून जयाप्पानी त्यास अभय दिलें आणि वेढा ढिला केला. हे होळकरांना कळलें तेव्हा शिंदे व होळकर या उभयतांत आधींच वैमनस्य होतें तें विकोपाला गेलें. शिंदे-होळकरांच्या या बिघाडामुळेच मराठे उत्तर हिंदुस्थानांत अनेक वेळां अपयशी झाले आणि मराठी राष्ट्राची हानि झाली. जयाप्पा ज्या धर्माला जागले तो व्यक्तिधर्म होता; समाजधर्म नव्हता. मराठी राष्ट्राचा एक घटक या दृष्टीनें ते स्वतःकडे पाहात नव्हते, तर महाराष्ट्रांतला एक जयाप्पा नांवाचा सरदार अशी त्यांची दृष्टि होती.

आज शेंकडों वर्षें आमच्या जीविताचें वळणच असें आहे; त्याची घडणच तशी झालेली आहे. आम्ही स्वकेंद्रित आहों. समाज हा आमच्या अवलोकनाचा केंद्र नाहीं. त्यामुळें समाज म्हणून जगण्याची विद्या आम्हांला हस्तगत करतां येत नाहीं. स्वार्थ, लोभ, दुष्टपणा, मत्सर यांमुळें माणूस स्वकेंद्रित होतो तें निराळें; त्यामुळें समाजाची हानि होतच असते. पण आम्ही वरच्या पायरीवर गेलों, निर्लोभ झालो तरी आमची दृष्टि अशी स्वकेंद्रित असते. आणि त्यामुळें वैयक्तिक सद्‌गुणांची संपादणी उत्तम करूनहि श्रेष्ठ समाजधर्म व ते सद्‌गुण यांचा समन्वय घालण्याची दृष्टि नसल्यामुळें आमच्या सद्‌गुणांतूनहि विपरीत अनर्थ निर्माण होतात. मी सांगत

आहे ती आपल्या सद्‌गुणांची कहाणी आहे! दुर्गुणांमुळें समाज विघटित होणें हें नेहमीचेंच आहे; पण आपण सद्‌गुण म्हणून ज्यांची जोपासना करतों त्यांतूनच आपल्या समाजविमुख, आत्मकेंद्रित दृष्टीमुळें अशीं चमत्कारिक मूल्यें निर्माण होतात, कीं त्यांचा परिणाम विघातक व्हावा!

आपल्या समाजांतील कित्येक जमातींनीं भूतदयेमुळें मांसाहार वर्ज्य केला. आतां भूतदया हा केवढा सद्‌गुण आहे! पण आपला हा धर्म अखिल समाजधर्माशीं मिळून कसा बसेल याचा विचार स्वप्नांतहि आमच्या मनाला शिवत नसल्यामुळें त्यांतून काय निर्माण झालें पहा! मांसाहारी लोकांपेक्षां शाकाहारी लोक स्वतःला श्रेष्ठ समजूं लागले. त्यांचा प्रथम निराळा गट व नंतर स्वतंत्र जाति झाली. इतरांना ते लोक तुच्छ लेखूं लागले व दूर ठेवूं लागले; आणि त्यामुळें जातिमत्सर वाढून त्यांची भूतदया विघटनेस मात्र कारण झाली! प्राण्यांची हत्या होऊं नये या शुभ व्रतातून इतके तीव्र जातिद्वेष निर्माण झाले, कीं त्यामुळे मनुष्यहत्या होऊं लागली. याचें कारण एकच; स्वतःच्या भूतदयेच्या सामाजिक मूल्यांचा आपण विचार करीत नाहीं. वैयक्तिक व सामाजिक धर्मांचा समन्वय घालण्याची दक्षता आम्ही बाळगीत नाहीं.

### आमच्या स्वच्छतेच्या शास्त्रांत

आमच्या स्वच्छतेचें शास्त्र पाहा. आम्ही भारतीय स्वच्छतेचे भोक्ते आहों यात शंका नाही. आपल्या घरांत आपण स्वच्छता ठेवतों ती वाखाणण्याजोगी असते. खेड्यांतसुद्धां जमिनी स्वच्छ सारवलेल्या, भांडीं लखख घासलेलीं, झाडलोट आस्थेनें केलेली असें घराचें स्वरूप आपल्याला दिसतें; पण तें घरांत! उंबरठ्याबाहेर बघा. घरांतली सर्व घाण तेथें चार फुटांवर टाकलेली असते. ती कुजत असते, तेथें दुर्गंधि येत असते; पण तो विचार घरांतल्या माणसांच्या स्वच्छतेच्या शास्त्रांत येत नाहीं. कारण ती जागा सार्वजनिक आहे. आणि सार्वजनिक जीवनांत स्वच्छता आणावी ही कल्पना आमच्या मनांत उद्‌भवतच नाहीं; तें आमच्या इतिहासांतच नाहीं.

मुंबईच्या उत्तम इमारतींतून अगदीं आजच्या घटकेलासुद्धां हें किळसवाणें दृश्य दिसतें. इमारतीच्या मध्यें असलेल्या चौकांत वाटेल ती घाण टाकलेली असते. अगदीं चवथ्या, पांचव्या मजल्यावरून आमटी, वरण, निःशंकपणें खालीं ओतून देतात. शाळा-कॉलेजांतल्या कन्यका केशरचना करीत असतांना, केस स्वच्छ करीत करीत त्यांतला केरकचरा त्या चौकांत टाकीत असतात. ब्रशानें तोंड धुणारे लोक गॅलरींतच शेजारी उभे राहून, मुखाची स्वच्छता करीत असतांनाच खालीं मुखरस टाकीत असतात. ती जागा एकट्या कोणाची नाहीं; सर्वांची आहे. पण म्हणून ती स्वच्छ ठेवण्याची जबाबदारी सर्वांची आहे असें न मानतां तेथें घाण करण्याचा हक्क मात्र सर्वांचा आहे, अशी श्रद्धा नागरिक बाळगतात ! या इमारतींतील बिऱ्हाडें आंतून अगदीं स्वच्छ असतात; पण दोन बिऱ्हाडांना जेथें संबंध येतो, तेथें घाण सांचलेली असते. वैयक्तिक जीवन आम्ही स्वच्छ ठेवूं; पण सार्वजनिक जीवन हक्कानें घाण करूं !

कोणतेंहि कृत्य करतांना, कोणतेंहि धोरण ठरवितांना आपल्या अखिल समाजाचें चित्र डोळ्यांपुढें ठेवावें, अखिल समाजाच्या जीवनाचे आपण अंशभागीं आहों ही जाणीव मनांत ठेवावी, असा संस्कार भारतीय मनावर गेल्या सातशे-आठशें वर्षांत झालेलाच नाहीं. ब्रिटिश राज्य येथें आल्यानंतर ही कल्पना प्रथम वातावरणांत निर्माण झाली. त्याच्या आधींच्या काळांत आपण एकमेकांशेजारीं एका भूमीवर राहात होतों इतकेंच. त्या सहवासानें आपल्यामध्यें सहजीवन, सामुदायिक जीवन निर्माण झालें नव्हतें. याचें कारण असें, कीं धर्म, राजकारण इत्यादि सामाजिक जीवनाच्या भिन्न क्षेत्रांतील भारतीयांचें तत्त्वज्ञानच सर्व व्यक्तिवादी होतें. धर्मामध्यें मोक्ष हें आमचें अंतिम प्राप्तव्य होतें. त्या मोक्षधर्माला व्यक्तीच्या त्यागाची, संयमाची, तपश्चर्येची अत्यंत आवश्यकता असते. पण सामाजिक गुणांची त्याला काडी-इतकीहि जरूर नाहीं. मोक्ष हा प्रत्येक व्यक्तीनें स्वतंत्रपणें मिळवावयाचा असतो. त्यासाठीं संघटनेची मुळींच आवश्यकता नाहीं. पांचपंचवीस, पांचशें,

हजार असे लोक एकत्र येऊन मोक्षधर्म साध्य करावयाचा नसतो; तें अगदीं एकट्याचें, अगदीं वैयक्तिक कार्य आहे. त्यामुळें आपले सर्व निकष, सर्व मूल्यमापन तसें होऊन बसलें आहे.

स्त्रीपुत्र, आप्तइष्ट हें मोक्षाच्या आड येतात असें वाटतांच त्यांचा संबंध तोडावा, त्यांच्याविषयीं उदासीन व्हावें असें येथले धर्मधुरीण शिकवूं लागले. कोणतेंहि कृत्य करतांना कुटुंबहित दृष्टीसमोर ठेवावें हेसुद्धा जेथें मान्य नाहीं किंवा तसें न करण्यांतच जेथें भूषण मानलें जातें, तेथें समाजहित दृष्टीपुढें ठेवण्याची जाणीव कशी निर्माण होणार ? राजकारणांतहि हेंच झालें. आजहि कोणी कोणी जुन्या काळाचें अभिमानानें वर्णन करतात, कीं आमची ग्राम-व्यवस्था अशी स्वयंपूर्ण होती कीं तिकडे राज्यकारभारांत कसल्याहि उलथा-पालथी होवोत, शेतांत नांगर धरणाऱ्या शेतकऱ्याला त्याची दखल नसे. पहिलें राज्य जावो, दुसरें येवो, राजा स्वकीय असो, परकीय असो, आमच्या शेतकऱ्याच्या व त्याच्या भोंवतालीं असणाऱ्या कुंभार, लोहार, साळी, माळी, सोनार यांच्या जीवनाशीं त्याचा कसलाहि संबंध येत नसे. याचा अर्थ असा, कीं आमच्या वैयक्तिक जीवनाच्या आंखणींत सार्वजनिक जीवनाच्या विचाराला स्थान नव्हतें; इतकेंच नव्हे, तर तसें नसण्यांत आपण भूषण मानीत होतों.

## सांघिक जीवनाच्या गुणांची कमतरता

वैयक्तिक जीवनांत परमोच्च बिंदु गांठण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं असतांना सांघिक जीवनांत आम्ही सर्वत्र नामोहरम होतों ही दुःखद स्थिति म्हणजे आपल्या पूर्वींच्या तत्त्वज्ञानाचा परिपाक आहे. गेल्या शंभर वर्षांत ही स्थिति पुष्कळच सुधारली आहे; पण अजूनहि आपल्या अनेक योजनांत आपल्याला जें अपयश येत आहे त्याचें पंडितांच्या मतें प्रधान कारण असें कीं योजना कार्यवाहींत येत असतांना अखिल भारतीय प्रपंचाची दृष्टि कार्यकर्त्यांच्या अवलोकनांत नसते. स्वातंत्र्यानंतर प्रारंभींच आखलेल्या प्रांत-विकासयोजनांवर टीका करतांना डॉ. ग्यानचंद यांनीं भिन्न प्रांतांत भिन्न कर्याकर्त्यांत, योजनेच्या भिन्न विभागांत सहकार्य नाहीं, एकसूत्रता नाहीं,

परस्परसंगति नाहीं, अंतिम साध्याविषयी एकवाक्यता नाहीं, याच दोषावर सारखा भर दिला आहे. एके ठिकाणीं तर त्यांनीं म्हटलें आहे, कीं भिन्न खात्यांत एकसूत्रता व सहकार्य घडवून आणण्यासाठीं एक समिति नेमण्यांत आली होती तिच्या कामांतच सुसंगति नव्हती !

कार्याचें धोरण आखतांना अखिल भारताचें चित्र कोणच्याच डोळ्यांपुढें नसतें, हा ग्यानचंद यांचा मुख्य आरोप आहे. आणि या पुस्तकाला प्रस्तावना लिहिताना पंडित जवाहरलालजींनीं आणखी पुढें जाऊन सांगितलें आहे, कीं केंद्र व प्रात यांच्यांत आणि प्रातांप्रांतांत सहकार्य व एकवाक्यता नाही एवढेंच नव्हे, तर एका प्रांताच्या भिन्न खात्यांतहि सहकार्य दिसत नाही ! येथें एक गोष्ट मुद्दाम निदर्शनास आणावयाची आहे ती ही, कीं आळस, अनभ्यास, अज्ञान, नालायकी, कर्तृत्वशून्यता इत्यादि दुर्गुण वरील अपयशास कारण झालेले आहेतच; पण एवढ्या प्रचंड योजनेत प्रत्येक प्रांतांत कार्यनिपुण, दक्ष, तंत्रविशारद असे कार्यकर्तेहि होते व आहेत. पण सांघिक जीवनाच्या गुणांची कमतरता त्यांच्या ठायीहि असल्यामुळें आपल्या बहुतेक योजना कोसळून पडत आहेत !

'क्रिकेट हें आपल्या जीवनाचें प्रतिबिंब आहे' असें मीं म्हटलें तें या अर्थानें. वैयक्तिक गुणांच्या दृष्टीनें कार्यनिपुण, क्रीडाकुशल असलेले, विख्यात असे खेळाडू एकत्र येऊनहि आपल्याला अपयश येतें ! कारण, अकरा लोकांची शक्ति एकाच्या अकरापट करण्याची विद्या आपल्याजवळ नाहीं ! आपण एकमेकांच्या सान्निध्यांत आलो की अपूर्णांकांचा गुणाकार तयार होतो. आणि हें कशाचें निदर्शक ?

या ठिकाणीं एक गमतीचा विचार मनांत येतो. अलंकारिक अर्थापुरता का होईना, पण तो खरा आहे असें वाटतें. आपल्या हॉकीच्या खेळाकडे दृष्टि टाकून पहा. या खेळाच्या संघानें गेल्या पंचवीस वर्षांत सारखे विजय मिळविले आहेत. जर्मनी, इंग्लड, अमेरिका, फ्रान्स इत्यादि सर्व देशांत तो

अजिक्य ठरला आहे. तेव्हां सांघिक जीवन कसें असावें याचा ' भारतीय हॉकी संघ ' हा उत्कृष्ट आदर्श आहे. पण या हॉकीच्या खेळाची व त्या संघाची भारतीय लोक कितपत दखल घेतात ? क्रिकेटच्या तुलनेनें कितपत घेतात ? शाळा-कॉलेजांत त्याची उपेक्षाच असते. क्रिकेटसारखे त्याचे मोठे सामनेहि होत नाहीत. कारण, समाजाला त्याची गोडी नाहीं आणि सरकारलाहि त्याचें फारसें सोयरसुतक नाहीं. परवां हेलिंसिंकीला विजय मिळविणाऱ्या संघाजवळ मायदेशीं परत येण्यापुरता पैसा नव्हता ! प्रत्येक देशांत सामने करून त्यावर पैसा मिळवून त्यांना परत यावें लागलें.

हा केवळ योगायोग असेल; आपण मुद्दाम, हेतुपूर्वक असें केलें असें मी म्हणत नाहीं. पण हा योगायोग कशाचा निदर्शक आहे ? व्यक्तिगत प्राविण्यानें संपन्न असूनहि संघविद्या नसल्यामुळे ज्या क्रिकेटमध्यें जगाच्या आखाड्यांत एकदाहि विजय मिळवितां आला नाही त्याच्यासाठी आपण जीव टाकतों ! आणि वैयक्तिक प्राविण्याच्या जोडीला सांघिक खेळाला अवश्य त्या गुणाची जोपासना करून, ज्या हॉकीनें अखंड दोन तपें सर्व लहानथोर राष्ट्रांचा पराभव करून, आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक क्रीडास्पर्धात भारताचें नांव उजळून टाकलें आहे, त्याविषयीं आपण पूर्णपणें उदासीन आहों ! त्याची आपण पूर्ण उपेक्षा करतों. योगायोगानें का होईना, पण सध्यां असें घडतें आहे, कीं आपल्याला क्रिकेटच्या संघांत दिसणारें स्वतःचें प्रतिबिंब हॉकीच्या खेळांत दिसणाऱ्या प्रतिबिंबापेक्षां जास्त प्रिय, जास्त आकर्षक वाटतें !

---

नोव्हेंबर १९५२

## ४. संतांच्या कार्याचें नवें मूल्यमापन

### राजवाडेमताचा प्रभाव

गेल्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थांत आपल्या जुन्या इतिहासांतील इतर अनेक घटनांप्रमाणें महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या चळवळीचीहि ऐतिहासिक चिकित्सा होऊं लागली आणि आपण तिचें नव्यानें मूल्यमापन करूं लागलों. राजारामशास्त्री भागवत, न्यायमूर्ति रानडे, लोकमान्य टिळक, ह. भ. प. पांगारकर, इतिहासचार्य वि. का. राजवाडे या सर्व थोर पंडितांनीं आपापल्या-परी या महत्त्वाच्या चर्चेंत भाग घेऊन संतांच्या चळवळीचें समालोचन केलें आहे. त्यांत त्या वेळीं राजवाडे यांनीं प्रतिपादन केलेलें मत इतरांच्यापेक्षा प्रभावी ठरून त्या वेळच्या सुशिक्षित महाराष्ट्रीयांत तेंच दीर्घकाळ मान्यता पावलें होतें. राजवाडे यांच्या मतें ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादि भागवतधर्मी संतांनीं आपल्या समाजाच्या ऐहिक उत्कर्षाची कमलीहि चिंता केली नाहीं. प्रत्येक नागरिकाच्या शिरावर राष्ट्रीय प्रपंचाची जबाबदारी असते याची त्यांना दखलहि नव्हती. इस्लामी आक्रमणाचें महाभयंकर संकट आमच्या देशावर कोसळत होतें आणि हिंदुधर्म व हिंदुजाति या संकटांत समूळ नष्ट होतात कीं काय असा प्रसंग येऊन ठेपला होता. तरी त्या आक्रमणाचा प्रतिकार करण्याचा, आपला देश त्यांतून सोडविण्याचा संतांनीं यत्किंचितहि प्रयत्न केला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या काळीं येथल्या समाजांत निवृत्तिधर्माचा प्रसार करून त्याला हतबल करून ठेविलें. संसार क्षणभंगुर आहे, स्त्रीपुरुष आपले शत्रु आहेत, विठ्ठल हा एकच आपला सखा आहे, त्याचें अहोरात्र भजन-कीर्तन आपण केलें, वासना नष्ट करून टाकल्या, ऐहिकाविषयीं उदासीनता अंगीं बाणविली तरच आपल्याला मोक्ष मिळेल व या भवसागरांतून आपण तरून जाऊं. भोंवतालच्या जगांत कसल्याहि बऱ्यावाईट घटना घडत असल्या तरी त्यांत आपण मन घालूं नये; त्याविषयींचे राग-द्वेष, हर्ष-खेद आपण आपल्या चित्तांत उठूं देऊं नयेत; कारण या हर्षखेदांच्या द्वंद्वामुळेंच माणूस संसारांत बद्ध होतो, जन्ममरणाच्या फेऱ्यांत

सांपडतो, व मोक्षाला आंचवतो. या शिकवणीमुळें महाराष्ट्रीय समाज इह-विमुख झाला आणि तीनशें वर्षें पारतंत्र्याच्या घोर नरकांत पिचत राहिला. त्यांतून समर्थांच्या तेजस्वी संदेशामुळें तो बाहेर पडला. समर्थांनीं त्याला प्रपंचाचें महत्त्व पटवून दिलें; प्रवृत्तिधर्माची दीक्षा दिली; पराक्रम, शत्रूचा पराजय, थोर आकांक्षा, स्वराज्य, स्वातंत्र्य यांवांचून मोक्षधर्माला मुळींच अर्थ नाहीं असा उपदेश केला आणि त्याचा उत्तम परिणाम होऊन शिव-छत्रपतींचा उदय झाला व महाराष्ट्रांत स्वराज्याची संस्थापना झाली. आठदहा वर्षांपूर्वींपर्यंत राजवाडे यांचें हेंच मूल्यपान महाराष्ट्रांतील सुशिक्षितवर्गानें स्वीकारलेलें होतें.

## नवें मूल्यमापन

पण गेलीं कांहीं वर्षे या विषयाची–संतांच्या कार्याची-नव्यानें चर्चा होऊं लागली आहे. आणि आतां राजवाडे यांच्या अगदीं उलट असें मत प्रस्थापित होऊं पाहात आहे. संत निवृत्तिवादी होते हे नव्या अभ्यासकाना मुळींच मान्य नाहीं. उलट त्यांनीं स्वधर्म व स्वभाषा याचा अभिमान जागृत करून महाराष्ट्राला इस्लामी आक्रमणापासून मुक्त केलें आहे; मराठ्यांचा उदय, स्वराज्याची स्थापना हें त्यांच्याच उपदेशाचें फल असून रामदासांच्या शिकवणुकीचा तिच्याशीं कांहीं संबंध नाहीं असें नवें मत आहे. कांहींच्या मतें रामदासांनीं राजकारण केलेंच नाहीं, तर दुसरें काहीं म्हणतात कीं त्यांचें राजकारण ब्राह्मणक्षत्रियादि वरिष्ठ वर्गापुरतें स्वार्थी, प्रतिगामी व समाजाला हानिकारक असें होतें. प्रा. न. र. फाटक, बा. रं. सुंठणकर व प्रा. गं. बा. सरदार हीं नांवें या नव्या पंडितांत प्रामुख्यानें दिसतात. यांचीं मतें परस्परांपासून खूपच भिन्न आहेत; पण संत निवृत्ति-वादी होते या राजवाड्यांच्या मतावर सर्वांनींच प्रखर हल्ला केला आहे. या तीनहि पंडितांच्या मते, संतांना निवृत्तिवादी म्हणणें अगदीं हास्यास्पद आहे. ते पूर्ण प्रवृत्तिवादी होते. त्यांनीं प्रवृत्तिधर्माचाच प्रसार केला आणि मराठ्यांचा उदय हें त्यांच्या तत्त्वज्ञानाचें व श्रमांचेंच फल होय. संत–चळवळीचें हें जें

नव्यानें मूल्यमापन झालें आहे त्याचा आणि विशेषतः प्रवृत्ति-निवृत्तिवादाचा या लेखांत विचार करावयाचा आहे.

**ज्ञानेश्वरी—आक्रमण प्रतिकारार्थ**

प्रा. न. र फाटक यांचें 'श्रीज्ञानेश्वर, वाङ्मय आणि कार्य' हें पुस्तक गेल्या वर्षींच प्रसिद्ध झालें आहे. त्याच्या आधीं एकनाथ व रामदास यांच्या कार्याविषयीं त्यांनीं अशींच पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. पहिल्या पुस्तकांत त्यांनीं ज्ञानेश्वरांच्या कार्याविषयी अगदीं नवीं, अगदीं स्वतंत्र अशीं मतें मांडलीं आहेत. त्यांच्या मतें, इस्लामी आक्रमणाचें आगामी संकट ओळखून तें निवारण्याचा हेतु मनांत धरूनच त्यांनीं आपल्या गीता-टीकेची रचना केली आहे. इ. स. १२९० या वर्षीं त्यांनीं 'ज्ञानेश्वरी' लिहिली आणि १२९६ सालीं समाधि घेऊन या लोकाचा त्याग केला. या काळापर्यंत इस्लामी आक्रमण उत्तरेंत पूर्ण झालें होतें, आणि दक्षिणेंतहि व्यापार, धर्म-प्रसार या निमित्तांनीं मुसलमानांचा संचार, यापूर्वीच्या एकदोन शतकांत होत असल्याचें स्पष्ट दिसून येतें. अशा स्थितीत देवाधर्मांच्या स्थितीचें सतत चिंतन करणाऱ्या ज्ञानेश्वरांना या आक्रमणाची जाणीवसुद्धां नव्हती अशी कल्पना उराशीं बाळगणें हें, फाटकांच्या मतें, दुराराध्य दुर्विदग्धतेखेरीज इतर रीतीनें साधणार नाहीं. आतांपर्यंतचें रूढ मत असें होतें, कीं ज्ञानेश्वरांच्या काळापर्यंत इस्लामचा दक्षिणेंत संबंध आला नव्हता; आणि त्यामुळेच ज्ञानेश्वरीत त्याचा अप्रत्यक्षपणेंसुद्धा उल्लेख सापडत नाहीं. यामुळें फाटकांच्या या नव्या मतावर कांहीं अभ्यासकांनीं टीका केली. पण शालेय पुस्तकापलीकडे त्यांच्या इतिहासाच्या अध्ययनाची मजल गेलेली नसल्यामुळें त्यांनीं ती टीका करणें साहजिक आहे असें म्हणून फाटकांनीं या अभ्यासकांची हेटाळणी केली आहे. आणि इस्लामी आक्रमणाला तोंड देण्यासाठींच भागवतधर्माचा उदय झाला, त्याच्या प्रति-कारासाठीं, त्या संकटांतून महाराष्ट्राला मुक्त करण्यासाठींच ज्ञानेश्वरांनीं आपली गीता टीका लिहिली असें आपलें मत फाटकांनीं ठासून मांडलें आहे.

इस्लामी आक्रमणाचा प्रतिकार करण्याची जी सिद्धता ज्ञानेश्वरांनीं केली

तिचें स्वरूप काय होतें, असा यापुढें प्रश्न येतो. त्यांनी राजकारण तर केलें नाहीं, संघटनाहि उभारली नाहीं, मग प्रतिकार कसा केला ? प्रा. फाटक म्हणतात, देवाधर्मांची भक्ति हेंच ज्ञानेश्वराचें इस्लामी आक्रमणाला उत्तर होतें. उत्तरेंतील घडामोडींवरून इस्लामपुढें रणांगणांतील शौर्य-धैर्य चालत नाहीं हें त्यांच्या ध्यानांत आलें होतें. तलवारीनें हिंदूंची एकजूट घडवून आणण्यास अवसर नव्हता. म्हणून शस्त्राचा मार्ग सोडून देऊन लोकात धर्म-जागृति करणें या उपायाचा त्यांनीं अवलंब केला. प्राचीन काळांत रामचंद्र, पांडव यांना व अर्वाचीन काळात महात्माजीना हाच मार्ग स्वीकारावा लागला होता. आपला काळ ओळखून श्रीज्ञानेश्वरांनीं तेंच केलें. इस्लामचें आक्रमण देवाधर्मावर होतें. तेव्हां त्याची भक्ति लोकांत दृढमूल करणें हाच त्यावर उपाय होता. ('ज्ञानेश्वर, वाङ्मय आणि कार्य.' पृ. २२–२६. )

भागवतधर्माच्या प्रसारामुळें, प्रा. फाटकांच्या मतें, इस्लामी आक्रमणाच्या प्रतिकाराची सिद्धता दोन प्रकारांनीं झाली. त्यापूर्वीं महाराष्ट्रांत अनेक क्षुद्र दैवतांची उपासना चालू होती. अनेक पंथ निर्माण झाले होते. त्या दैवतांचें व पंथांचें स्वरूपहि अगदीं हीन होतें. त्यामुळें सर्व समाज विगलित, विस्कळित व असंघटित होऊन गेला होता. अशा समाजांत, सर्वांचा एक देव विठ्ठल, व सर्वांचा एक धर्म म्हणजे भागवतधर्म अशा उपदेशामुळें संघटना निर्माण झाली. त्याचबरोबर परमार्थक्षेत्रांत कसलीहि जातीय उच्चनीचता संतांनीं निषिद्ध मानल्यामुळें ही संघटना दृढ झाली. प्रतिकाराचें दुसरें साधन म्हणजे सद्‌गुणांची जोपासना हें होय. कोणत्याहि ध्येयसिद्धीसाठीं समाजांत निग्रह, संयम, औदार्य, भूतदया, निःस्वार्थी वृत्ति, त्याग, निष्ठा, इत्यादि उच्च प्रकारचे गुण अवश्य असतात. मग तें ध्येय धार्मिक असो, सामाजिक असो किंवा राजकीय असो. त्या काळीं हिंदु समाजांत या थोर गुणांचा लोप झाला होता. देहाचें सुख, स्वतःची कीर्ति, विलासी सुखें देणारीं व्रत-वैकल्यें, यांतच सर्व लोक दंग झाले होते. म्हणजे समाजधारणेला पोषक असे गुण समाजांतून नाहींसे झाले होते. हे गुण निर्माण व्हावे म्हणून श्रीज्ञाने-

श्वरांनीं साध्या परमार्थाच्या भाषेंत लोकांना उपदेश केला. त्यांत त्यांनीं वैराग्यावर भर दिला हें खरे, पण कोणत्याहि ध्येयसिद्धीला वैराग्य अवश्यच असतें. अन्नवस्त्र, शरीरसुखें याविषयीं ध्येयवादी नेहमीं उदासीनच असतो. अर्वाचीन क्रांतिकारकांच्या चरित्रांवरून हेंच दिसेल. युरोपांत मार्क्स, मॅझिनी, लेनिन इत्यादि नेत्याना अशा तऱ्हेचें ध्येयवादाचें तत्त्वज्ञान निर्माण करूनच लोकोद्धार करावा लागला. ज्ञानेश्वरांच्यापुढें तेंच कार्य होतें. निवृत्तिनाथाचे गुरु गहिनीनाथ याना सर्व जग कलीच्या संकटांत सांपडलेलें दिसले, त्यांना दया आली व या कलियुगाच्या संकटांतून जगाला सोडविण्याची त्यांनीं शिष्याला, निवृत्तिनाथांना आज्ञा केली. तेव्हां त्यानीं हें कार्य आपले शिष्य ज्ञानेश्वर यांचेकडून करविलें अशी आख्यायिका आहे. प्रा. फाटकांच्या मतें या ठिकाणी जग म्हणजे महाराष्ट्र व कलियुग म्हणजे इस्लामी आक्रमण होय. या संकटाच्या प्रतिकारार्थ त्यांनीं समाजाला निरपेक्षपणें लोकसेवा करण्याची शिकवण दिली. कर्मयोग तो हाच, प्रवृत्तिधर्म तो हाच; याचाच उपदेश आपल्या गीता-टीकेंत ज्ञानेश्वरांनीं केला, आणि त्यांचाच योग्य काळीं परिपाक होऊन मराठी राज्याचा उदय झाला व इस्लामी आक्रमणाला पायबंद बसला.

आतांपर्यंतच्या ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांना ज्ञानेश्वरीमध्यें समाजसंघटना, ऐहिक वैभवाच्या आकांक्षा, स्वातंत्र्याची तळमळ, परकीयांच्या आक्रमणाचा प्रतिकार करण्याची शिकवण यापैकीं कांहींच कोठें दिसलें नव्हतें. अप्रत्यक्षपणें, दूरान्वयानेंसुद्धां असले विषय ज्ञानेश्वरींत असतील अशी शंका त्यांना आली नव्हती. असें असतांना प्रा. न. र. फाटकांनीं इतक्या आत्मविश्वासानें वरील सिद्धान्त माडतांच सर्वच वाचकांना आश्चर्य वाटलें, आणि ज्ञानेश्वरींतल्या कोणच्या विवेचनांत हा संदेश सांपडतो अशी पृच्छा त्याच्या मनांत साहजिकच आली. त्यांच्या समाधानासाठीं फाटकांनीं आपलें संशोधन पुढीलप्रमाणें प्रकट केलें आहे: गीतेमध्यें तीन ठिकाणीं स्वधर्माचें विवेचन आलें आहे. तिसऱ्या अध्यायांत यज्ञाची महती सांगितली

आहे. तेथें यज्ञ या शब्दाचा ज्ञानेश्वरांनीं, वर्णाश्रमधर्म प्रमाणें मनुष्याला प्राप्त झालेलें स्वकर्म म्हणजे त्याचा स्वधर्म असा अर्थ केला आहे. त्याच अध्यायातील ३५ वा श्लोक–

श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥

असा आहे. आणि पुढें १८ व्या अध्यायांत ४७ व्या श्लोकांत अशाच तऱ्हेनें स्वभावनियत कर्माची म्हणजे स्वधर्माची महती गीतेनें गाइली आहे. या तीन ठिकाणीं ज्ञानेश्वरांनीं जें भाष्य केलें आहे त्यांत, फाटकांच्या मतें, ज्ञानेश्वराचा स्वातंत्र्याचा, संघटनेचा व ऐहिक उत्कर्षाचा संदेश आहे.

गीतेंतील तिसऱ्या अध्यायातील अकराव्या श्लोकावर टीका करतांना ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे कीं, 'या स्वधर्माचें आचरण तुम्ही कराल तर तुमचा योगक्षेम उत्तम चालेल, जें जें करूं म्हणाल तें तें सिद्धीस जाईल, तुमच्या सर्व आकांक्षा तृप्त होतील आणि तुम्ही वाचासिद्धी पावाल, आज्ञापक होआल.' 'आज्ञापक होआल' याचा अर्थ, तुम्ही स्वतंत्र व्हाल, परकीय आक्रमणांतून मुक्त व्हाल, दुसऱ्यांना आज्ञा करण्याचें म्हणजेच त्यांच्यावर राज्य करण्याचें सामर्थ्य तुम्हांस येईल, असा करून, यांतच ज्ञानेश्वरांनीं इस्लामी आक्रमणापासून मुक्तता करून घेण्याचा उपाय सांगितला आहे असें फाटक म्हणतात. गीता ३–१२ या श्लोकावरील ज्ञानदेवांच्या टीकेचाहि त्यांनीं असाच अर्थ लाविला आहे. स्वधर्म लोपला तर सर्व सुखाचा आधारच गेला. 'तैसी निजवृत्ति जेथ सांडे, तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे ।' याचा अर्थ, फाटकांच्या मतें असा कीं, तुम्हीं जर स्वकर्म सोडलें तर तुमचें स्वातंत्र्य म्हणजे राजकीय स्वातंत्र्य नष्ट होईल. फाटक म्हणतात, एका बाजूस स्वधर्मनिष्ठांचें स्वातंत्र्य व प्रभुत्वाचें वैभव, आणि दुसऱ्या बाजूस स्वधर्म-भ्रष्टांचें स्वातंत्र्यहीन दैन्य अशीं जीं उद्बोधक चित्रें ज्ञानेश्वरांनीं रेखाटलीं आहेत, तीं त्यांच्या स्वजनोत्कर्षाच्या आकांक्षांचीं दर्शक आहेत. देशांतील

जनतेनें स्वधर्मनिष्ठेच्या बळावर स्वतंत्र, संपन्न व पराक्रमी व्हावें, जनतेमध्यें कसलीहि उणीव राहूं नये, ही ज्ञानेश्वराची आकांक्षा यांपैकीं एका चित्रांत असंदिग्ध रीतीनें उमटली आहे. ज्ञानेश्वरांच्या स्वधर्म, स्वकर्म, विहितकर्म या शब्दांचा अर्थ ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि वर्णांचीं व जातींचीं जन्मानें प्राप्त झालेलीं कर्मे, त्यांचे स्मृतिप्रणीत उद्योग असा आहे, हे मान्य करून फाटक म्हणतात कीं, तरीसुद्धां निजवृत्ति किंवा स्वधर्म या शब्दाचा अर्थ जास्त व्यापक आहे. यासाठीं त्यांनीं गीता अध्याय १८, श्लोक ४७, ४८ यांवरील ज्ञानेश्वराच्या टीकेचा हवाला दिला आहे. "स्वधर्मासाठीं मरण आलें तरी तें परधर्मस्वीकाराहून श्रेयस्कर, हा अभिमान माणसांचें स्वातंत्र्य टिकविण्यास समर्थ ठरतो. स्वातंत्र्य गमावून परवशतेच्या जीवन्मृतावस्थेंत राहाण्यापेक्षां स्वधर्मांतले मरणसुद्धां उत्तम. निजवृत्ति लोपल्यानें ज्या दुर्भाग्याचे धनी व्हावें लागतें त्याचा विचार केल्यास, त्या निजवृत्तींत स्वधर्मानिमित्त मरणाचें आनंदानें स्वागत करणाऱ्या कडव्या अभिमानाची धार असल्याविषयीं शंका राहाणार नाहीं." (उक्त ग्रंथ पृ. १०२–१०५) असा ज्ञानेश्वरांच्या टीकेचा उज्ज्वल अर्थ करून फाटक म्हणतात, आम्हीं ही ओढाताण केलेली नाहीं. हा अगदीं सरळ अर्थ आहे. तरी ज्यांना ओढाताण म्हणावयाचें असेल त्यांना कोण प्रतिबंध करणार?

ज्ञानेश्वरींतल्या ओव्यांचा मागला-पुढला संदर्भ पाहिला तर खुद्द ज्ञानेश्वरच ही ओढाताण आहे, अशी तक्रार करतील असें वाटतें. स्वधर्माचें ज्ञानेश्वरांनीं काय स्पष्टीकरण केलें आहे तें पहा : 'ऐसे समस्तं भोगरहित, होआल तुम्ही अनार्त, जरी स्वधर्मनिरत, होआल बापा। (ज्ञानेश्वरी, ३–१०) असें म्हणून हा स्वधर्म कोणता तें ज्ञानेश्वरांनीं पुढील ओव्यांत सांगितलें आहे : 'अग्निमुखीं हवन, न करील देवतापूजन, प्राप्तवेळें भोजन, ब्राह्मणाचें ॥ विमुख होईल गुरुभक्ति, आदर न करील अतिथि, संतोष नेदील ज्ञाती, आपुलीये॥ ऐसा स्वधर्मक्रियारहितु, आथिलेपणें प्रमत्तु, केवल भोगासक्तु, होईल जो ॥ तया मग अपावो थोर आहे, जेणें तें हातींचें सकळ जाये, देख

प्राप्तहि न लाहे, भोगा भोगू ॥' ( ज्ञानेश्वरी, १०५, ६, ७. ) या स्पष्टीकरणावरून असें दिसेल कीं, पूजा, वैश्वदेव, ब्राह्मणभोजन, गुरुभक्ति, अतीथिसत्कार हा तो स्वधर्म होय. फाटकांच्या मतें ज्ञानेश्वरांनीं इस्लामी आक्रमणाच्या प्रतिकाराची जी सिद्धता केली ती ही होय. पुन्हां ओवी १२० मध्यें ज्ञानेश्वरांनीं गुरुपूजा, अग्निपूजा, ब्राह्मणपूजा, श्राद्धपक्ष हाच स्वधर्माचा अर्थ सांगिला आहे. पुढें गीता ३–३५ या श्लोकावर टीका करतांना 'स्वधर्मे निधनं श्रेयः' या सर्वाधारभूत वचनावर ज्ञानेशांनीं भाष्य केलें आहे, तें तरी काय दर्शवितें ? शूद्राच्या घरीं उत्तम पक्वान्नें असलीं तरी ब्राह्मणानें तीं खाणें हें ज्याप्रमाणें अयुक्त, त्याप्रमाणें दुसऱ्याचा स्वधर्म म्हणजे जन्मानें ठरलेला व्यवसाय कितीहि चांगला असला तरी त्याचा आपण स्वीकार करणें अयुक्त होय. या टीकेवरून त्यांना वर्णसंकराची काळजी होती एवढेंच दिसतें. कडव्या अभिमानाची धार त्यांत कोठून येणार ? ब्राह्मणभोजन, वैश्वदेव, श्राद्धपक्ष हीच इस्लामच्या आक्रमणाविरुद्ध तयारी असली तर मग ज्ञानेश्वरांनी ती उपदेशिली होती हें फाटकांचें मत मान्य करावें लागेल. पण ज्ञानेश्वरानीं पुढील एका ओवीत म्हटलें आहे कीं, यामुळें परत्री-परलोकीं परमसुखाची प्राप्ति होईल ! आतां या असल्या स्वधर्माचरणानें जर परकीय आक्रमण टळतें असें मानलें तर तें आपल्या देशावर केव्हांच यावयास नको होतें. कारण ज्ञानेश्वरांच्या पूर्वी, त्यांच्या काळीं, त्यांच्यानंतर, स्वराज्यापूर्वी व स्वराज्यानंतरहि हा स्वधर्म सर्वच लोक पाळीत होते व आहेत.

वास्तविक स्वधर्म म्हणजे ज्याच्या त्याच्या जातीचा किंवा वर्णाचा व्यवसाय, जन्मप्राप्त उद्योग आणि पूजा, ब्राह्मणभोजन, गुरुभक्ति इ. सदाचार यापेक्षां निराळें असें ज्ञानेश्वरांना कांहींही अभिप्रेत नाहीं. पण तसें तें अभिप्रेत आहे, त्यांच्या स्वधर्म शब्दाचा अर्थ याहून जास्त व्यापक आहे असें फाटकांना आग्रहानें म्हणावयाचें आहे. आणि तेवढ्यासाठीं त्यानीं गीता अध्याय १८, श्लोक ४७, ४८ यांवरील ज्ञानदेवांच्या टीकेचा आधार दिला आहे. पण यामुळें त्यांचें प्रतिपादन जास्तच गोत्यांत आलें

आहे. कारण या टीकेंत स्वधर्म शब्दाचा अर्थ तिसऱ्या अध्यायांतील अर्थापेक्षां कांहीं निराळा आहे जास्त व्यापक आहे, असा संशयसुद्धां येत नाहीं. तसा व्यापक अर्थ नाहीं, स्वधर्म म्हणजे जन्मप्राप्त कर्म एवढाच अर्थ आहे, हें स्वतः ज्ञानेशांनीं त्यापूर्वींच्या ओव्यांत स्पष्ट केलें आहे. 'ऐसेसी गा पार्था, हे चातुर्वर्ण्यव्यवस्था, करूं आतां कर्मपंथा, याचिया रूप.' (ज्ञानेश्वरी, १८, ८२३.) 'भिन्न वर्णांच्या विहित कर्मांचें स्पष्टीकरण करतों' असें म्हणून व्यापक अर्थ कसलाहि नाही हें ज्ञानेश्वरांनीं निक्षून सांगितलें आहे त्यानंतर या स्वधर्माच्या आचरणानें फल काय मिळेल तेहि त्यांनीं सांगून टाकिलें आहे. जन्मानें आलेलीं कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें करणारा जो स्वधर्मनिष्ठ मनुष्य त्याला वैराग्य प्राप्त होतें, ईश्वराचा ध्यास लागतो व हें सर्व जग ओकारीसारखें किळसवाणें वाटूं लागतें. (ईश्वराचेनि वेधवशें, हें सर्वेहि नावडे, जैसें वांत होय) (१८–९१९) जग ओकारीसारखें वाटूं लागल्यावर मग परकीय आक्रमणाच्या प्रतिकाराचा उत्साह किती रहाणार? स्वधर्माचरण केलें नाहीं तर जग ओकारीसारखें होतें असें ज्ञानेश्वर म्हणत नाहींत. तो धर्म एकनिष्ठेनें पाळला म्हणजे तशी वृत्ति होते, असें त्यांचें म्हणणें आहे. स्वधर्म शब्दाचा ज्ञानेश्वरांच्या मनांत व्यापक अर्थ आहे, हें सिद्ध करण्यासाठीं फाटकांनीं हा आधार कशासाठीं दिला तें कळत नाहीं. हें विवेचन त्यांनीं बेसावधपणें केलेलें असावें, किंवा संतांवरील अनन्यप्रेमामुळें असें चुकीचें लिहिण्यास हरकत नाहीं असें त्यांचें प्रामाणिक मत असावें.

ज्ञानेश्वरींतील जीं वचनें फाटकांनीं अवतरून दिलीं त्यांचा विचार झाला. आतां त्यांच्या इतर विधानांचा परामर्श घ्यावयाचा आहे. इस्लामच्या आक्रमणास तोंड देण्यासाठीं शस्त्रसंघटना करण्याऐवजीं ज्ञानेश्वरादि संतांनीं भक्ति, वैराग्य, अहिंसा यांचा उपदेश कां केला असा कोणी प्रश्न विचारील. प्रा. फाटकांचें ह्याला उत्तर काय तें वर दिलेंच आहे. त्यांच्या मतें रणांगणांतील शौर्यधैर्याचा प्रभाव इस्लामपुढें चालत नाहीं, शस्त्रांच्या सामर्थ्याला इस्लाम भीक घालीत नाहीं, असें उत्तरेंतील अनुभवावरून संतांच्या, विशेषतः श्रीज्ञानेश्वरांच्या

ध्यानांत आलें; म्हणून लोकजागृतीचा हा नवा उपाय त्यांना स्वीकारावा लागला. ज्ञानेश्वरांच्या ओंव्यांवर ज्याप्रमाणें फाटकांनीं आपला अर्थ लादला, त्याप्रमाणें त्यांच्या अवलोकनशक्तीवरहि फाटकांनीं आपले निर्णय लादले आहेत असें स्पष्ट दिसतें. ज्ञानेश्वरांनंतर चाळीसच वर्षांनीं विजयनगरला राज्य स्थापून हरिहर, बुक्क व विद्यारण्य यांनीं शस्त्रबळानेंच इस्लामच्या आक्रमणास पायबंद घातला. त्यांच्या शौर्यधैर्याचा प्रभाव इस्लामपुढें सतत २५० वर्षे चालला. कृष्णा-नदीच्या दक्षिणेस रामेश्वरपर्यंत विजयनगरचें हिंदु साम्राज्य पसरलें होतें. हरिहर, नरसिंहराय, कृष्णदेव, रामराजा, यांनीं अनेक वेळां बहामनी राज्यावर स्वतः आक्रमण करून त्याचा मुलूख आपल्या राज्यास जोडला होता. उत्तरेस रजपुतांनीं तर हें कार्य ज्ञानेश्वरांच्या आधीं पांचशें वर्षे चालविलें होतें, आणि त्यांत ते यशस्वीहि झाले होते. इ. स. ७४० पासून अरबांच्या राजस्थानावर स्वाऱ्या होत होत्या. पण बाप्पा रावळ, दुसरा खुम्माण, जैत्रसिंग या वीरानीं त्या आक्रमणाचीं हाडें मोडून काढलीं. खुम्माण यानें चोवीस वेळां अरबांचा पराभव केला होता. जैत्रसिंग ( १२०० ते १२६१ ) यानें दिल्लीचा सुलतान शमसुद्दिन अल्तमश याचाहि पराभव केला होता. मध्यंतरीं अल्लाउद्दिनापुढें कांहीं काळ रजपुतांना नमावें लागलें, पण तें फार थोडा वेळ. महाराणा हम्मीर गादीवर येतांच त्यानें पुन्हा डाव उलटविला. त्यानें अल्लाउद्दिनाचा पराभव करून त्याच्या मुलाला कैदेंत टाकलें आणि जबर खंडणी घेऊन मग सोडलें. ह्यानंतर पुढील दोनतीनशें वर्षांत कुंभराणा, रायमल्ल, संगराणा, रत्नसिंह यांनीं अनेक वेळां गुजराथ, माळवा, दिल्ली, येथील सुलतानांचा रणांतच पराभव करून त्यांचा मोड केला. म्हणजे ज्ञानेश्वरांच्या आधीं पांचशें वर्षे व नंतर दोनशें वर्षे रजपुतांनीं इस्लामी आक्रमणास शस्त्र-बळानेंच धूळ चारली. इस्लामी आक्रमणाच्या प्रतिकाराचा विचार ज्ञानेश्वरांनां करावयाचा असता तर पंजाब, बंगाल, बिहार, स्थानेश्वर यांच्या पराभवांवरून निष्कर्ष न काढतां त्यांनीं पांचशें वर्षांच्या रजपुतांच्या विजयांवरून कांहीं अनुमान काढलें असतें. ते उत्तरेंत तीर्थयात्रेला गेले होते तेव्हां इस्लामच्या

शौर्याबरोबर त्यांना रजपुतांच्या शौर्याचा इतिहास कळला असलाच पाहिजे. दक्षिणेत आल्याबरोबर या बाबतींत त्यांनीं यादवराजांना सावध करावयास हवें होतें. तसें त्यांनीं कांहीं केलें नाहीं आणि आपली समाधि घेतली. विजयनगरचा व हम्मीरनंतरच्या रजपुतांचा अडीचशें वर्षांचा पराक्रम हा ज्ञानदेवांना माहीत नसला तरी फाटकांना माहीत आहे. तरी त्यांनीं 'इस्लामपुढें हिंदूचें शौर्य–धैर्य चालत नाहीं' असाच निष्कर्ष काढला. संतांवरील भक्तीमुळें पांगारकरांप्रमाणेंच त्यांची चिकित्साद्दष्टि पांगुळली आहे असें दिसतें. नाहीं तर त्यांनीं अशीं असत्य, प्रमादपूर्ण व भ्रामक विधानें केलीं नसतीं. अशीं विधानें करूं नयेत असें त्याचें मत असल्याचें त्यांच्या व्याख्यानांवरून स्पष्ट दिसून येतें.

ज्ञानेश्वरानीं 'भावार्थ–दीपिका' ही इस्लामच्या आक्रमणाच्या प्रतिकारार्थ लिहिली असें प्रा. फाटकांचें मत आहे. पण यावर शंका अशी येते कीं, सर्व ग्रंथाचें मूळ प्रयोजन, मूळ हेतूच हा असतांना, त्याचें सांगोपांग विवेचन करण्यास हरकत कोणती होती? देवधर्म, भक्ति, उपासना हा मार्ग असला तरी तो मार्ग अवलंबून कोणतें संकट टाळावयाचें हें ज्ञानेश्वरानीं स्पष्टपणें कां सांगितलें नाहीं? उत्तरेकडून जें संकट येत आहे त्याचें स्वरूप काय, त्याला उत्तरेतले देश स्वतःच्या अवगुणांमुळें बळी कसे पडले, रजपुतांनीं काय पराक्रम केले, त्याचें शौर्य-धैर्य इस्लामपुढें कसें काय टिकलें, हिंदूंना शस्त्रबळानें इस्लामला तोंड देणें कां शक्य नाहीं, इत्यादि सविस्तर विवेचन त्यांनीं कां केलें नाहीं? त्या वेळीं स्वराज्य होतें, यादवराजे राज्य करीत होते. तेव्हां भीति कसलीच नव्हती. आणि असली तरी ज्ञानेश्वर भ्याले असते असेंहि वाटत नाहीं. तेव्हां त्यांच्या मनांतच हा विषय नव्हता असें म्हटलें पाहिजे. नाहींतर इतर विषयांवर पाल्हाळिक विवेचन करून मुख्य विषय मात्र 'आज्ञापक होआल', 'वाचासिद्धि पावाल', 'तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे' अशा तुरळक वाक्यांतून त्यांनीं फक्त ध्वनित केला असें म्हणावें लागेल. हा आरोप फारच भयंकर होईल. प्रा. फाटकांना तो मान्य होईल असें वाटत नाहीं. ज्ञानेश्वरांच्या असत्य

तुरळक वाक्यांमुळें जनतेंत इस्लामच्या प्रतिकाराची सिद्धता झाली असें मानावयाचें तर श्रीतुकाराममहाराजांच्या अनेक वचनांमुळें इंग्रजी आक्रमणास तोंड देण्याची तयारी झाली व १९४७ सालीं स्वातंत्र्य त्यामुळेंच मिळालें असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. ज्ञानेश्वरी १२९० सालीं लिहिली गेली. आणि शिवछत्रपतींनीं स्वराज्याची शपथ घेतली ती १६४७ सालीं. म्हणजे ३५० वर्षांनीं ! तुकाराम १६४९ सालीं वैकुंठवासी झाले. त्यानतर ३०० वर्षांच्या आंतच आपल्याला स्वातंत्र्य मिळालें. म्हणजे ज्ञानेश्वर ते शिवछत्रपति याच्यापेक्षां तुकाराम ते पडित नेहरू हा ताण फार होणार नाहीं. 'आम्ही विष्णुदास, कठिण वज्रास, भेदूं ऐसे । दुर्जनाशी पंचानन, तुका रजरेणु संताचा ' अशीं वचनेंहि तुकाराममहाराजांच्या अभंगांत हवीं तितकीं सांपडतील.

ज्ञानेश्वरांनीं राष्ट्रीय प्रपंचाकडे, समाजावर कोसळणाऱ्या ऐहिक आपत्तीकडे लक्ष दिलें होतें, ज्ञानेश्वरी लिहिण्यांत त्यांचा तोच हेतु होता असें सिद्ध करण्याचा प्रा. फाटकांनीं जो अट्टाहास केला आहे त्यावरून एवढेंच सिद्ध होतें कीं समाजाच्या ऐहिक उन्नतीकडे, अभ्युदयाकडे, संघटना, सामर्थ्य, स्वातंत्र्य यांकडे लक्ष दिलें नाहीं तर तो संतांचा कमीपणा आहे, हें राजवाडे यांचें मत फाटकांना मान्य आहे. तसें असल्यामुळेंच त्यांनीं उपक्रम-उपसंहार, प्राधान्य, अभ्यास इत्यादि मीमांसेच्या ग्रंथतात्पर्यनिर्णयाच्या अगदीं प्राथमिक कसोट्याहि दुर्लक्षून संतवाङ्मयाचा नवीन अर्थ बसवून दाखविण्याचा खटाटोप केला आहे. त्यांत इतिहासचिकित्सेपेक्षां त्यांचें संतप्रेम बलवत्तर झाल्यामुळें, एक नवी बौद्धिक सर्कस, यापलीकडे त्यांची गति झाली नाहीं हा भाग निराळा. पण इतिहासमीमांसेला भक्तीपेक्षां चिकित्सेचें महत्त्व जास्त असल्यामुळें त्यांचे ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास यांच्यावरील प्रबंध इतिहासमीमांसेच्या सदरांत न येतां, भक्तिसंप्रदायांतील ग्रंथांत जमा होण्याजोगे झाले आहेत. कदाचित् प्रा. फाटकांना यांतच गौरव वाटण्याचा संभव आहे.

संतांचे अर्वाचीन काळांतले दुसरे पाठीराखे म्हणजे श्री. बा. रं. सुंठणकर

हे होत. ' महाराष्ट्रीय संतमंडळाचें ऐतिहासिक कार्य ' हें त्यांचें पुस्तक आहे. यांनीं मार्क्सवादी दृष्टिकोनांतून संतांच्या कार्याचें परीक्षण केलें आहे. म्हणजे काय केलें आहे तें आपण पुढें पाहूं. पण त्यांच्या लेखनावरून एक शंका येते ती आधीं सांगतों. हे गृहस्थ संतांना अनुकूल लिहीत आहेत कीं त्यांची निंदा करीत आहेत तें कळत नाहीं. केव्हां केव्हां ते जाणूनबुजून त्यांची चेष्टा करीत असावेत असें वाटतें. निदान नकळत तरी ती त्यांनीं केली आहे यांत शंका नाहीं. असें कां म्हणावेंसें वाटतें तें एकदर विवेचनाच्या ओघांत स्पष्ट होईलच. सुंठणकरांचीं प्रमुख विधानें पुढीलप्रमाणें आहेत : कारागीर व्यापारी, स्त्री, शूद्र इ. कनिष्ठ गणलेल्या वर्गांतून व जातींतून संत-चळवळ उदयास आली ( पृ. ३४ ). हा वर्ग अत्यंत दीन, दरिद्री, निराशाग्रस्त असा होता. राजे, ब्राह्मण सरंजामदार या वर्गाला पिळून काढीत होते. त्याला जीवन असह्य झालें होतें आणि त्यांतून भक्तिमार्ग ही संतांनीं पळवाट निर्माण केली. ( पृ. ३३ ). संतांची चळवळ हें पुरोहितशाहीविरुद्ध बंड होतें. संतांना समाजाला दुरवस्थेतून सोडवावयाचें होतें. ( पृ. ३८ ). पुरोहितशाही नष्ट करणें, समता प्रस्थापित करणें हें संताचें कार्य व भक्तिमार्ग हें त्यांचें साधन असा थोडक्यांत निष्कर्ष आहे. आतां सुंठणकरांच्याच मतें संतांची चळवळ कितपत यशस्वी झाली तें पाहूं. संत सामाजिक क्रांति करूं शकले नाहींत. ( पृ. १४७ ) ब्राह्मणांचें वर्चस्व ते नष्ट करूं शकले नाहींत. इतकेंच नव्हे तर त्यांच्यापैकीं कांहींनीं ( खरें म्हणजे सर्वांनींच—लेखक ) ब्राह्मणांचें श्रेष्ठत्व स्वतःच मान्य केलें होतें ( पृ.१४८. ). श्रुतींवरील अंधश्रद्धा, शब्दप्रामाण्य, कर्मवाद इत्यादि ( मन पंगु करणाऱ्या ) गोष्टी त्यांनीं तशाच ठेविल्या. त्यांनीं पुरोहितशाहीविरुद्ध लिहिलें; पण ब्राह्मणांच्या जागीं गुरु आणून ठेविला. देव आणि मनुष्य यांच्यांमधला पुरोहित हा एजंट जाऊन त्याऐवजीं गुरु आला. ( पृ. १५२ ) जुनीं प्रामाण्यें संतांनीं मान्य केल्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न त्यांच्या चळवळींत पुढें आला नाहीं.

संतांना वरील प्रकारचें अपयश कां आलें याची कारणमीमांसाहि सुंठण-

करांनीं केली आहे, आणि ती वाचतांना सुंठणकर संतांची चेष्टा करीत असावे असा बळकट वहीम येतो. ते म्हणतात, हा दोष परिस्थितीचा आहे; संतांचा नाहीं. परिस्थितीचा दोष म्हणजे काय ? त्याचा खुलासा असा : संत हे व्यापारीवर्गांतले, अलुतेदार, बलुतेदार या वर्गांतले होते. तुकाराम (वाणी), नामदेव (शिंपी), नरहरि (सोनार), याचप्रमाणें कुंभार, लोहार, परीट, महार, मांग, तेली, धोबी, माळी या वर्गांतले संत होते. या वर्गाचें जीवन सर्वस्वी रूढ समाजव्यवस्थेवर अवलंबून असतें—तेव्हां तरी होतें. त्या वेळच्या ग्रामपद्धतीवर त्यांचें सर्व भवितव्य अवलंबून होतें. या त्याच्या विशिष्ट वर्गस्थितीमुळें समाजव्यवस्थेविरुद्ध बंड करण्याची मनोवृत्ति या वर्गांत निर्माण होणें शक्य नव्हतें; कारण रूढ समाजव्यवस्था उलथून पाडणें म्हणजे आत्मनाश करून घेण्यासारखें झालें असतें. रूढ समाजव्यवस्थेंत त्यांच्या जीवनाचें स्थैर्य होतें. ही व्यवस्था मोडली तर स्वतःच्या चरितार्थाची हमी हा वर्ग गमावून बसेल, असें वाटल्यामुळें संतांनीं ती समाजव्यवस्था उध्वस्त केली नाहीं (पृ. १५४). म्हणजे संतानीं क्रांति केली नाहीं ती चरितार्थाच्या काळजीमुळें केली नाहीं ! त्यांनीं रूढ व्यवस्था उलथून टाकली असती तर त्यांच्या पोटावर पाय आला असता. संतांचें ब्रीद काय ? तर पुरोहितशाही नष्ट करणें, दुरवस्थेंतून समाजाला सोडविणें, समता प्रस्थापित करणें ! यांत ते अयशस्वी कां झाले ? चरितार्थ नष्ट होईल या भीतीनें ! हा संतांचा गुणगौरवच होय !

संत अपयशी होण्यास आणखी एक कारण सुंठणकरांनीं दिलें आहे. या देशांत त्या काळीं नित्य यादवी होती, अराजक माजलें होतें. म्हणून येथें व्यापारीवर्ग—म्हणजेच संतांचा वर्ग—प्रभावी होऊं शकला नाहीं. व्यवस्थित, शांततामय आणि केंद्रीभूत अशी राजवट या वर्गाला लाभली असती तर संत-चळवळीनें मोकळ्या सोडलेल्या शक्तींची परिणति नव्या युगाला जन्म देण्यांत झाली असती. पण तें भाग्य हिंदुस्थानांतील व्यापारीवर्गाला लाभलें नाहीं. त्यामुळें संत-चळवळींत पुढें नवा जोम येऊं शकला नाहीं. (पृ.१५०).

याचा अर्थ काय होतो पहा. राजे, सरंजामदार, ब्राह्मण हे वर्ग कनिष्ठवर्गांना म्हणजे संतांच्या वर्गांना पिळून काढीत होते. त्यांच्याविरुद्ध संतांना बंड करावयाचें होतें, त्यांचें वर्चस्व नष्ट करावयाचें होतें. तें कार्य संतांना कां साधलें नाहीं ? तर त्या वरिष्ठवर्गानें त्यांना व्यवस्थित, केंद्रीभूत, शांततामय राजवट निर्माण करून दिली नाहीं म्हणून ! म्हणजे या क्रांतिकारकांना त्यांच्या शत्रूंनीं शांत राजवट प्रस्थापित करून द्यावयाची व मग हे त्यांचें वर्चस्व नष्ट करणार ! युरोपांत किंवा अन्यत्र जेथें जेथें व्यापारीवर्गानें क्रांति केली असें मार्क्सवादी म्हणतात, तेथें तेथें व्यापारीवर्गानें आपल्या बलानें, सामर्थ्यानें, राजसत्तेला नमवून, सरंजामदारांना शरण आणून, कैचींत धरून आपलें कार्य सिद्ध केलें व नवयुग जन्मास आगलें अशी मीमांसा ते करतात. युरोपांत शांततामय राजवट व्यापाऱ्यांना प्रथम दुसऱ्या कोणीं निर्माण करून दिली आणि मग त्यांनीं क्रांति केली असें कोणी म्हणत नाहीं; आणि शांततामय राजवट क्रांतीला लागते हेंहि खरें नाहीं. अराजकांत शासनसंस्था डळमळित झालेली असते; त्याच वेळीं क्रांति सुलभ असते. पण सुंठणकराच्या मतें, महाराष्ट्रांत तसें नव्हतें. येथला कारागीरवर्ग अराजकामुळें हतबुद्ध झाला. शांतता स्वतः प्रस्थापित करण्याचें सामर्थ्य त्याच्या ठायीं नव्हतें. आणि त्याला दुसऱ्या कोणीहि शांत घरकुल मांडून संसार लावून दिला नाहीं. नाहीं तर ?— त्यानें निश्चित क्राति केली असती !

हा संतांचा गौरव आहे ! आणि ही इतिहासाची मार्क्सवादी मीमांसा आहे ! 'हिस्टॉरिकल नेसेसिटि' (ऐतिहासिक गरज) याचा मार्क्सच्या लिखाणांत एक विशिष्ट अर्थ असतो. अर्थसाधनांच्या विकासाला चालू परिस्थिति प्रतिबंध करूं लागली कीं, नवी परिस्थिति निर्माण व्हावी ही ऐतिहासिक गरज निर्माण होते, असें मार्क्स म्हणतो. तेव्हां त्या गरजेप्रमाणें नवा वर्ग निर्माण होणारच व तो क्रांति यशस्वी करणारच, असा त्याचा अर्थ असतो. नाहींतर 'ऐतिहासिक' या शब्दाला अर्थ काय ? समाजांत सुधारणा व्हावी ही गरज सर्वत्र असतेच, आणि ती प्राचीन काळापासून सर्वांनींच सांगितलेली

आहे. नवी घडी व्हावी अशी गरज आहे, पण ती भागत नाहीं ही इतिहास-मीमांसा जुनीच आहे ती गरज ' ऐतिहासिक गरज ' झाली कीं जुन्याच्या अभ्यंतरांत नव्याची तयारी झाली, गर्भ परिपक्व झाला, आता तो जन्माला येणारच, असा मार्क्सचा भावार्थ आहे संत-चळवळ ही ' ऐतिहासिक गरज ' होती असें सुंठणकरांनीं अनेक ठिकाणीं म्हटलें आहे. आणि ती अयशस्वी झाली असेंहि त्यांनींच सांगून टाकलें आहे. मार्क्सवादी मीमांसा ती हीच !

संतांच्या चळवळीच्या अपयशाचें आणखी एक कारण सुंठणकर देतात. संतांच्या धार्मिक चळवळीचें पुढें सामाजिक व राजकीय उत्थानांत रूपांतर झालें नाहीं हे अपयश होय. असें कां झालें ? शीखांची चळवळ प्रथम धार्मिक होती तरी त्यांनीं पुढें तिचे राजकीय चळवळींत रूपांतर करून राजसत्ता प्रस्थापित केली. संतांना जें साधलें नाहीं तें शिखांना कां साधले ? सुंठणकर म्हणतात, ही शीखांचीं राजसत्ता प्रस्थापित व्हावयाला मोगलांनीं विशेषत: औरंगजेबानें शीख-धर्मीयांचा जो छळ केला तो कारणीभूत झाला ( पृ. १५९ ) आता संतांवर असा जुलूम कोणीं केला नाहीं, त्यांचा छळ करायला कोणीच पुढें आला नाहीं, त्याला ते तरी बिचारे काय करणार ? तसा छळ केला असता तर ? — मग त्यांनीं बरोबर क्रांति केली असती ! आता स्वत: सुंठणकरांनींच म्हटले आहे कीं, संतांच्या वर्गाला ब्राह्मण, राजे हे अगदीं पिळून काढीत होते; त्यांना जीवन असह्य झाले होतें; ( पृ. २० ते ४० ) तरी पण त्यांचा छळ होत नव्हता असें त्यांचे मत दिसतें. ही खरोखर मोठीच सामाजिक समस्या आहे. आपला छळच जर कोणीं केला नाहीं तर आपण काय करणार ? आपली उन्नति कशी होणार ? संतांखेरीज इतर क्रांतिकारकांनी याला एक युक्ति शोधून काढली आहे. जी समाजव्यवस्था त्यांना नको असेल तिच्या विरुद्ध ते बंड करतात. तिचे कायदे ते मोडतात. मग आपोआपच त्यांचा छळ होतो. चरितार्थावर गदा येईल अशी भीति ते बाळगीत नाहींत, कारण ती आलेलीच असते. आत्मनाशाला ते भीत नाहींत, कारण तो डोळ्यांपुढे दिसूं लागलेला असतो. प्रचलित समाज-पद्धतीशीं ज्यांचे हितसंबंध गुंतलेले असतात असे वर्ग

कधींच क्रांति करूं शकत नाहींत 'हा भ्रामक सिद्धांत (सुंठणकर, पृ. १५४) ते उराशीं धरून बसत नाहींत. पण संतांना हें सुचलें नाहीं. त्यांच्या वर्गाचा असह्य छळ होत होता. त्याना जीवन असह्य झालें होतें. त्यांचा चरितार्थ चालत नव्हता. तरी चरितार्थावर गदा येईल म्हणून सर्वभूतांचें हित त्यांच्या मनात असूनहि त्यांनीं बंड केलें नाहीं! हें मार्क्सवादी इतिहासविश्लेषण आहे आणि ही संताची प्रशस्ति आहे! सुंठणकर पुढें म्हणतात, संत हे स्वातंत्र्याला भीत होते. जुनीं बंधनें तुटलीं तर जीवनाची हमी जाईल, स्थैर्य जाईल अशी त्याना भीति वाटली. लहान मूल आईला बिलगून राहातें, त्याला स्वातंत्र्याचें भय वाटतें, तसेंच संताचें झालें होतें. प्राप्त परिस्थितीला शरण गेल्याखेरीज गत्यंर नाहीं अशी त्याची भावना होती (पृ. १५५, १५६) आणि अशी ही संत-चळवळ भारताच्या, महाराष्ट्राच्या ऐतिहासिक गरजेंतून निर्माण झाली होती! (पृ. ४०.)

संतांचा अशा गौरव करून अखेर सुंठणकरांनीं निर्णय दिला आहे कीं, संतांनीं संसाराची अवहेलना करण्यास शिकविलें हें खरें नाहीं. संसार करावा असेंच त्यांनीं शिकविलें आणि संतांनीं जें समाजकार्य केलें त्याचा उपयोग मराठी राज्यस्थापनेच्या कामीं झाला. संतांनीं समाजाला विचारजागृत व कार्यप्रवण केलें म्हणूनच स्वराज्याचा उदय झाला. अशा रीतीनें संतांच्या कार्याची मीमांसा सुंठणकरांनीं प्रा. न. र. फाटक यांच्याहून अगदीं निराळी केली असली तरी प्रवृत्तिवाद व स्वराज्याशीं संबंध या बाबतींत त्यांचें मत फाटकांच्यासारखेंच आहे.

संतवाङ्मयाचें विवेचन करून संत प्रवृत्तिवादी होतें असें सांगणारे सध्यांचे तिसरे पंडित म्हणजे प्रा. गं. बा. सरदार हे होत. 'संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति' हें त्यांचें लहानसें पुस्तक पहिल्या दोन पंडितांच्यापेक्षां पुष्कळच उद्बोधक व आदरणीय आहे. प्रा. सरदार हे मार्क्सवादी आहेत, पण कम्युनिस्ट नाहींत. सुंठणकरांचे निष्कर्ष त्यांना मान्य नाहींत. येथला शेतकरी भूदास होता, येथें ब्राह्मणशाही होती, रामदासांचें कार्य स्वार्थी व

संधिसाधूपणाचें होतें ही सुंठणकरांची विधानें त्यांनीं खोडून काढलीं आहेत. तरी ज्ञानेश्वर-तुकारामादि संत हे निवृत्तिवादी होते हें त्यांना मान्य नाहीं. संतांनीं समाजाला नेभळट बनविलें, निष्क्रिय बनविलें हे राजवाडेप्रणीत आरोप त्यांना हास्यास्पद वाटतात. संतांनीं अध्यात्माकडेच सर्व लक्ष दिलें असें कोणीं म्हटलें तर प्रा. सरदार म्हणतील कीं, टिळक व महात्माजी यांचीहि वृत्ति ज्ञानेश्वराप्रमाणें अध्यात्मप्रधानच होती. त्यांच्या मतें, ज्ञानेश्वरादि संतांच्या शिकवणुकीमुळें समाजाला आपल्या सुप्त शक्तींची व भावनांची जाणीव झाली व पराभूतपणाची वृत्ति नाहींशी होऊन प्रतिकूल परिस्थितीला कणखरपणें तोंड देण्याची त्यांच्या मनाची तयारी झाली मागील दोघां लेखकांच्या मतांप्रमाणेंच शिवाजीचा व मराठी राज्याचा उदय आणि संतांची चळवळ यांचा दृढ संबंध आहे, त्यांचा कार्यकारणसंबंध आहे, असेंच प्रा. सरदारांचें मत आहे. तेव्हां त्यांनीं आपल्या पुस्तकात वरील सिद्धान्ताच्या समर्थनार्थ जीं प्रमाणें दिलीं आहेत, विधानें केलीं आहेत व निष्कर्ष काढले आहेत त्यांचा परामर्ष घेऊन हा लेख संपवूं.

प्रा. सरदारांच्या मतें भौतिक दुरवस्था व मानसिक गुलामगिरी यांमुळें सामान्य जनता जडमूढ व अगतिक बनली होती व त्या केविलवाण्या स्थितींतून तिला मुक्त करण्यासाठीं संत-चळवळ जन्मास आली होती ( पृ. १४ ). यांत संतांना कितपत यश आलें तें प्रा. सरदार यांनीं केलेल्या विवेचनाच्या आधारेंच आपण पाहूं लागलों तर एक गोष्ट स्पष्ट दिसते, कीं भौतिक दुरवस्था नष्ट करण्याचा संतांनीं प्रत्यक्षपणें प्रयत्नहि केला नाहीं. संतांनीं केलें काय, तर दारिद्र्यांतहि, म्हणजे बाह्य जीवन अगदीं हीन-दीन असतानाहि, आंतरजीवन समृद्ध करावें, विठोबाची भक्ति करावी, मन शांत ठेवावें, संसारांतून मन अलिप्त करावें, येतील त्या आपत्ती सोसाव्या, अशी शिकवण दिली. दारिद्र्य, जुलूम, परकीय आक्रमण, सामाजिक हीनता, अप्रतिष्ठा यांत बदल करण्याचा संतांनीं काडीमात्र प्रयत्न केला नाहीं. परिस्थितींत आमूलाग्र बदल घडवून आणण्याची यातायात न करतां तिच्याविषयीं उदासीन राहण्याची प्रवृत्ति

ठेवावी असा संतांचा उपदेश होता (पृ. १७). संत प्रापञ्चिक दुःखांवर मात करीत ती या पद्धतीनें. भौतिक दुरावस्थेंतून जनतेला मुक्त करण्याचा संतांचा हा मार्ग होता !

यावर एक साधा प्रश्न विचारावासा वाटतो. संतांची चळवळ बहुजन-समाजासाठीं होती. त्यापैकीं, दारिद्र्य, उपासमार, अप्रतिष्ठा, जुलूम, अज्ञान यांनीं वेढलेले असतांना आंतरजीवन समृद्ध करणें किती जणांना शक्य होतें ? ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम या थोर विभूतींना ही गोष्ट सुलभ होती. पण यांचें एकंदर समाजाशीं प्रमाण काय ? इतरहि त्या काळीं थोडे-फार प्रसिद्ध असलेले सर्व संत घेतले आणि त्यांना ही धैर्यशाली उदासीनता साध्य झाली होती असें मानलें, तरी त्याची संख्या किती ? दहा हजारांत एक असें अल्प तरी हें प्रमाण पडेल काय ? भाकरी नसतानाहि उच्च मनोधैर्य, उज्ज्वल अभिमान व आत्मप्रतिष्ठा केवळ मनानें टिकवून धरणें हे लाखात एखाद्याला शक्य आहे. बाकीच्याच्या बाबतीत तो मिथ्याचार होतो. असला उपदेश त्याना जास्तच दीन, दुबळे बनवितो. त्याच्या बाबतींत प्रापञ्चिक दुःखावर मात, मनोधैर्य, आतरिक समृद्ध जीवन हे शब्द खरोखर फोल आहेत. भौतिक सृष्टीचें ज्ञान त्या काळीं नव्हते, म्हणून आतांसारखी समृद्धि शक्य नव्हती हे खरें असलें तरी त्या काळांतहि सामाजिक विषमता नष्ट करणें, प्रयत्नवाद शिकविणें, परकीय आक्रमणाविरुद्ध प्रत्यक्ष संघटना उभारणें अशा प्रयत्नांनीं भौतिक दुरवस्था कितीतरी कमी करतां आली असती. विजयनगरच्या राज्यात ती केलीच होती. तसा कसलाहि प्रयत्न संतांनीं केला नाहीं. आणि छळ झाला, उपासमार झाली, अपमान झाला, दुःख झालें तरी त्याविषयीं उदासीन रहावें, मन अलिप्त ठेवावें व विठ्ठलाकडे मन लावून आंतरिक जीवन समृद्ध करावें असा उपदेश संतांनीं केला. त्यांना मोक्ष-धर्माखेरीज दुसरें कांहीं करावयाचेंच नव्हतें असें म्हणणें भाग आहे. त्या वेळीं भौतिक समृद्धि निर्माण करणें शक्यच नव्हतें या म्हणण्यांत अर्थ नाहीं.

मानसिक गुलामगिरीच्या दृष्टीनें विचार केला तरी हेंच दिसेल. कर्मवाद,

शब्दप्रामाण्य, गुरुभक्ति, विहित कर्मांची आवश्यकता, ब्राह्मणांचें श्रेष्ठत्व, प्रारब्धाधीनता यांच्या पकडींतून संतांनीं बहुजनसमाजाला मुळींच सोडविलें नाहीं. त्यांचा तसा प्रयत्नहि नव्हता. त्यांची स्वतःचीच त्या तत्त्वावर पूर्ण श्रद्धा होती. त्यामुळें मनाला दौर्बल्य आणणाऱ्या ह्या सिद्धांतावर त्यांनीं हल्ला तर केला नाहींच, उलट ठायीं ठायीं त्याचें समर्थन केलें. ज्ञानेश्वराविषयीं विवेचन करतांना प्रा. सरदार नेहमीं म्हणतात कीं, काळाचा ओघ ओळखून त्यांनीं आमूलाग्र क्रांतीचा उपदेश केला नाहीं, आकाशाला गवसणी घालण्याचा प्रयत्न केला नाहीं, हेंच योग्य होतें. पण संत–चळवळ चारशें वर्षे चालली होती. या काळांत पुढेसुद्धां भौतिक दुरवस्था प्रत्यक्ष नाहींशीं करण्याचा व प्रारब्ध, संचित, कर्म, शब्द, गुरु, चातुर्वर्ण्य, यांच्या मगरमिठींतून समाजाला सोडविण्याचा अणुमात्र प्रयत्न संतांनीं केला नाहीं. याचा अर्थ काय? प्रा. सरदार म्हणतात कीं, शेतकरी व कारागीर यांना प्रयत्नवादाचे पाठ देण्याची बिलकुल जरूर नव्हती. कारण ते दिवसभर खपतच होते (पृ. ८२). प्रा. सरदारांच्यासारख्या विचारवंतांनी असें म्हणावें हें दैवदुर्विलसित आहे. दिवसभर खपणें हें प्रयत्नवादाचें लक्षण कीं काय? आपल्या प्रयत्नाचें फळ भौतिक साधनांवर, आपल्या उद्योगावर, कर्तृत्वावर, बुद्धिमत्तेवर अवलंबून आहे अशी आत्मश्रद्धा म्हणजे प्रयत्नवाद होय. तो निर्माण होताच याच शेतकरी–कारागीर लोकांनीं मोठ्या उलाढाली केल्या असत्या, शेती समृद्ध करण्याचे त्या काळीं शक्य असलेले धरणें–कालवे यांसारखे प्रयत्न केले असते, व्यापार वाढविला असता. पण ती श्रद्धा त्यांच्या ठायीं नव्हती. संतांनीं प्रारब्धवाद, दैववाद, कर्मवाद यांचें समर्थन करून, त्यांचा उपदेश करून, ती श्रद्धा उत्पन्न होण्याचा संभव नष्ट करून टाकला होता. मानसिक गुलामगिरींतून समाजाला सोडविण्याचें सामर्थ्य संतांच्या स्वतःच्या ठायींच नव्हतें. कारण ते स्वतःच त्या दुबळ्या तत्त्वांवर अचल श्रद्धा ठेवून होते.

संत प्रवृत्तिवादी होते हें सिद्ध करण्यासाठीं शिवाजीमहाराजांचा व मराठी राज्याचा उदय हा संतांच्या चळवळीमुळेंच झाला, संतांनीं त्याची पूर्वतयारी

करून दिली, असें नित्य सांगण्यांत येतें. या मुद्याचा आतां थोडा विचार करूं. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं १२९० सालीं ज्ञानेश्वरी लिहून या आंदोलनाला प्रारंभ केला. त्यानंतर पुढील अडीचशें वर्षांत नामदेव, नरहरि, चोखामेळा, सांवतामाळी, विसोबा खेचर, राका, बंका, नागा असे अनेक संत झाले. या अडीचशें वर्षांच्या काळांत महाराष्ट्राची काय स्थिति होती ? प्रा. सरदार व प्रा. फाटक या दोघांच्याहि मतें, हा काळ अत्यंत अवनतीचा, निराशेचा, अंधाराचा होता. या काळांत वीर पुरुषांची परंपरा खुंटली, धर्मप्रसाराची ऊर्मि ओसरली, वाङ्मयाची प्रेरणाहि संपुष्टांत आली. दोन–अडीचशें वर्षे महाराष्ट्राला शिलावस्था प्राप्त झाली होती. ( फलश्रुति–पृ.४५, ४६ ). या काळांत हिंदु अगदीं प्रतिकारशून्य, हीन, दीन, चारित्र्यशून्य झाले होते, असें फाटकांनींहि लिहिलें आहे. ( श्रीएकनाथ, वाङ्मय आणि कार्य—पृ. १२, ५०, ५२ ). ज्ञानेश्वर, नामदेव व इतर अनेक संत जेथें झाले तेथली ही स्थिति. त्याच काळीं विजयनगरचें साम्राज्य विस्तीर्ण होत होतें. त्याचें वैभव वाढत होतें. लोकाचें ऐहिक जीवन समृद्ध होत होतें. त्यांची प्रतिष्ठा व आत्मश्रद्धा वाढत होती. पण स्वराज्याच्या, साम्राज्याच्या अभिवृद्धयर्थ दक्षिणेंत संत-चळवळीची आवश्यकता भासली नाहीं. उत्तरेंत बंगाल, बिहार, गुजराथ, उत्तर-प्रदेश येथें महाराष्ट्राप्रमाणेंच संतांची चळवळ चालू होती; पण तेथें स्वराज्याचा उदय झाला नाहीं. आणि महाराष्ट्रांतहि ज्ञानेश्वरांनंतर ३५० वर्षे कांहीं झालें नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणें राजस्थानांत ७४० पासून १२६० पर्यंत रजपुतांनीं अरबी, अफगाणी, तुर्की आक्रमणास यशस्वीपणें तोंड दिलें; आणि पुढेंहि २५० वर्षे आपलें स्वातंत्र्य टिकवून अनेक वेळा इस्लामी सुलतानांवर आक्रमण करून मात केली. असल्या प्रकारच्या धार्मिक चळवळीची प्रेरणा त्याच्या मागें नव्हती, तरी ते यशस्वी झाले. सोळाव्या शतकाच्या अखेरीस रजपूत अकबरापुढें नामोहरम झाले. महाराणा प्रतापसिंह यांना या झगड्यांत यश मिळालें नाहीं, बहुतेक सर्व रजपूत राजांनीं मोंगलांचें मांडलिकत्व पत्करलें आणि आपल्या कन्या त्यांच्या जनानखान्यांत धाडल्या. त्या वेळीं

राजस्थानांत संत-चळवळ चालू झाली होती. खुद्द मेवाडमध्येंच मिराबाई पंधराव्या शतकांत होऊन गेली, आणि मग भक्तिसंप्रदाय तेथें चालू झाला. महाराष्ट्रांतल्याप्रमाणें या एकदोन शतकांत सर्वच प्रांतात ही लाट उसळली होती. रामानंद, कबीर, विद्यापति ठाकूर, चंडीदास, चैतन्य असे भक्तिसंप्रदायाचे थोर प्रवर्तक या एकदोन शतकांत सर्व प्रांतात होऊन त्यांनीं आपल्या पंथांची स्थापना व प्रसार केला होता. विजयनगरचें साम्राज्य बुडालें व रजपूत नामोहरम झाले त्या वेळीं या दोन्ही देशात भक्तिसंप्रदाय प्रसृत झाला होता. हें सर्व ध्यानीं घेऊन, ऐहिक जीवनाविषयीं उदासीन असावें, त्याला ओकारीसारखें समजावें, जन्माला आल्याची लाज वाटावी इत्यादि उपदेश करणाऱ्या संतांची चळवळ आणि शिवछत्रपतींचा उदय यांत कार्यकारणसबंध कितपत जोडतां येईल याचा वाचकांनींच विचार करावा.

संतांनीं महाराष्ट्राला एकांतिक निवृत्तिवाद शिकविला, नेभळें बनविलें, कर्मवाद, गुरुभक्ति याची शिकवण देऊन पंगु करून ठेविलें. या राजवाड्यांच्या टीकेला उत्तर देतांना, सर्वच पंडित आपल्या मतें अत्यंत निर्णायक असा आणखी एक मुद्दा नेहमीं पुढें आणतात. तो हा कीं, संतानीं संसार सोडावा, संन्यास घ्यावा, वनांत जावें, असा कधींहि उपदेश केला नाहीं; उलट संन्यासाचा त्यांनीं निषेधच केला आहे. ससारांत राहावें असें त्यानीं आग्रहानें सांगितलें आहे. गृहस्थधर्माची महती गाइली आहे. मोक्षासाठीं संसार सोडून अरण्यांत जाण्याची मुळींच जरूर नाहीं असें कटाक्षानें प्रतिपादिलें आहे. आतां संतांनीं संसारत्याग करावा व संन्यास घ्यावा असें सांगितलें नाहीं हें खरें आहे. संसारांत राहूनच मोक्ष मिळवितां येतो असें त्यांनीं पुन्हां पुन्हां बजाविलें आहे यांत वाद नाहीं. त्या अर्थाचीं शेंकडों वचनें संतवाङ्मयांत सांपडतात. विहित कर्मांचा, स्वधर्मांचा किंवा निजवृत्तीचा कधींहि त्याग करूं नये, त्या स्वधर्माच्या आचरणानेंच मोक्ष मिळतो असा संतांचा आग्रह होता. ‘ नको सांडूं अन्न, नको सेवूं वन, चिंती नारायण, सर्व भोगीं । जोडोनियां धन उत्तम वेव्हारें, उदास विचारें, वेंच करी । विधीनें सेवन, विषयत्यागातें

समान।' (तुकाराम.). 'घर सांडूनिया वन सेवतात, वनीं कां नसती रीस व्याघ्र।' (नामदेव.) अशा तऱ्हेचीं संतांचीं वचनें ठायीं ठायीं सांपडतात. कर्में टाकूं नयेत, फक्त कर्मफलाची आसक्ति टाकावी; भोग वर्ज्य करण्याचें कारण नाहीं, फक्त भोगलालसा मात्र नसावी. —'तुवा शरीरपरा नोहावे, कामनाजात सांडावें, मग अवसरोचित भोगावे, भोग सकळ।' (ज्ञानेश्वर.) अशी संतांची शिकवण होती. तेव्हां संसार सोडावा असें संतांनीं सागितलेलें नाहीं, संन्यासधर्माचा पुरस्कार त्यांनीं केलेला नाहीं, हे मान्य आहे.

पण याचा अर्थ संत प्रवृत्तिवादी होते असा होतो काय? 'प्रवृत्ति'चा अर्थ इतका क्षुद्र आहे काय? प्रवृत्तिधर्माची इतकीच विवक्षा आहे? त्या कल्पनेचा अर्थ इतका लहान व इतका संकुचित आहे कीं काय? राष्ट्रीय प्रपंचाविषयीची जी उभारी, विश्वविजयाची जी आकांक्षा, सृष्टीवर मात करण्याची जी ईर्षा ती, संसारांत रहायला हरकत नाहीं, तो मोक्षाच्या आड येणार नाहीं, अशा अकरणात्मक, नकारात्मक भाषेनें व्यक्त होते, असें या पंडिताचें मत आहे काय? संत प्रवृत्तिवादी होते, कर्मयोगी होते, ऐहिक उत्कर्षाची ते चिंता वहात होते असें पुनः पुन्हां ते सांगत आहेत. त्यावरून 'प्रवृत्ती'चा कांहीं तरी क्षुद्र अर्थ त्यांच्या मनांत आहे असें दिसतें. पण या जगांतलें वैभव, सामर्थ्य, संपन्नता, समृद्धि यांना प्रेरणा देणारी प्रवृत्ति ती ही नव्हे. ती प्रवृत्ति कोणती, खरा प्रवृत्तिधर्म, खरी प्रवृत्तीची रग म्हणजे काय याचें विवेचन करून त्याअन्वयें मग संत-वाङ्मयाचें मूल्यमापन करणें अवश्य आहे.

पण तो एक स्वतंत्र निबंधाचा विषय होईल. या लेखांत प्रा. फाटक, श्री. सुंठणकर व प्रा. सरदार यांनीं संत प्रवृत्तिवादी होते असें सिद्ध करण्यासाठीं आपापल्या पुस्तकांतून जीं विधानें केलीं आहेत, जे मुद्दे माडले आहेत, जीं समर्थनें केलीं आहेत, त्यांचा परामर्श घेऊन झाला; पण संतांनीं संन्यासधर्माचा उपदेश केला नाही, संसार सोडावा असें सागितलें नाहीं,

म्हणून ते प्रवृत्तिवादी होते, हा मुद्दा बहुतेक सर्वच लोक मांडतात. त्याचा विचार साकल्यानें होणें अवश्य आहे. संतांच्यावर आक्षेप घेतांना राजवाडे प्रवृत्ति कशाला म्हणतात, युरोपीयांचा अभ्युदय प्रवृत्तीमुळें झाला असें म्हणतात, तेव्हां ' प्रवृत्ती 'चा अर्थ काय असतो हें स्पष्ट होणें अवश्य आहे. तें एकदां स्पष्ट झालें म्हणजे वादाला फारशी जागा राहील असें वाटत नाहीं. म्हणून त्याचें स्वतंत्र विवेचन करून मग प्रवृत्ति–निवृत्तिवादाचा निर्णय करावा असा विचार आहे.

नोव्हेंबर १९५३

---

# ५. प्रवृत्ति-धर्माची रग

मोक्षासाठीं अरण्यांत जाण्याची जरुरी नाहीं, संसारांत राहूनहि त्याची प्राप्ति होऊं शकते, परमेश्वरार्पण बुद्धीनें सर्व कृत्यें केलीं असतां तीं मोक्षाच्या आड येत नाहींत, असें संत सांगतात; आणि प्रत्येक मनुष्यानें जन्मानें प्राप्त झालेलें विहित कर्म केलें पाहिजे, त्यांतच त्याचें कल्याण आहे, असा उपदेश करतात. आणि एवढ्यावरून बहुतेक सर्व पंडित, संत प्रवृत्तिवादी होते, निवृत्तीची शिकवण त्यांनीं दिली नाहीं, राष्ट्रीय प्रपंचाकडे, समाजाच्या अभ्युदयाकडे, ऐहिक उत्कर्षाकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें नाहीं, असे मत बनवितात. हें पाहून मोठा विस्मय वाटतो आणि खेदहि होतो. राष्ट्रीय प्रपंचांतील यश ही अशी सहजसाध्य गोष्ट आहे काय ? ' करायला हरकत नाही ', ' ती आमच्या आड येणार नाहीं ', अशा वृत्तीनें जिच्याकडे बघावें अशापैकीं ही एक कनिष्ठ दर्जाची आकांक्षा आहे काय? राष्ट्रीय प्रपंचांतील यश:-सिद्धि ही महान् प्रयत्न, अनन्यनिष्ठा, अहोरात्रींचा ध्यास, सर्वस्वअर्पण, सर्व सामर्थ्यांचें केंद्रीकरण, यांवर अवलंबून आहे, हें या पंडितांनीं दृष्टीआड का करावें तें समजत नाहीं. बुद्धि, मन, शरीर यांचीं सर्व सामर्थ्यें पणास लावावीं तेव्हांच अभ्युदयाची एखादी पायरी चढतां येतें हें आज कोणाला सांगावयास पाहिजे काय ? उत्साह, धैर्य, साहस, आत्मविश्वास इत्यादि गुणांची जन्मोजन्मीं केलेली जोड जेव्हां खर्ची टाकावी तेव्हां ऐहिक उत्कर्षाचें क्षितिज दृष्टीला दिसूं लागतें, याविषयीं भिन्नमत असूं शकणार नाहीं. असें जर आहे तर या जगाच्या संसारातील स्वातंत्र्य, समृद्धि, विद्याकलादि वैभव यांसाठीं हिरीरीनें उडी घ्यावी, त्यावर सर्व सामर्थ्य केंद्रित करावें, मानवानें तो ध्यास घ्यावा असें संतांनीं कोठें सांगितलें आहे काय हा मुख्य प्रश्न आहे.

संतांनीं याच्या बरोबर उलट कृति केली आहे. संसारांत रहावें असें ते म्हणतात; पण जो संसार करण्याची त्यांनीं मोठ्या औदार्यानें परवानगी दिली

त्याच्याविषयीं कोणालाहि कसलाहि उल्हास वाटूं नये, प्रेम वाटूं नये, त्याची किळस यावी, उब्बग यावा अशीं त्यांनीं व्यवस्था करून ठेविली आहे. संतांचीं संसाराचीं वर्णनें वाचूनहि एखाद्याला त्याच्याबद्दल उत्साह शिल्लक राहिला तर ती त्या नराची बहाद्दुरीच समजली पाहिजे. ज्ञानेश्वर म्हणतात, संसार हा मळ आहे, ही घाण आहे, ही ओकारी आहे, हे विषाचे कांदे आहेत, हें इंगळाचें अंथरूण आहे; मनुष्यानें याचा धसका घ्यावा, त्याला भ्यावें. राखोंडी फुंकली तरी तींतून जशी ज्वाला निघत नाहीं तसें या संसारांतून सुख मिळणार नाहीं. लज्जा ( ऱ्ही ) या शब्दाचा अर्थ स्पष्ट करतांना ते म्हणतात, जन्माला आलों हीच सर्वांत लाज वाटण्याजोगी गोष्ट आहे. श्रीतुकारामांचें संसाराविषयीं असेंच मत आहे : 'विटलें हें चित्त प्रपंचापासूनी, वमन तें मनीं, बैसलेंसे ! ' ढेंकणाच्या बाजेवर सुख मिळत नाहीं तसेंच संसारापासून मिळणार नाहीं. ' संसारसंगें परमार्थ जोडे, ऐसें काय घडे जाणतेवो, कां रे दास होसी संसाराचा खर, दुःखाचे डोंगर भोगावया,' असे तुकाराममहाराजांचे उद्गार आहेत. हीं वर्णनें कांहींच नव्हेत अशीं अत्यंत किळसवाणीं वर्णनें सर्व संतांनीं संसाराचीं केलीं आहेत.(नामदेव-गाथा,अभंग १८१६;ज्ञानेश्वरी–१३, ५४०–५९० पहा. ) संसारांत रहावें असें संत म्हणतात; पण तेथें रहातांना त्या संसाराविषयीं अशी वृत्ति असावी अशी त्यांची अट आहे.

संसारांत कर्तृत्व करावें, पराक्रमाच्या कोटी कराव्या ही माणसाच्या मनाला उभारी येते ती आपल्या स्त्री-पुत्रांवरील प्रेमामुळें येते. पहिली प्रबळ प्रेरणा हीच असते आणि तेथूनच मनाचा विकास होत जाऊन त्याची दृष्टि राष्ट्रीय प्रपंचाकडे वळते. स्त्री-पुत्र, बंधु, भगिनी, आप्तइष्ट यांच्याविषयींचा हा जो मनाला वाटणारा लोभ त्यावर संतांनीं नेमकी कुऱ्हाड घातली आहे. या स्त्री-पुत्रांची त्यांनीं अशीच हिडीस निंदा केली आहे. तुकाराम म्हणाले,—' हो का पुत्र पत्नी बंधु, त्यांचा तोडावा संबंधु, फोडावें मडकें, मेल्या लेखीं, घायें एकें ॥' पुत्र, पत्नी हे चोर आहेत. यांच्या पालनापासून हित काय होणार ?—असेंहि त्यांनीं म्हटलें आहे. ज्ञानेश्वर म्हणतात,

पुत्र, वित्त, कलत्र हीं विषाचीं पात्रे आहेत. वाटेनें जातांना झाडांची सावली दिसते, तिच्याविषयीं जितकी आस्था वाटते तितकीच स्त्रीविषयीं वाटावी, आणि त्या झाडाखालीं जीं गुरे बसलेलीं असतात, त्यांच्याइतकेच प्रेम आपल्या मुलांवर असावें. मुलांचा वाढदिवस हा घरांतला मोठा आनंदोत्सव असतो. अपत्यप्राप्तीमुळें माणसाच्या पराक्रमाला उभारी येते, उत्साह वाटतो. पण ज्ञानेश्वर बालकांचा वाढदिवस करणाऱ्यांची चेष्टा करतात : मुलाचा वाढदिवस होतो याचा अर्थ असा कीं, तो मृत्यूच्या जास्त जवळ गेला आहे; हे कोणी ध्यानांत घेत नाहीं. आणि वेड्यासारखें—' वाढती करती उल्हासें, उभविती गुढिया '. ( ९–५१२ ) तुकारामांनीं तर असें म्हटले आहे कीं, ' कोणाला संतान व्हावें, मुलगा व्हावा असे शब्द माझ्या मुखांतून कधींहि निघूं नयेत. कारण संतान, धन याच्या लोभाने मनुष्याचा शेवटीं अध:पात होतो.' ( जोग गाथा–५४९. ) संसार करावा असें संत म्हणतात, अरण्यांत जाण्याची गरज नाही असें त्यांचें मत आहे; पण घरींच संसाराचें असे अरण्य केलें पाहिजे अशी अट ते घालतात.

गृहस्थाश्रमाची संत महती गातात; पण त्या आश्रमाची जी स्वामिनी म्हणजे स्त्री तिची त्यांनीं किती किळसवाणी निंदा केली आहे ते सुप्रसिद्धच आहे. वास्तविक तरुण रमणीचें प्रेम, तिच्याविषयींची आसक्ति ही या विश्वांतली एक महाशक्ति आहे. पराक्रमाची ती आदिप्रेरणा आहे. तिचा नाश करणारा मनुष्य प्रवृत्तिवादी आहे असें म्हणणें कठिण आहे. नामदेवांच्या मतें, लावण्यसुदर, रूपानें बरवी अशी स्त्री घातकी, चांडाळीण, पापीण आहे. आपल्या संगाची वासना निर्माण करून ' पापीण ती रांड बुडवी नरा.' उलट जी कुरूप आहे ' धन्य ती माऊली नारी ! नामा म्हणे तिचे चरण वंदावे, वदन पहावें माऊलीचें । ' ( गाथा १९४३, १९४४. ) ' स्त्रीकामें मुख्य माया बाधे, जगीं माया लाठी स्त्रीकामें, स्त्रीकामें मायेसि बळ । पुरुषांसी द्यावया दु:ख, स्त्रीसंगाचि आवश्यक, पुत्रपौत्रद्वारां देख, नाना दु:ख भोगित । स्त्रीसंगें दु:खप्राप्ति, सांगो किती अनिवार । ' अशी

निंदा एकनाथमहाराजांनीं केली; आणि अमुक संतांनीं स्त्रीनिंदा केली नाहीं असें नाहींच. तो कटाक्ष सगळ्यांचाच आहे. स्त्रीपुत्र, आप्तइष्ट यांची संत निंदा करतात त्याचें एक प्रमुख कारण असें कीं, यांच्यापैकीं अंतकाळीं कुणी बरोबर येत नाहींत. 'स्तनपान देऊनी, माता प्रतिपाळी, तेहि अंतकाळीं दूर ठाके. सर्वस्वस्वामिनी म्हणवीतसे कांता, तेहि केश देतां (वपन करतांना) रडतसे.' (नामदेव) 'कां हे आवडलें प्रियापुत्रधन, काय कामा कोण कोणा आलें?' (तुकाराम) मृत्यूच्या वेळीं हे कोणी उपयोगी पडत नाहींत, उलट मोह घालतात; म्हणून कुत्रीं, डुकरें यांचा सहवास करावा, पण या आप्तांचा करूं नये. 'देह आणि देहसंबधें निंदावीं, इतर वंदावीं श्वानसूकरें।' (तुकाराम गाथा ७५५) अशी संताची शिकवण आहे. यावरून त्यांचा दृष्टिकोन स्पष्ट होतो. मृत्यूपासून, जन्ममरणापासून जे सोडवतील, त्यासाठीं ज्यांचें साह्य होईल त्याचेंच फक्त महत्त्व मनुष्यानें मानावें, त्याच व्यक्ति आदरणीय होत, इतर कुत्र्या-डुकरांसमान होत, त्याच्यापेक्षां वाईट होत, असा त्यांचा अभिप्राय आहे.

मोक्षधर्मावरची ही जी अतिरेकी, एकांतिक, इहनिरपेक्ष निष्ठा तिचेंच नांव निवृत्ति असें आहे. ही आत्यंतिक निष्ठा हा भरतभूमीस एक शाप आहे. त्यामुळेंच तिचें कर्तृत्व वरचेवर खच्ची होत असतें. या मोक्षधर्माचें हें असलें वर्चस्व आपल्या मनावर जोंपर्यंत आहे तोंपर्यंत प्रवृत्तीची खरी रग आपल्या ठायीं निर्माण होणार नाहीं. प्रवृत्तिधर्माचा मूळ पाया कोणता हें ज्यांना पहावयाचें असेल त्यांनीं महाभारतांतील शांतिपर्वांतलें राजधर्मप्रकरण समग्र अभ्यासावें. भीष्म, श्रीकृष्ण, व्यास यांसारख्या त्या काळच्या समाज-धुरीणांनीं एक विचार निश्चित केला होता कीं, राजकीय दृष्ट्या राष्ट्र समर्थ, बलाढ्य असणें, तें आत्मसंरक्षणक्षम असणें, समाजांत अराजक नसणें ही समाजाच्या धार्मिक उन्नतीसाठीं पहिली आवश्यक गोष्ट आहे. म्हणून सर्व धर्मांत राजधर्म श्रेष्ठ असें त्यांनीं निक्षून सांगितलें आहे.

' सर्वा विद्या राजधर्मेषु युक्ताः । सर्वे लोका राजधर्मे प्रविष्टाः
तस्माद् धर्मो राजधर्माद् विशिष्टो । नान्यो लोके विद्यतेऽजातशत्रो '

राजधर्म म्हणजेच अलीकडच्या भाषेंत राजकारण किंवा राष्ट्रनिष्ठा. याहून श्रेष्ठ धर्म असूंच शकत नाहीं, असें महाभारतकारांचें मत होतें. ( शांति ६२–२९, ३० ) कारण राजधर्माचें साह्य नसेल तर चोर, दरवडेखोर, पुंड, आक्रमक हे अराजक माजवितात, आणि मग मोक्षधर्माचें व स्वधर्माचेंहि आचरण करतां येत नाहीं. संतांनीं स्वधर्माचरण म्हणजे विहितकर्म केलेंच पाहिजे असें सांगितलें आहे. पण ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, शिंपी, कुंभार, परीट यांना शत्रूंनीं गुलाम केलें, विकून टाकलें, सक्तीनें बाटविलें, त्यांचे संसार उध्वस्त केले तर ते विहितकर्म कसें करणार ? जातिप्रमाणें, वर्णाप्रमाणें नेमून दिलेलें कार्य कसें पार पडणार ? तें साधण्यासाठीं, म्हणजे स्वधर्माचरण करून मोक्ष मिळविण्यासाठींसुद्धां प्रथम राष्ट्र बलसंपन्न असलें पाहिजे. तेथें शांतता व सुव्यवस्था असली पाहिजे. हें संतानीं कधींहि सांगितलें नाहीं. आणि महाभारतकरांनीं तें अनेक वेळां आवर्जून सांगितलें आहे. जेव्हां जेव्हां धर्म लयास जातो तेव्हां तेव्हां त्याची उन्नति क्षात्रधर्मानेंच —राजधर्मानेंच करतां येते. म्हणून क्षात्रधर्म सर्वांत श्रेष्ठ होय, यांत सर्व धर्मांचा समावेश होतो, असें त्यांचें मत होतें. ( शांति ६३–२३ ) भगवान् विष्णूनें पूर्वीं क्षात्रधर्माचा आश्रय करून शत्रूला मारून, देवांचे व ऋषींचें ( म्हणजेच संतांचें ) रक्षण केलें. त्यानें जर असें केलें नसतें तर ?—

' न च ब्रह्मा, नैव लोकादिकर्ता । सन्तो धर्माश्चादिधर्माश्च न स्युः । '

अशी स्थिति झाली असती. धर्म, आदिधर्म, संत, लोक, व स्वतः भगवान् ब्रह्मदेव यांचा नाश झाला असता. म्हणून पितामह म्हणतात,—

तस्मात् श्रेष्ठा राजधर्मा न चान्ये । वीर्यश्रेष्ठा राजधर्मा मता मे ।
( शांति ६४–१२ )

' वीर्यशौर्यसंपन्न असा राजधर्मच श्रेष्ठ होय असें माझें मत आहे. ' महाराष्ट्रीय संतांनीं राजधर्माची, समाजसंरक्षणाची, राष्ट्राच्या सामर्थ्यसंपन्नतेची

अशी महती गाइली असती तर त्यांना प्रवृत्तिवादी म्हणणें कांहींसें सार्थ ठरलें असतें. समर्थांनीं अल्पांशानें कां होईना, पण निःसंदिग्ध शब्दांत हें महत्त्व सांगितलें आहे. पण त्यांच्यावर सध्या पंडितांची गैरमर्जी झालेली आहे.

राजधर्माचें म्हणजे समाजाच्या संरक्षणसामर्थ्याचें महत्त्व एकदां मान्य केलें म्हणजे इहलोकांतल्या सर्व शक्तिकेंद्रांचें महत्त्व आपोआपच मान्य करावें लागतें. त्यामुळेंच बुद्धिबल, बाहुबल, धनबल यांचें महाभारतांत अतिशय आदरानें वर्णन केलें आहे आणि यावरच सर्व पारलौकिक धर्म, सर्व परमार्थ अवलंबून आहे, असें पुन्हांपुन्हां सांगितलें आहे.

अतिधर्माद् बलं मन्ये बलाद् धर्मः प्रवर्तते
बले प्रतिष्ठितो धर्मो धरण्यामिव जंगमम् ( १२–१३४,६ ).
धर्मं संहरते तस्य धनं हरति यस्यः सः

असा पितामह भीष्मांचा अभिप्राय आहे. धरणीच्या आश्रयानें जसे चल पदार्थ रहातात तसा धर्म हा ( अर्थात् परमार्थ धर्म ) बलाच्या आश्रयानें रहातो. म्हणून धर्मापेक्षां बल श्रेष्ठ होय, असें त्यांचें म्हणणें आहे. आणि एखाद्याचें धन हिरावून घेणें म्हणजे त्याचा धर्मच नाहींसा करणें होय असें धनमाहात्म्य ते वर्णितात. यावरून महाभारतकारांच्या मतें मोक्षधर्म, परलोक, परमार्थ, पंढरी, विठ्ठल, जन्ममृत्यूंचा नाश, स्वकर्म, विहितकर्म, चातुर्वर्ण्य हें सर्व राजधर्माधीन आहे; म्हणजे समाजांतील लष्करी सामर्थ्य, संघटना, धनसमृद्धि, ऐहिक विद्यांचा अभ्यास, बौद्धिक सामर्थ्य यांवर अवलंबून आहे. राजवाडे प्रवृत्तिधर्म म्हणतात तो हा होय. ज्यांना संतांना प्रवृतिवादी ठरवावयाचें आहे त्यांनीं अशा तऱ्हेचे विचार त्यांच्या वाङ्मयांतून काढून दाखविणें अवश्य आहे. संतांनीं असले विचार कोठेंही सांगितलेले नाहींत. बुद्धि, बल, धन, यांची स्त्रीपुत्राप्रमाणेंच त्यांनीं ओंगळ निंदा केली आहे. ' जया राज्य, द्रव्य करणें उपार्जना, वश दंभ माना इच्छे झाले । '—तुकाराम. ज्यांना राज्य, धन यांची आकांक्षा आहे त्यांच्या ठायीं दंभ, अहंकार येतातच असें सरसकट

विधान संत करतात. वास्तविक भगवद्भक्तीमुळेंसुद्धां मनांत दंभ, अहंकार निर्माण होतात. संतांनींच असें अनेक ठिकाणीं म्हटलें आहे. पण तेवढ्यासाठीं भगवद्भक्ति वमनासारखी त्याज्य मानावी असें ते म्हणत नाहींत. पण राज्य, धन यांच्यावर मात्र त्यांचा कटाक्ष आहे. भगवद्भक्तींत दंभ, ढोंग, अहंकार यांचा प्रवेश झाला तर ती धनाइतकीच किंबहुना जास्तच घातक ठरते, हा आपला रोजचा अनुभव आहे. पण संत राज्य, धन यांनाच फक्त धारेवर धरतात. धनसंचय संसारासाठींसुद्धां करूं नये असें तुकाराममहाराज सांगतात. पक्षी, अजगर धन साठवीत नाहींत तरी अनंत त्यांचा प्रतिपाळ करतो; तसाच आपला करील. द्रव्याच्या मागें कळिकाळाचा लाग आहे, तें निरयाचें मूळ आहे, अन्न, वस्त्र, घर प्रारब्धाधीन आहेत, तेव्हां त्यांची काळजी सोडून, ‘ वाणी नारायणीं वेंचा, ’ असा त्यांचा उपदेश आहे. क्वचित् कोठें धन मिळविण्यास ते परवानगी देतात; पण संसार करण्याची जशी, तशीच ही अनुज्ञा निराशाजनक आहे. तेव्हां राजधर्माची प्रमुख साधनें म्हणजे बुद्धि, बाहु, धन—हीं बलें यांचीहि संतांनीं स्त्रीपुत्रांप्रमाणेंच निंदा केली आहे. मोक्षधर्माचा अतिरेक, आत्यंतिक निवृत्ति ती हीच होय.

संतांना प्रवृत्तिवादी म्हणणें हें खरोखर टिकण्याजोगें नाहीं. आज आमच्या तरुणांनीं अत्यंत कणखर व पूर्ण अभ्युदयनिष्ठ असा प्रवृत्तिवाद स्वीकारावा, अशी अपेक्षा असतांना, संत हे प्रवृत्तिवादी होते असें सांगण्याने त्यांची फार दिशाभूल होईल. आपल्या रोमरोमांत भिनून राहिलेला निवृत्तिवाद, तदनुषंगाने येणारा दैववाद आणि तज्जन्य दौर्बल्य नष्ट करावयाचें असेल तर आपण जास्त सावधगिरी बाळगिली पाहिजे. या दृष्टीनें पाहतां वर प्रवृत्तिवादाचीं म्हणून मीं जीं लक्षणे सांगितलीं आहेत तींसुद्धां अगदीं प्राथमिक होत. प्रवृत्तीचें खरें वैभव पुढेंच आहे. तरुण स्त्री-पुरुषांची परस्परांबद्दल आसक्ति, स्त्रीपुत्र, आप्त यांचें प्रेम, राजधर्मावरील निष्ठा, बुद्धि, बल, धन, यांच्याविषयींचा आदर हा प्रवृत्तिमय संसाराचा नुसता पाया आहे, आरंभ आहे. संतांनीं या प्राथमिक लक्षणांचीच निंदा करून त्यांचा उच्छेद केला

आहे. मग पुढला खरा कणखर, उज्ज्वल, विलोभनीय जो प्रवृत्तिधर्म त्यांचें रूप त्यांच्या वाङ्‌मयांत दिसत नाहीं यांत नवल काय ? त्या उज्ज्वल रूपाची ज्यांना स्पृहा आहे त्यांनीं फारच जपून विधानें केलीं पाहिजेत. कारण आपल्या समाजांतील बहुसंख्य जनता अजून दैववादी, निराशावादी, परलोकनिष्ठ अशी आहे. जरा कांहीं झालें कीं मरगळ यावी, मागें सरावें, अंग काढून घ्यावें, इकडेच तिचा कल आहे. यांतून खरे राजस वृत्तीचे, निर्भय, आक्रमणशील, जयिष्णु, महत्त्वाकांक्षी, आत्मप्रत्ययसंपन्न असे नागरिक आपणास निर्माण करावयाचे आहेत. संतांचें प्रतिपादन हाच प्रवृत्तिधर्म अशी शिकवण आपण त्यांना दिली तर यांत आपणास कालत्रयीं यश येणार नाहीं.

इहलोकीचें जीवन समृद्ध, संपन्न, आणि अत्यंत वैभवशाली करण्यासाठीं त्या जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत जे अपरिमित कष्ट करावे लागतात, ते त्या वैभवावर अगदीं पराकाष्ठेची निःसीम निष्ठा असल्यावाचून मनुष्याच्या हातून होणे शक्य नाहीं. विजेच्या दिवा शोधण्यासाठीं एडिसनने नऊ हजार वेळां प्रयोग केले आणि अनेक वेळा दिवाळखोरी पत्करून चार लक्ष रुपये खर्च केले. हिंदुस्थान, चीन, ब्रह्मदेश, दक्षिण अमेरिका या देशाच्या गहन अरण्यांत योग्य बांबू शोधण्यासाठीं त्याची माणसें वर्षांनुवर्षे वणवण भटकत होतीं. अमेरिकेंतील भांडवलदारांनीं त्याच्याविरुद्ध अनेक कारवाया केल्या होत्या. अनेकांनीं त्याला वेडा ठरवला होता. अशाहि परिस्थितीत चिकाटी धरून अविरत कार्य करीत राहण्याची जी वृत्ति ती खरी प्रवृत्ति होय. मेरी क्युरी व पेरी क्युरी यांनीं रेडियम शोधण्यासाठीं कसे व किती प्रयोग केले हे सर्वविश्रुत आहे. दिवसभर पोटाचा उद्योग करावयाचा आणि नंतर रात्री प्रयोगशाळेंत जाऊन मणावारी माती उकळावयाची, ढवळावयाची, त्यांतून निघणाऱ्या विषारी वायूंनीं अनेक वेळां मूर्च्छा आली तरी ती सोसावयाची, या प्रयत्नांत हाताला कॅन्सर होऊन मृत्यू येण्याचा संभव दिसत असला तरी, मानवाच्या सेवेसाठींच ही आपत्ती येत आहे, अशी श्रद्धा ठेवून मन स्थिर ठेवावयाचें, असें हे अग्निदिव्य आहे. हें संशोधन प्रारब्धाधीन आहे, अशी

संतप्रणीत कल्पना एक क्षणभर जरी या संशोधकांच्या मनांत आली असती तरी त्यांच्या हातून हे प्रयत्न झाले नसते. केप्लर, न्यूटन यांनीं तीस–तीस वर्षें अलोचन जागरणें करून ग्रह, तारे यांचे वेध घेऊन गुरुत्वाकर्षणासारखे सिद्धांत प्रस्थापित केले. हा संसार वमनासारखा आहे, असें त्यांना वाटत असतें तर त्यांच्या हातून ही तपश्चर्या झाली असती काय, याचा विचार आपण करावा. इतिहासकार नानासाहेब सरदेसाई यांनी सतत पंचावन्न वर्षें परिश्रम करून आज सहा हजार पृष्ठांचा मराठ्यांचा इतिहास आपल्यापुढें ठेविला आहे. लक्षावधि कागदपत्रें पहाणें, तपासणें, लावणें, नवें संशोधन झाल्यावर पहिली प्रसिद्ध झालेली पुस्तकें रद्द करून फिरून सर्व पहिल्यापासून लिहून काढणें, या यातनांना व या कष्टांना सीमा नाहीं. मराठ्यांचा इतिहास इंग्रजी भाषेंत लिहिला गेला तो इंग्रजी, पंजाबी, बंगाली अशा परकीय पंडितांकडून. त्यांनीं अनेक ठिकाणीं प्रमाद केले आहेत, विपर्यास केला आहे. त्यामुळें मराठ्यांच्याविषयीं जगाचें मत कलुषित झालें आहे. मराठा पंडितांनी मराठ्यांचें चरित्र जगापुढें माडलेंच नाहीं. ही उणीव ध्यानीं घेऊन नानासाहेबांनीं वयाचीं ऐशीं वर्षे झाल्यावरहि तो उद्योग हातीं घेतला व इंग्रजींत मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचें कार्य पुरें करीत आणले. या जगांत जन्माला आल्याचीच लाज वाटली पाहिजे अशी ज्या माणसाची वृत्ति आहे, जगांत आलोंच आहों, मोक्ष मिळेपर्यंत रहाणें भागच आहे, तेव्हां एखाद्या पांथस्थाप्रमाणें, वाटसरूप्रमाणें या संसाराकडे पहात कालक्रमणा करावी, अशी भावना ज्या माणसाची झाली आहे, ज्यानें संतांच्या उपदेशामुळें ती प्रयत्नपूर्वक बनविली आहे, त्या माणसाच्या हातून असा उद्योग होईल काय, हा प्रश्न वाचकांनीं मनांत घोळत ठेवावा, म्हणजे त्यांना प्रवृत्तिधर्म म्हणजे काय त्याचा अर्थ समजेल. संसारांत राहिलें तरी चालेल, तें मोक्षाच्या आड येणार नाहीं, अगदीं अलिप्तपणें रहावें म्हणजे झालें, वृत्ति उदास ठेवावी, पांस्थस्थाप्रमाणें बायका–मुलांकडे पहावें, मग संसाराचें भय राहणार नाहीं, असें संत सांगतात आणि याला सध्याचे पंडित प्रवृत्ति म्हणतात.

प्रवृत्ति ही अशी ऋण भावना, अकरणात्मक, नकारात्मक भावना नाहीं. ती एक प्रबळ, समर्थ, उत्साहदायी, विजिगीषु अशी धनभावना आहे संतांच्या तत्त्वज्ञानाला प्रवृत्ति म्हणणें ही त्या शब्दाची विटंबना आहे. त्यांच्या मनात हे नवे पंडित त्यांच्यावर लादीत असलेला प्रवृत्तिभाव केव्हांहि नव्हता. जगाची त्यांना काळजी वाटे ती मोक्षापुरती. ' बुडती हे जन, पहावेना डोळां ' असें तुकाराम म्हणाले, तेंव्हां जनतेवरील परकीय आक्रमण, तिची आर्थिक विपत्ति, अनान्नदशा, अज्ञान, दौर्बल्य, रोगराई, दुष्काळ इत्यादि संकटांचा त्यांच्या मनात विचार नव्हता. या जनांना पैलतीरीला कसें न्यावें, त्यांना संसारांत ठेवून संसाराबद्दल त्यांच्या मनांत किळस कशी उत्पन्न करावी, त्यांना मोक्ष कसा मिळवून द्यावा, एवढीच चिंता त्यांच्या मनांत होती. ' बायको मेली तर बरें झालें, एका मायेंतून सुटलों; पोर मेलें तर चांगलें झालें, दुसऱ्या पाशांतून मुक्त झालों; माता मेली तर सगळीच चिंता संपली; आतां विठो, तूं आणि मी ', अशी त्यांची वृत्ति होती. ( जोग गाथा-३९४ ) यांवरून त्यांना काळजी कशाची होती तें स्पष्ट होईल.

संतांच्या मनाला कसला ध्यास होता, त्याचें सर्व लक्ष कोठें केंद्रीभूत झालें होतें, हें पहावयाचे असेल तर त्यांचें आदर्श पुरुष, उत्तम पुरुष, त्यांनीं वंद्य मानलेले स्त्री-पुरुष याच्याकडे लक्ष द्यावे म्हणजे क्षणार्धात संतांच्या मनःप्रवृत्तीची कल्पना येईल. भक्तीमुळें, विठ्ठलाच्या किंवा इतर देवतांच्या कृपेमुळें तरून गेलेले जे लोक त्यांखेरीज इतर क्षेत्रांतल्या थोर कर्त्या पुरुषांचा संत नामोल्लेखहि करीत नाहींत. या जगांतल्या अभ्युदयाची, ऐहिक उत्कर्षाची ते चिंता वहात असते तर राजकारण, रणांगण, पांडित्य, गणितादि विद्या, इतर संशोधन, अनेकविध कला या क्षेत्रांतल्या पुरुषाचा त्यानीं वंदनीय, अनुकरणीय महात्मे म्हणून उल्लेख केला नसता काय? संतांनीं चुकूनसुद्धां ही गोष्ट केलेली नाहीं. विजयनगरच्या राज्यांतले हरिहर, बुक्क, विद्यारण्य, कृष्णदेव, नरसिंगराय, राजस्थानातील हम्मीर, कुंभराणा, भीमदेव, रत्नसिंह, संगराणा यांनीं हिंदुधर्म व हिंदु जनता

यांच्या रक्षणासाठीं केवढाले उद्योग केले, केवढीं अचाट कार्यें केलीं, कसें आत्मार्पण केलें ! हे सर्व संतांच्या काळचेच लोक होते. पण त्यांची दखल संत घेत नाहींत. मागल्या काळांतील, पुराणकालांतील व्यास, वाल्मीकि यांना संत वंदन करतात. पण पाणिनि, कात्यायन, वररुचि, वराहमिहिर, आर्यभट्ट, नागार्जुन, कालिदास, भवभूति याचा नामनिर्देशहि संत करणार नाहींत. प्रल्हाद, बळी, सुदाम, उपमन्यु यांचीं स्तोत्रें संत गातात. सर्व जन्मभर पापें करून अंतकाळीं केवळ चुकून परमेश्वराचें नाम मुखीं आल्यामुळें जे उद्धरून गेले त्या अजामीळ व पिंगला वेश्या यांचा उल्लेख, शेंकडो वेळां संत करतात; पण बाजी प्रभु, मुरारबाजी, तान्हाजी, खंडो बल्लाळ, यांच्यासारख्या स्वामी, मातृभूमि, स्वधर्म यांच्यासाठीं धारातीर्थीं आत्मार्पण करणाऱ्या महात्म्याना संताच्या जगांत स्थान नाहीं. यांनीं विहितकर्म करतांना, निजवृत्ति आचरतांनाच प्राणत्याग केलेला आहे, यमयातना सोसल्या आहेत. विहितकर्म निष्ठेनें करणाऱ्याविषयीं संताना आदर असतो. तो आदर कितपत आहे, ऐहिक संसार समृद्ध, संपन्न करणाऱ्या स्त्रीपुरुषा-विषयीं संतांच्या काय भावना आहेत, हे यावरून स्पष्ट होत नाहीं काय ?

श्रीतुकाराम हे कोणत्या पुरुषाना वंद्य मानतात ? ‘ जे आहोरात्र विठ्ठल-चिंतन करतात त्याच्या पायींचें मी पायतण होईन, जे पंढरीची वारी करतात त्यांच्या घरीं मी पशु होऊन राहीन, ज्यांच्या अंगणांत तुळशी वृंदावन आहे त्याचे घरीं मी केरसुणी होईन, ’ असे त्याचे उद्‌गार आहेत. ( गाथा १९५४–जोग. ) वरच्याहून इतर क्षेत्रांत अलौकिक त्याग करणाऱ्या स्त्री-पुरुषाना, समर्थ रामदास सोडले तर, कोणाहि सतानीं वंदन केलेलें नाहीं. मागें उल्लेखिलेले ऐतिहासिक स्त्रीपुरुष संताना माहीत नव्हते हें शक्य नाहीं. परप्रांतातल्या अनेक संतांचीं चरित्रें येथले संत गातात. त्यांना ऐहिक क्षेत्रातल्या पराक्रमाची तशीच महती वाटत असती, तर त्यानीं कवि, पंडित, सेनापति, हुतात्मे यांचींहि चरित्रें गाइलीं असतीं. मेवाडच्या मिराबाईचें चरित्र ते सांगतात; पण राणी पद्मिनीचें महत्त्व त्यांना नाहीं. बंगालचे कबीर, कमाल,

जुनागडचा नरसी मेहता यांच्यावर ते अभंग रचतात; पण श्रीहर्ष, राणा प्रताप, शालिवाहन, सिंघण, यांच्यासाठीं एकहि ओळ ते खर्च करीत नाहींत. यावरून मोक्षधर्म, अध्यात्म, यावांचून दुसऱ्या कशाचीहि मातब्बरी त्यांना वाटत नव्हती हें स्पष्ट दिसतें.

जें उत्तम पुरुषांच्या बाबतींत तेंच अधम पुरुषांच्या बाबतींतहि दिसून येतें. संतांच्या अधम पुरुषांच्या यादींत कोण येईल? जो एकादशी करीत नाहीं, कीर्तनाला जात नाहीं, स्त्रीमोह, धनमोह यांना वश होतो, नित्यनैमित्तिक कर्में जो करीत नाहीं, जो अहंमन्य आहे, ज्याची वाणी कटु व तीव्र आहे, ज्याला गुरुभक्तीचा कंटाळा आहे, असा पुरुष हा अधमाधम होय. आणखीहि अधम पुरुषाचे अनेक दुर्गुण संत वर्णितात. पण जो फितुरी करतो, दुही माजवतो, स्वामिकार्य निष्ठेनें करीत नाही, राजपदावर असून शत्रूविषयीं गाफील रहातो, त्याचा निषेध केला पाहिजे, त्याच्या दुर्गुणाची जनतेला जाणीव देऊन तिला सावध केलें पाहिजे, अशी जबाबदारी सताना वाटत नाहीं. कोणी असें म्हणतात कीं संतांनीं एक विषय—अध्यात्म—हा घेऊन आपलें सर्व सामर्थ्य, सर्व तनमनधन त्यावर खर्च केल्यामुळें इतर विषयांकडे त्याना लक्ष देतां आलें नाही, यांत आक्षेपार्ह तें काय? यावर माझें म्हणणें असें कीं, आम्ही तरी हेंच म्हणत आहों. संतानीं सर्व लक्ष फक्त मोक्ष, परमार्थ, अध्यात्म यांवर केंद्रित केलें होतें, या जगांतल्या अभ्युदयाकडे, राष्ट्रीय प्रपंचाकडे त्यानीं लक्ष दिलें नाहीं असें मान्य केल्यावर वादांतील निम्मा जोर संपेलच. पण तेंच सध्यांच्या पंडितांना मान्य नाहीं. संत प्रवृत्तिवादी होते, सामाजिक दृष्टि त्यांना होती, इहलोकींच्या उत्कर्षाची त्यांना तळमळ वाटत असे, असे हे अभ्यासक अट्टाहासाने सांगत आहेत. ज्यांना ही तळमळ वाटते, ज्यांना सामाजिक दृष्टि आहे, ते त्या क्षेत्रांतल्या वंद्य पुरुषांचा आदर्श जनतेपुढे ठेवून त्या दृष्टीनें तिला मार्गदर्शन करतील हें अगदीं उघड आहे. तें संतानीं केलेलें नाहीं, आणि म्हणून ते निवृत्तिवादी आहेत एवढेंच सांगावयाचें आहे.

या विषयाचा एवढ्या आग्रहानें प्रपंच करण्याचें कारण वर सांगितलें आहे. येथून पुढें आपला देश आपणांस धनधान्यानें समृद्ध करावयाचा आहे. बुद्धिबल, शास्त्रबल, शस्त्रबल यांनीं त्याला संपन्न करून टाकण्याची आपण आकांक्षा धरलेली आहे. प्रत्येकाला अन्न, वस्त्र घर व विद्या आपणांस सुलभ करून द्यावयाची आहे. साहित्य, कला, विज्ञान या संस्कृतीच्या अंगोपांगांचा बहुजनांना लाभ करून देण्याच्या गोष्टी आपण बोलतों. हें सर्व साधावयाचें तर अनंत प्रकारचें कर्तृत्व, फार मोठा प्रयत्न, महान् उद्योग, प्रचंड साहस , दुर्दम, उत्साह, अपराजित असें मनोधैर्य, तीव्र क्रांतिकारक वृत्ति, वाटेल त्या पाशवी सत्तेशीं लढा देण्याची शक्ति, या गुणांची जोपासना आपल्या समाजांत झाली पाहिजे. आणि प्रत्यक्षाकडे दृष्टि टाकली तर आपण बहुसंख्यजन अजून निराशावादी, दैववादी, प्रारब्धावर हवाला ठेवणारे, दिवसांतून दहा वेळां कपाळाला हात लावणारे असे आहों असें दिसेल. थोडासा आघात होतांच मागें फिरून परमार्थाचा आश्रय करावा, उदासीन व्हावें, तेथली भाषा बोलून मनाचे समाधान करण्याचा प्रयत्न करावा अशी आपल्या मनाची घडण अजून कायम आहे. ही घडण आहे तोंपर्यंत आपल्या मधून राष्ट्राला अवश्य तेवढें कर्तृत्व निर्माण होणें शक्य नाहीं. आणि खऱ्या प्रवृत्तिधर्माच्या उपदेशावांचून, प्रसारावांचून, त्या धर्माची रग आपल्या रक्तांत निर्माण झाल्यावांचून आपल्या मनाची घडण बदलणें शक्य नाहीं. अशा स्थितींत संतांनीं शेंकडों वर्षें जीं निवृत्तीचीं, उदासीनतेचीं, मोक्षैकनिष्ठेचीं बीजें आपल्या समाजांत पेरून ठेविलीं आहेत तींच प्रवृत्तीचीं लक्षणें आहेत असें जेव्हां नवे पंडित सांगूं पहातात, तेव्हां नव्या पिढीच्या दृष्टीनें ही फार हानि आहे असें वाटतें. ब्रिटन, अमेरिका, जर्मनी या राष्ट्रांनीं आपल्या समाजाची जी भव्य उभारणी केली आहे, तिला आवश्यक असलेल्या प्रवृत्तीचें स्वरूप काय हें जर आपण जाणलें तर आपल्या हातून वरील प्रमाद होणार नाहीं असें वाटतें. संसारविषयींचीं अनासक्ति, उदासीनता यांची जी शिकवण तिचा परिपाक झाला म्हणजे काय होईल ? ज्ञानेश्वर

म्हणतात, असा परिपाक झाला कीं त्या पुरुषांचें संसाराविषयींचें प्रेम ढिलें, निर्बळ होऊन जातें, त्या वेळीं फळ देंठाला राहूं शकत नाहीं, देंठ फळाला धरूं शकत नाहीं, अशी अवस्था होते. ( ज्ञानेश्वरी १८-९५७ ). नेमकी हीच गोष्ट व्हावयास नको आहे. तो परिपाक किती जणांना साधेल तो साधो, पण प्रारंभापासूनच आमची दृष्टि मात्र इहविमुख होते. आम्ही संसार करतों, पण तो दुबळेपणानें, ढिलेपणानें करतों. अशी वृत्ति आहे, संसारावर पराकाष्ठेची, अगदीं निःसीम अशी निष्ठा जोंपर्यंत आमच्या मनांत नाहीं तोंपर्यंत नव्या राष्ट्रीय प्रपंचाच्या सिद्धीसाठीं जी प्रचंड उभारी अवश्य आहे, ती आमच्या ठायीं निर्माण होणार नाहीं. संसारावरील दृढ निष्ठेमुळेंच मनुष्य ऐहिक उत्कर्षाचे उद्योग करूं शकतो, त्यासाठीं अवश्य त्या यातना सोसूं शकतो.

मानवी मनांतील प्रवृत्तींच्या भिन्नभिन्न ऊर्मींचा विचार केला तर स्पष्टपणें असें दिसतें कीं, त्यांतल्या कोणच्याहि ऊर्मीविषयीं संतांना सहानुभूति नाहीं, आदर नाहीं; इतकेंच नव्हे तर पुष्कळ ठिकाणीं त्यांची त्यांनीं निष्कारण हेटाळणी केली आहे. भिन्नभिन्न विषयांची जिज्ञासा, ज्ञानाची पिपासा ही मानवाच्या मनाची केवढी ऊर्मी आहे ! तिच्या तृप्तींत त्याचा परमानंद आहे; आणि समाजाच्या अभ्युदयाचा तर ऐहिक ज्ञान हा पायाच आहे. पण संतांची ऐहिक ज्ञानाविषयीं काय वृत्ति आहे ? ज्ञानेश्वर म्हणतात, ज्योतिष, शिल्प, काव्य, नाटक, व्याकरण, वेदविद्या, नीतिशास्त्र, स्मृतिशास्त्र, वैद्यक या विषयांत माणूस केवढाहि पंडित असला तरी अध्यात्मज्ञान त्याला नसेल तर आग लागो त्याच्या त्या पांडित्याला. आईबापांच्या मुळावर आलेल्या मुलाचें जसें तोंड पाहूं नये त्याचप्रमाणें या पंडिताचें तोंड पाहूं नये. 'ते एकावांचूनि आघवां शास्त्रीं, सिद्धान्त निर्माणधात्री, परि जळो ते मूळ नक्षत्रीं, न पाहे गा।' ( ज्ञानेश्वरी १३-८३५ ). ज्ञानेश्वरांना एवढा गहजब करण्याचें वास्तविक कांहींच कारण नव्हतें. एक तर भक्ति मुळींच नसली तरी या पांडित्याचा मानवी अभ्युदयाला अतिशय उपयोग आहे. गॅलिलिओ, बेकन, शेक्सपियर, गटे यांसारखे अनेक शास्त्रज्ञ व कवी नीतीनें निष्कलंक नसूनहि त्यांनीं जगाला

कायमचें ऋणी करून ठेविलें आहे. त्यांच्या ज्ञानावांचून व काव्यावांचून जग आज पोरके होईल. त्याचप्रमाणें इतरहि अनेक शास्त्रज्ञांना, पंडितांना अध्यात्मज्ञान फारच थोडें असेल किंवा नसेलहि; तरी त्यांच्या ज्ञानाचा अधिक्षेप करण्याचे कांहीच कारण नाहीं. त्यांना अध्यात्मज्ञान नसलें, त्यांच्या ठायीं विठ्ठलभक्ति नसली तरी जगाचा योगक्षेम व जगाची संस्कृति विज्ञान, साहित्य, ज्योतिष, शिल्प, वैद्यक, व्याकरण, राजनीति इत्यादि शास्त्रात पारगत असलेल्या थोर पुरुषांवरच बऱ्हंशीं अवलंबून असते हें निर्विवाद आहे. त्यामुळें कोणत्याहि स्थितींत त्यांची निंदा करणें युक्त नाहीं; आणि त्यातूनहि अध्यात्मज्ञानाचें महत्त्व सागावयाचेंच होतें तर, या ज्ञानानें त्यांच्या मूळच्या थोर प्रतिष्ठेला जास्त शोभा येईल, असें म्हणता आलें असतें. पण त्याच्या ज्ञानाला संतांच्या मतें प्रतिष्ठाच नाहीं. आर्यभट्ट, भास्कराचार्य, गणेश दैवज्ञ हे त्यांच्या लेखीं जमाच नाहींत; त्यांचें गणितज्ञान किती याची चौकशी संत करणार नाहींत. ते विठ्ठलाची भक्ति करतात कीं नाहीं एवढीच त्यांची चिंता आहे, आणि ती नसेल तर मूळ नक्षत्रीं जन्मलेल्या मुलाप्रमाणेंच त्यांचें तोंड पाहूं नये असे त्यांना वाटते. आर्यभट्ट, भास्कराचार्य, गणेश दैवज्ञ हे तर धार्मिक व सच्चरित्र असेच होते. तरीसुद्धां कोणत्याहि संतांनीं त्यांना वंदन केलें नाहीं, आणि एकंदर पांडित्य, ज्ञान, शास्त्राध्ययन याविषयीं वरील प्रकारची वृत्ति प्रकट केली आहे. जगाच्या अभ्युदयाची, योगक्षेमाची, ऐहिक संस्कृतीच्या उत्कर्षाची काळजी असल्याचींच हीं लक्षणें आहेत काय ? का असें समजावयाचें कीं ती काळजी संतांना होती, पण त्यासाठीं या पांडित्याचें महत्त्व काय तें त्यांना उमगले नाहीं.

या जगांतल्या ज्ञानाविषयीं अशी वृत्ति असली, जगच एकंदर ओकारीसारखें मानावें अशी शिकवण समाजाला दिली, आणि संसारांत राहिलों, विहित कामें करीत असलों तरी येथून कसें तरी सुटून जावयाचें आहे, असासारखा ध्यास घेतलेला असला म्हणजे या जगांतल्या उद्योगाविषयीं मनुष्याला कितपत उत्साह वाटेल ? कोलंबस, स्कॉट, तेनसिंग किंवा हंबोल्ट, डार्विन,

हक्स्ले यांच्या हातून जीं कार्यें झालीं तीं करण्याची उभारी, त्यासाठीं लागणारें साहस, तत्प्रीत्यर्थ अनुभवाव्या लागणाऱ्या यातना सोसण्याची तयारी, दहा-दहा-वीसवीस वर्षें निराशेशीं झगडत राहून, लोकनिंदा सोसून, आप्तेष्टांचा रोष सहन करून, सतत कार्य करण्याची चिकाटी हे गुण जगाविषयीं तशी वृत्ति झाल्यावर आमच्या समाजांतल्या माणसांच्या अंगीं कसे निर्माण होणार? हम्बोल्ट हा पांच वर्षें मेक्सिकोच्या व दक्षिण-अमेरिकेच्या भयानक जंगलांत कृमी, कीटक, पशु, पक्षी यांचें संशोधन करीत भटकत होता. नाना प्रकारचे रोगजंतु, अनेक रानटी जमाती, उग्र रूप धारण करणाऱ्या नद्या, दऱ्या, डोंगर, थंडी, वारा, उन्ह, पाऊस यांशीं त्याचा अहर्निश झगडा चालला होता. या यातना सोसून हजारों कीटकांचे, पक्ष्यांचे, पशूंचे नमुने त्यानें निरनिराळ्या पेट्यांत, पिंजऱ्यांत भरून सांभाळून जर्मनीला आणले, आणि पुढें अनेक वर्षें खपून जीवनशास्त्राचा व इतर शास्त्रांचा पाया घातला. या जगाविषयीं निःसीम प्रेम, गाढ निष्ठा व पराकाष्ठेची जिज्ञासा असल्यावांचून कोणाच्याहि हातून असलीं कार्यें होणार नाहीत. प्रवृत्तीची ही उभारी आमच्या समाजांत ब्रिटिश येण्याच्या पूर्वींच्या सहाशें-सातशें वर्षांत एकदांहि दिसली नाहीं, याचा अर्थ काय? जगाविषयींचा जो उदासीनतेचा, अलिप्ततेचा, अवहेल-नेचा, दृष्टिकोन संतांनीं तयार केला तोच याच्या बुडाशीं नाहीं काय? या भूमींत अशा प्रकारची प्रवृत्ति पूर्वींहि कधीं नव्हती असें म्हणतां येईल काय?—मुळींच नाहीं. प्रवृत्तिधर्माचीं या प्रकारचीं लक्षणें या देशांत इसवी सनाच्या पहिल्या आठ-नऊ शतकांत स्पष्ट दिसून येत होतीं. ब्रह्मदेश, जावा, सुमात्रा येथें भारतीयांनीं याच काळांत वसाहती केल्या. याच काळांत तेथें शिवमंदिरें व विष्णुमंदिरें बांधून आपली इतकी अद्वितीय शिल्पकला प्रकट केली, कीं ग्रीक व रोमन शिल्प त्यापुढें फिकें ठरतें असें पाश्चात्यांनींसुद्धां म्हणावें. याच काळाच्या कांहींसें आधीं चीन, जपान या देशांत धर्मप्रसारार्थ शेंकडों भारतीय गेले होते. सर्व जगाला भूषण वाटेल असें ज्योतिष, रसायन, वैद्यक या विज्ञानशाखांत भारतीयांनीं संशोधन केलें तें याच काळांत. पण पुढील

सहासात शतकांत या गुणवैभवाचा मागमूसहि दिसत नाहीं. मग भारती-यांच्या अंगच्या या प्रवृत्तीचें काय झालें ? भारतीय मोक्षैकनिष्ठ झाले, त्यांना वैराग्य प्राप्त झालें व त्यांत या प्रवृत्ती विरघळून गेल्या असा याचा अर्थ आहे !

प्रा. फाटक म्हणतात कीं, संतांनीं वैराग्याचा उपदेश केला तो योग्यच होता. सर्व क्रांतिकारकांना, देशभक्तांना वैराग्य अवश्यच असतें. फाटक येथें मोठीच दिशाभूल करीत आहेत असें वाटतें. लेनिन, वॉशिंग्टन, सन्‌यत्‌सेन, सावरकर, केमालपाशा यांचा निग्रह, यांचा त्याग, यांनीं संसारसुखाचीं केलेली उपेक्षा आणि संतप्रणीत वैराग्य हीं एकच आहेत काय ? या लोकांना जगाचा उबग येऊन त्यांनीं त्याग केलेला नव्हता. आपल्या स्त्री-पुत्रांविषयीं मडकें फोडून टाकण्याच्या कल्पना त्यांच्या मनांत कधींच नव्हत्या. उलट त्यांच्याविषयीं त्यांच्या मनांत अखंड प्रेमच होतें. तें प्रेम हीच त्यांची प्रबळ प्रेरणा होती. ' माझ्या स्त्रीवरील प्रेमामुळेंच मी साहसकर्माला, आत्मार्पणाला प्रवृत्त होतों, ' असें स्वित्झरलंडचा क्रांतिकारक विल्यम टेल यानें सांगित-ल्याचें प्रसिद्धच आहे. या क्रांतिकारकांनीं त्याग केला तो इतरांना जगांतले भोग मिळावे म्हणून केला; सर्वांनाच जगाविषयीं तिटकारा यावा म्हणून नव्हे. अध्यात्मनिष्ठेविषयीं लिहितांना प्रा. सरदार म्हणतात कीं, तसें पाहिलें तर टिळक व महात्माजी हेहि अध्यात्मनिष्ठच होते. प्रा. न. र. फाटकांच्या क्रांतिकारकांच्या वैराग्याप्रमाणेंच सरदारांनीं उल्लेखिलेली टिळक-गांधी यांची अध्यात्मनिष्ठा आहे. टिळक व महात्माजी यांचें श्वसनसुद्धां या जगांतल्या अभ्युदयासाठीं असे. इतकी त्यांची इहनिष्ठा जाज्ज्वल्य होती. इतकी ही निष्ठा असल्यानंतर मग माणसाचें मन कितीहि अध्यात्मनिष्ठ असलें तरी त्यामुळें समाजाची हानि होत नाहीं. टिळक-महात्माजीच काय, पण सध्याचे जगांतले आइन्स्टाइन, एडिंग्टन्, जीन्स, ऑलिव्हर लॉज् हे अग्रगण्य शास्त्रज्ञहि अध्यात्मनिष्ठ आहेत. पण टिळक-महात्माजींप्रमाणें तेहि दिवसाचा क्षणन् क्षण या जगाच्या अभ्युदयासाठीं वेंचीत असतात. यानंतर जी अध्यात्मप्रवृत्ति राहील ती माणसाच्या कर्तृत्वाची हानि करीत नाहीं. इतकेंच नव्हे, तर ती

त्या कर्तृत्वाला पुष्कळ वेळां पोषकच ठरते. लोकांनीं आपापल्या विहित कर्मांत मग्न असावें असें संतांनीं शेंकडों वेळां लिहिलें आहे; पण तें विहित कर्म ज्या संसारासाठीं, ज्या जगासाठीं करावयाचें त्याचें सहस्र वेळां अत्यंत ओंगळ वर्णन करून त्याच्याविषयीं किळस निर्माण करून, मृत्यु उद्यां येणार आहे अशा वृत्तीनें वागण्याचा उपदेश करून, त्यांनीं मनुष्यांच्या कर्तृत्वाच्या मागची मूळ प्रेरणाच पांगळी करून टाकली; आणि तें त्यांनीं हेतुपूर्वक केलें आहे. अशा बर्तनानें जगाविषयींचें प्रेम दुबळें होतें, शिथिल होतें हें त्यांनीं अभिमानानें सांगून तसा उपदेश केला आहे. याचा अर्थ असा कीं, प्रवृत्तीचें मूळच त्यांनीं उपटून टाकिलें आहे.

यानंतर संतांनीं अंगिकारलेल्या एका अत्यंत महत्त्वाच्या तत्त्वाचा विचार करून प्रवृत्तिधर्माचें हें विवेचन पुरें करावयाचें आहे. तें तत्त्व म्हणजे प्रारब्ध-वाद हें होय. संतांनीं केलेलें प्रारब्धवादाचें प्रतिपादन वाचतांना मनांत मारखें येत असतें कीं, कळत किंवा नकळत मोक्षधर्माच्या, अध्यात्माच्या एकांतिक प्रेमामुळें किंवा अन्य कांहीं कारणामुळें त्यांनीं प्रवृत्तिधर्माचा अगदीं समूळ उच्छेद करण्याची प्रतिज्ञा केल्यासारखें वर्तन केलें आहे. वास्तविक मोक्ष-धर्माबरोबर प्रारब्धवाद प्रतिपादन केला पाहिजे असें मुळींच नाहीं. त्याचा-त्याचा परस्परसंबंध कांहीं नाहीं; पण संतांच्या भागवतधर्मामध्यें इहलोकींच्या उत्कर्षाविषयींचा प्रारब्धवाद हें एक अविभाज्य अंग होऊन बसलें आहे. संतांचा प्रयत्नवाद आहे तो सर्व परमार्थक्षेत्रांत ! पण इहलोकींच्या वैभवा-विषयीं 'अन्न-आच्छादन, हें तों प्रारब्धा आधीन' म्हणून तुम्ही आपली वाणी ( व इतर शक्ति ) 'सुखें वेंचा नारायणीं;' असा त्यांचा उपदेश आहे. 'प्रारब्धेंचि जोडे धन, प्रारब्धेंचि वाढे मान। प्रारब्धेंचि होय सुख, प्रारब्धेंचि होय दुःख । प्रारब्धेंचि भरे पोट, तुका करीना बोभाट' असें आहे म्हणून, 'हे मना, उगीच सोस करूं नको' आणि 'पंढरिरायाचें भजन कर' असें संत म्हणतात ( जोगगाथा—२०७१. ) असाध्य तें साध्य करितां सायास असा श्रीतुकारामांचा निर्धार आहे; पण हें सामर्थ्य राज्य-

वृद्धि, शत्रुपराजय, जन्माने प्राप्त झालेल्या शेती, व्यापार इत्यादि व्यवसायातील धनाचा उत्कर्ष यांसाठीं वापरावयाचें नाहीं. कारण 'धनराज्य जे उपार्जिती त्यांना देव भेटणार नाहीं,' हें ठरलेलें आहे. म्हणून हें सामर्थ्य परमार्थासाठींच वापरावयाचें आहे. या जगांतलें भवितव्य परमेश्वरावर सोंपवून द्यावें. कारण त्याचें यशापयश आपल्या पापपुण्यावर अवलंबून आहे. म्हणून परमार्थसाधन करून पुण्याची जोड करीत रहावें. आपलें तनमनधन त्या पुण्यासाठीं, पंढरीसाठीं, विठ्ठलासाठीं झिजवावे म्हणजे या संसाराची तो काळजी घेईल; आपण त्याची चिंता वाहूं नये, अशी संतांची शिकवण आहे. आपण विहित कर्मे करतांनासुद्धां एकाच गोष्टीवर लक्ष केंद्रित करावयाचें. या जगांत जन्माला आलों आहों हीच अत्यंत लज्जास्पद गोष्ट झाली आहे हें नित्य मनांत बाळगून ('परी जन्मती ते लाज, न सांडी जयाचें निज') येथून जितक्या लवकर निघून, सुटून जातां येईल तितकें जाण्याची धडपड करावयाची. 'एथ अर्जुना जरी अवचटें, जन्मलास तूं। तरी झडझडोनि वहिला निघ, इये भक्तीचिये वाटे लाग, जिया पावसी अव्यंग, निजधाम माझें' (ज्ञाने. ९–५१५, ५१६.)

मराठ्यांच्या इतिहासांत अनेक हर्षामर्षाचे प्रसंग झाले; पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्यांतील घटनांची ऐतिहासिक चिकित्सा, कार्यकारणमीमांसा त्या वेळीं फारच क्वचित् केलेली आपणांस दिसते. बहुधा जय झाला तर स्वामींच्या वा श्रीमंतांच्या प्रौढ पुण्यप्रतापेंकरून झाला, आणि पराजय झाला तर प्रारब्धयोगेकरून झाला अशी कारणमीमांसा केलेली सांपडते. "होणार भविष्य, त्यास काय यत्न आहे?" "श्रीमंतांची बुद्धि महान्, परंतु भावी अर्थ, तेणेंकरून विपर्यास पडला. होणार अवश्य होतें, यदर्थी संदेह धरूंच नये, हा माझा निश्चय." "सांप्रत कलियुग; धर्म लयास जाणार हें तों दिसतेंच आहे" अशी विचारसरणी सर्वत्र दिसते. मराठ्यांनीं पराक्रम खूपच केले. अशा वेळीं घडत असलेल्या घटनांची भौतिक, ऐहिक मीमांसा त्यांनीं अल्प जरी केली असती तरी इंग्रजांपुढें ते नामोहरम झाले नसते. १५२६ सालीं बाबरानें

हिंदुस्थानांत पहिली तोफ डागली; पण यानंतर मराठ्यांना दोनशें वर्षेपर्यंत तोफ-खान्याचें महत्त्व कळलें नाहीं. इंग्रजांची राष्ट्रनिष्ठा, त्यांची प्रबल केंद्रसत्ता, त्यांचें शिस्तीचें सैन्य, त्यांची टापटीप सारखी मराठ्यांच्या डोळ्यांपुढें होती; पण हीं कांहीं निराळीं तत्त्वें आहेत, हा उमगच त्यांना झाला नाहीं. जयापजयाचा संबंध त्याशीं आहे हें शंभर-दोनशें वर्षें त्यांना जाणताच आलें नाहीं. कारण हें सर्व प्रारब्धाधीन आहे, कलियुगांत हेंच व्हावयाचें, असा एक विचार संतांच्या उपदेशामुळें त्यांच्या मनांत रुतून बसलेला होता. त्यामुळें पुढें हीं विजयाचीं साधनें स्वीकारावीं असे त्यांनीं ठरविलें तरी त्या साधनाच्या मूळ उगमापाशीं जावें, हे त्यांच्या मनांतसुद्धां आलें नाही. कारण समाजाच्या उत्कर्षापकर्षांची, जयापजयाची, भौतिक मीमांसा करण्याचें सामर्थ्यच त्यांच्या मनाला राहिलें नव्हतें. पुरुषार्थाच्या ऊर्मी अंगांत उसळून त्याअन्वयें ते पराक्रम गाजवीत असतांनाहि प्रारब्ध, कलियुग, पापपुण्य यांची मगरमिठी त्यांना सोडवितां आली नाहीं. त्यामुळें परकीय आक्रमणाचें आकलन करण्याच्या बाबतींत ते बालच ठरले. कलियुगकल्पना, शब्दप्रामाण्य, (जन्मानें प्राप्त झालेलें कर्म सोडून अन्य व्यवसाय करणें भयावह आहे, हीं) जातिबंधनें, हीं सर्व प्रारब्ध-वादाचींच भावंडें आहेत. आपल्या हातांत नसलेल्या शक्ती आपल्याला खेळवीत आहेत, आपण त्यांच्या अधीन आहोंत हाच संस्कार या सर्वांमुळें दृढ होतो; आणि मग तोफखाना, घोडदळ, पायदळ, गनिमीकावा, मैदानी लढाई, सरंजामी पद्धत, दुबळी केंद्रसत्ता, शिस्तीचें लष्कर, इतिहास-भूगो-लांचें ज्ञान, यांचा जयापजयाशीं कांहीं संबंध जोडावा ही बुद्धि रहात नाहीं. व्यापारामुळें राष्ट्राला अमाप धन मिळते हें तर भारतीयांना पूर्वीं अज्ञात नव्हतें ना ? इसवी सनाच्या पहिल्या आठदहा शतकांत ग्रीस, रोम, जावा, सुमात्रापर्यंत येथले व्यापारी जात; पण मराठ्यांनीं राष्ट्रीय जीवनाच्या या अंगाकडे सर्वस्वीं दुर्लक्ष केलें होतें. त्यामुळें ते सारखे कर्जबाजारी असत. तरी या दारिद्र्याची त्यांनीं कधीं मीमांसा करून पाहिली नाहीं. इंग्रज, डच, पोर्तुगीज यांचा प्रचंड उद्योग पाहूनहि त्यांच्या कांहीं ध्यानांत आलें नाहीं.

येथल्या हिंदु, जैन या दोन्ही व्यापाऱ्यांना इंग्रजांनीं वश करून घेतलें व त्यांनीं त्यांची एकनिष्ठेनें सेवा केली आणि अमाप धन त्यांना दिलें. पण हें धोरण मराठ्यांना किंवा रजपुतांना आंखतां आलें नाहीं. कारण या धनसामर्थ्याचा त्यांना उमगच झाला नाहीं. इंग्रजांची राष्ट्रनिष्ठा, त्यांची लोकसत्ता, त्यांचें विज्ञान, त्याची लष्करी विद्या, त्यांचा व्यापार व त्यांची एकंदर ऐहिक विद्या, हीं त्यांच्या उत्कर्षाच्या, विजयाच्या बुडाशीं आहेत, आणि आपल्यांत या शक्ती नाहींत म्हणून आपण मरत आहों ही ऐहिक मीमांसा मराठ्यांच्या बुद्धीच्या कक्षेंत कधीं आलीच नाहीं. कलियुगामुळें, अधर्म माजल्यामुळें, प्रारब्धामुळें हें घडत आहे अशी त्यांची भावना होती आणि आजहि शेंकडा चारपांच शिकलेले लोक सोडून दिले तर पाऊस पडला नाहीं, पीक आलें नाहीं, रोगराई आली, पूर आले, अपघात झाले तर कलियुगामुळें, अधर्मामुळें हें होत आहे, अशीच मीमांसा लोकांच्या मनांत चाललेली असते.

इतिहासाची कठोर वास्तववादी भौतिक चिकित्सा करण्याचें सामर्थ्य आमच्यांत ज्याप्रमाणें निर्माण झालें नाहीं त्याचप्रमाणें तेजस्वी, प्रखर, दुर्दम अशी क्रांतिकारक वृत्तीहि आमच्यांत निर्माण होणें संतांच्या प्रारब्धवादानें अशक्य होऊन बसलें. या बाबतींत असें दिसतें कीं, प्रारब्धाच्या जोडीला गुरुभक्ति ही आणखी एक प्रतिगामी शक्ति येऊन बसली होती. परमार्थसाधनासाठीं गुरु हा आवश्यक ठरल्यामुळें आणि त्याच्यावांचून सर्व मार्ग निष्फल होतात असा दंडक असल्यामुळें प्रारंभींच येथें पराधीनता निर्माण होते; आणि गुरूचा शब्द हा वेद किंवा परमेश्वर यांच्याहिपेक्षां जास्त प्रमाण मानावयाचा असल्यामुळें बुद्धिस्वातंत्र्याचा समूळ उच्छेद होतो. या गुरुभक्तीचें रूपहि, व्यक्तित्वाच्या दृष्टीनें विचार करतां, प्रशंसनीय वाटत नाहीं. अगोदर निवृत्तिनाथ, विसोबा खेचर यांसारख्या अत्यंत सामान्य माणसांना, ज्यांनीं कोणताहि पराक्रम, कोणताहि पुरुषार्थ गाजविलेला कोणीं पाहिलेला नाहीं, ज्यांचें कर्तृत्व, बुद्धिसामर्थ्य, कोणत्याहि क्षेत्रांत कोठेंहि प्रत्ययास आलेलें नाहीं, अशांना परमेश्वरापेक्षांहि श्रेष्ठ मानावयाचें, सूर्य-चंद्र यांना त्यांच्या-

पासूनच तेज प्राप्त होतें, चराचर सृष्टि त्यांच्याच कृपेनें नीट चालते अशीं त्यांचीं वर्णनें करावयाचीं, आणि मग त्यांची अनन्यनिष्ठेनें भक्ति करावयाची ! ती तरी कशी ? गुरुमहाराजांच्या पादुका मीच होईन, छत्री मीच होईन, त्यांनीं टाकलेली चूळ घेणारें तस्त मीच होईन, त्यांनीं विड्याचा चोथा थुंकला तर तो मी घेईन, त्यांचें उष्टें काढीन, अंथरूण घालीन, पाय चेपीन, गुरु-महाराजांचें उष्टें अन्न मिळालें तर त्यापुढें मोक्षसुख तुच्छ मानीन, गुरूंना नारायण कल्पून त्यांचे पाय चुरणारी लक्ष्मी मी होईन ! ( ज्ञानेश्वरी १३. ३९०–४५०.) अशा वृत्तीनें गुरुसेवा केली पाहिजे. त्यावांचून मोक्ष नाहीं. श्रीनामदेवांना प्रत्यक्ष परमेश्वर भेटले होते; पण त्यांनींच त्यांना सांगितलें कीं, खरा मोक्ष हवा असेल तर गुरूला शरण जा. ‘ शरीर वेंचिलें तरी वेंचिजे, परी सद्‌गुरुवचन नुल्लंघिजे ॥ गुरूचे दोष गुण, मनें न कीजे उच्चारण, जें जें गुरूचें आज्ञापन, मेरू ऐसें मानिजे । ऐसें सद्‌गुरूचें महिमान, म्हणोनि ब्रह्म त्या आधीन । ’ असा विठ्ठलांनीं नामदेवांना उपदेश करून त्यांना विसोबा खेचर यांना शरण जाण्यास सांगितलें ( नामदेव गाथा, आवटे ४४–४९ ).

गुरुभक्तीची ही वृत्ति पाहिली म्हणजे क्रांतिकारक वृत्ति ही बरोबर याच्या दुसऱ्या टोंकाला आहे असें ध्यानांत येईल. क्रांति-वृत्ति म्हणजे व्यक्तित्वाच्या आविष्काराचें सर्वांत उग्र व सर्वांत प्रखर असें स्वरूप होय. गुरु, वेद, रूढ समाजतत्त्वें यांवर अत्यंत निर्घृण असे प्रहार करण्याचें सामर्थ्य हा क्रांति-वृत्तीचा आत्मा होय. जुन्या आज्ञांचें उल्लंघन करून जुन्या प्रामाण्यांचा विध्वंस करून टाकण्याची बुद्धीची जी उद्दाम प्रेरणा तीच क्राति–वृत्तीच्या मुळाशीं असते. या क्रांति-वृत्तीला बंधनें रुचत नाहींत, परावलंबनाचा तिटकारा असतो आणि पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य हें तिचें अंतिम ध्येय असतें. वर सांगितलेल्या गुरुभक्तीची शिकवण ज्या मनाला मिळते त्याच्या अभ्यंतरांत असल्या क्रांति-वृत्तीचें पोषण कधींच होणें शक्य नाहीं. आणि मध्ययुगीन काळांत भारतीयांच्या मनांत असें पोषण कधीं झालें नाहीं हें इतिहासच सांगत आहे. एकांतिक मोक्षवाद, प्रारब्धवाद व गुरुभक्ति या संतांच्या उप-

देशांतील तीन महातत्त्वांनीं इतिहासचिकित्सेच्या सामर्थ्याप्रमाणेंच क्रांतीचें सामर्थ्य निर्माण होणें अशक्य करून ठेविलें. इतिहासचिकित्सा, तज्जन्य कार्यकारणनिष्ठा आणि क्रांतिवृत्ति या इहलोकींच्या अभ्युदयाला अत्यंत उपकारक अशा शक्ती आहेत. म्हणूनच संसारावरील दृढ निष्ठा, ऐहिक ज्ञानाची उत्कट लालसा, जड विश्वावर विजय मिळविण्याची आकांक्षा, यांच्याप्रमाणेंच या शक्ती म्हणजे प्रवृत्तिधर्माचे प्रधान घटक होत. त्यांची उपेक्षा, अवहेलना ही अर्थातच पराकाष्ठेची निवृत्ति होय.

येथवर जें विवेचन केलें त्यावरून प्रवृत्तिधर्माचें खरें स्वरूप स्पष्ट होईल. केवळ संसारांत रहाण्याची परवानगी आणि विहित कर्मे करण्याचा उपदेश इतका प्रवृत्तीचा क्षुद्र अर्थ नाहीं. या समाजाच्या ऐहिक वैभवासाठीं, अभ्युदयासाठीं, ज्या शक्ती अवश्य आहेत त्यांची जोपासना हा प्रवृत्तीचा खरा अर्थ आहे. वर सांगितल्याप्रमाणें संसारावरील दृढ निष्ठा, ऐहिक स्वातंत्र्याची, स्वराज्य, साम्राज्य यांविषयींची, विश्वविजयाची आकांक्षा, विज्ञान, इतिहास, अर्थ यांविषयींची प्रखर जिज्ञासा, जड विश्वाच्या आक्रमणास अवश्य ती साहसी वृत्ति, इतिहासांतून निघणारी कठोर वास्तववादी मीमांसा पत्करण्याची मनाची सिद्धता, कार्यकारणावरील निष्ठा, प्रखर अशी क्रांतिकारक वृत्ति, या सर्वांमिळून प्रवृत्तिधर्म होतो. आणि या दृष्टीनें विचार केला तर संत हे आत्यंतिक निवृत्तिवादी होते, वरच्यापैकीं एकाहि शक्तीची जोपासना त्यांनीं केली नाहीं, करण्याचें त्यांच्या मनांतहि नव्हतें, हें कोणालाहि मान्य करावें लागेल. इतकेंच नव्हे, तर त्यांनीं भागवतधर्माचें जें तत्त्वज्ञान सर्वत्र प्रसृत केलें त्यानें वरीलपैकीं अनेक शक्ती पांगळून गेल्या व बाकीच्या निर्माण होण्याचा संभव नष्ट झाला, याबद्दलहि दुमत होईल असें वाटत नाहीं.

संतांच्या कार्याचें अशा प्रकारचें मूल्यमापन केल्यावरहि राजवाडे यांचें एकांतिक मतच आपण स्वीकारलें पाहिजे असें मला वाटत नाहीं. कारण धर्म व भाषा या क्षेत्रांत त्यांनीं जें एक विशिष्ट कार्य केलें आहे त्यासाठीं महाराष्ट्र सदैव त्यांचा ऋणी राहील. त्या काळीं बहुजनसमाजांत जाखाई-

जोखाई, मरीआई इत्यादि हीन, क्रूर, अमंगळ अशा देवतांचें पूजन चालू होतें. त्याचा निषेध करून देव ही एक क्रूर, सौदा करणारी, केवळ शासन करणारी, सूडबुद्धि बाळगणारी शक्ति नसून ती माउली आहे, मातेप्रमाणें ती भक्तांचा प्रतिपाळ करते आणि यासाठीं तिला कांहीं बळी द्यावा लागत नसून केवळ भक्तीनें, प्रेमाने ती वश होते, हा अतिशय उदात्त विचार संतांनीं येथल्या समाजांत दृढमूल करून टाकला. ज्या समाजाचीं दैवतें उंच झालीं तो संस्कृतीच्या वरच्या पातळीवर चढला यांत वादच नाही, आणि याचें श्रेय संतांनाच आहे. धार्मिक क्षेत्रांत समतेची प्रस्थापना हें संतांचें दुसरें बहुमोल कार्य आहे. समता हें तत्त्वच असें आहे कीं, त्याचें अत्यल्प आचरणहि मानवाचा कांहीं तरी उत्कर्ष घडवितेंच. त्या काळीं आपल्या समाजात धार्मिक, राजकीय, आर्थिक, सामाजिक—कोणत्याच क्षेत्रांत उच्चवर्णीयाखेरीज इतरांना प्रतिष्ठा किंवा श्रेष्ठ स्थान प्राप्त करून घेण्यास अवसर नव्हता. त्यामुळें त्यांच्या जीविताचा सर्वस्वीं कोंडमारा होत होता. संतांनीं धार्मिक क्षेत्रांत, परमार्थापुरती, अगदी मर्यादित अर्थाने का होईना, पण ही कोंडी फोडली आणि बहुजनसमाजाच्या मानासिक विकासाला कांहीं अवकाश प्राप्त करून दिला. यानंतर मराठी भाषेतील संतांनीं केलेली ग्रथरचना, तिला त्यांनीं प्राप्त करून दिलेलें उन्नत रूप याचें महत्त्व इतके आहे कीं, त्यामुळेंच महाराष्ट्राला महाराष्ट्रत्व—भिन्नराष्ट्रीयत्व प्राप्त झाले आहे. फ्रान्स, जर्मनी, इटली येथील समाजांना जें भिन्नत्व प्राप्त झालें ते धर्म, किंवा वंश यांमुळें नसून भाषाभेदानेंच प्राप्त झालें आहे. त्याच-प्रमाणें गुजराथ, महाराष्ट्र, कर्नाटक, याचे भिन्नराष्ट्रीयत्व हें पिंडान्वयापेक्षां भाषान्वयानेंच सिद्ध झालें आहे, असें लो. टिळकांनीं म्हटलें आहे. आणि मराठी भाषेला संतांनी जें पृथक्, स्थिर व शोभिवंत रूप प्राप्त करून दिलें, त्यामुळेंच महाराष्ट्राचें भिन्नत्व प्रस्थापित झालें हें उघड आहे.

वास्तविक यांतूनच पुढें समाजाचा सर्वांगीण विकास व्हावयास हवा होता. धार्मिक समता ही सर्व प्रकारची—सामाजिक, राजकीय—समता निर्माण करण्यास पुरेशी प्रेरणा आहे. त्याचप्रमाणें भिन्नराष्ट्रीयत्वाची जाणीव ही तर

सर्व प्रकारच्या सामर्थ्याची जननी आहे. पण संतांचेंच वर सांगितलेलें प्रारब्ध-वादाचें तत्त्वज्ञान समाजांत जास्त प्रभावी ठरल्यामुळें दुर्दैवानें हा विकास झाला नाहीं. पोपची सत्ता, राजसत्ता, सरंजामी सत्ता यांवर चौफेर हल्ला चढविणारे युरोपांतील मार्शिग्लिओ, विल्यम, वायक्लिफ, जॉन हस, लूथर येथें निर्माण झाले नाहींत. समर्थ रामदास स्वामींच्या लेखनांत ऐहिकतेच्या बऱ्याच प्रवृत्ती दिसतात. राष्ट्रीय स्वातंत्र्याची आकांक्षा, संघटनेच्या महतीची जाणीव, राज्य भौतिक शक्तीनें मिळतें, क्षात्रधर्मानें मिळतें हा ठाम निश्चय इ. ऐहिक उत्कर्षाला पोषक असे बरेच विचार, जे पूर्वींच्या संतांच्या वाङ्मयांत अभावानेंच दिसतात, असे अनेक विचार समर्थांच्या वाङ्मयांत दिसतात. पण दुर्दैव असें कीं, त्यांचें एकंदर लेखन पाहिलें तर हे विचार म्हणजे दर्यामें खसखस इतक्याच प्रमाणांत आढळतात. ' श्रीसमर्थ ग्रंथभांडार ' या त्यांच्या पांगारकरांनीं संपादित केलेल्या बाराशें पानांच्या ग्रंथांत अभ्युदयाचें विवेचन करणारीं जेमतेम तीस-चाळीस पानें आहेत. जीं आहेत त्यांत समर्थांच्या विचारांचा एक प्रवाह पूर्वीपेक्षां अगदीं भिन्न होता हें स्पष्ट दिसतें. पण इतर भागात समर्थांनीं संसाराची, ऐहिक वैभवाची, ऐहिक ज्ञानाची इतर संतांच्याइतकीच हिडीस निंदा केली आहे. गुरुभक्तीची महती तशीच गायिली आहे. प्रयत्नवादाचे प्रणेते म्हणून ज्यांची कीर्ति आहे ते समर्थ अन्यत्र इतर संतांइतकाच प्रारब्धवाद सांगतात. आणि यामुळें या निवृत्तीच्या महासागरांत प्रवृत्तीच्या विचाराचे जे चारदोन मधुबिंदु दिसतात त्यांचा समाजावर त्या काळीं कितपत परिणाम झाला असेल याविषयीं बरीच शंका वाटते. शिवछपतींच्या चित्तांत क्रांतिकारक विचार विपुल प्रमाणांत होते. त्यांनीं समाजाची राजकीय व आर्थिक घडी बरीच बदलली होती; पण त्यांचें तत्त्वज्ञान बनवून त्याला त्या वेळीं ग्रंथरूप देणारा स्वयंसिद्ध तत्त्ववेत्ता कोणीच न निघाल्यामुळें त्यांच्यामागें त्या क्रान्तिप्रवृत्ति पंचवीसतीस वर्षांपेक्षां जास्त काळ टिकल्या नाहींत. त्यांनीं निर्माण केलेल्या परंपरेंत मराठे पराक्रम करीत राहिले हें खरें. पण समाजकारण, राजकारण अर्थकारण या क्षेत्रांत नवें तत्त्वज्ञान निर्मून राष्ट्रनिष्ठा, लोकसत्ता, बुद्धिप्रामाण्य

प्रयत्नवाद, विज्ञाननिष्ठा, समता यांच्या पायावर नवसमाजरचना करण्याची ऐपत त्यांच्या ठायीं नव्हती. त्यामुळें ब्रिटिशांची राजवट सुरू होऊन पाश्चात्यांच्या भौतिक ज्ञानाचा येथें प्रसार होईपर्यंत संतप्रणीत निवृत्तीच्या तत्त्वज्ञानांतच आपला समाज बुडून राहिलेला होता. गेल्या शंभर वर्षांत तें निवृत्तीचें तत्त्वज्ञान मागें हटून प्रवृत्तिधर्मांचा प्रसार मागल्या मानानें पहातां पुष्कळच जास्त प्रमाणांत झाला आहे. पण अजून बहुजनसमाजापर्यंत भौतिक ज्ञानाची निष्ठा पोंचलेली नाहीं, आणि त्यामुळें तो बहुसंख्य समाज प्रारब्धवाद, अंधश्रद्धा, गुरुप्रामाण्य यांच्याच मगरमिठींत आहे. निराशा, दारिद्य यांमुळें ऐहिक संसाराचें वैय्यर्थ हें त्याच्या मनांत घर करून राहिलेलें आहे. नव्या ज्ञानावर अजून त्याची मुळींच श्रद्धा बसलेली नाहीं. त्याच्या मनांत धाडस, साहस, विजिगीषा, सृष्टीशीं झुंज घेण्याइतकी कणखर वृत्ति, विषमतेविरुद्ध लढा करण्याची रग या वृत्तींची जोपासना करावयाची असेल तर त्या निवृत्तीच्या तत्त्वज्ञानाचा समूळ उच्छेद करणें अवश्य आहे. त्यावांचून नवराष्ट्रनिर्मितीसाठीं, नव्या विश्वाची उभारणी करण्यासाठीं अवश्य असलेलें प्रचंड कर्तृत्व त्याच्या ठायीं निर्माण होणार नाहीं. हें व्हावयाचें तर प्रवृत्तिधर्मांच्या खऱ्या इतिहाससिद्ध लक्षणाची ओळख होणें अवश्य आहे. त्याच हेतूनें वर एवढा प्रपंच केला आहे. संतांनीं आपल्या समाजावर जे उपकार केले आहेत त्यासाठीं आपण त्याचे ऋणी असलें पाहिजे हें खरें; पण ते प्रवृत्तिवादी आहेत असा अट्टाहास करणें हें कांहीं कृतज्ञतेचें लक्षण नव्हे. निवृत्तीलाच प्रवृत्ति समजून त्यामुळें आपण आत्मघात करून घेऊं. जुन्या पंडितांना हें पटेल अशी आशा नाहीं; पण समाजांतल्या तरुण कार्यकर्त्यांनीं या तऱ्हेचा बुद्धिनिश्चय करून आपल्या समाजाचा मनःपिंड बदलून टाकण्याचा प्रयत्न केला तरच आपला समाज प्रवृत्तिवादी होऊन मग सामर्थ्यसंपन्न होईल.

---

डिसेंबर १९५३

# ६. भगवान् श्रीकृष्ण

## कौस्तुभ

महाभारताची थोरवी आज त्रिखंडातल्या विद्वद्वराना व रसिकाना मान्य झालेली आहे. प्राक्कालीन भारतांतील महाप्रज्ञावंत पुरुषांच्या अद्भुत प्रतिभेचा तो एक असामान्य असा विलास आहे, याविषयीं आतां दुमत राहिलेलें नाहीं. अनेक [illegible] संपन्न असल्यामुळेंच या ग्रंथाला आजच्या जगांत असें अलौकिक स्थान प्राप्त झालें आहे हें उघड आहे. या महाभारतांत इतिहास आहे, काव्य आहे, तत्त्वज्ञान आहे, धर्मप्रवचन आहे. स्वतः वेद-व्यासांनींच म्हटल्याप्रमाणें हा ग्रंथ भगवान् समुद्र किंवा हिमवान् गिरी यांच्या-प्रमाणें अनंत रत्नांनीं समृद्ध आहे आणि म्हणूनच त्याला अमरता प्राप्त झाली आहे. या अनंत रत्नामध्यें श्रेष्ठकनिष्ठ भाव लावणें फार कठीण आहे हें खरें व याबद्दल फार मतभेद होतील हेंहि खरें. तरी पण हा प्रयत्न करणें अगदीं निष्फल होईल असें वाटत नाहीं. या अनंत रत्नामध्यें भगवान् श्रीकृष्णाचें चरित्र हें अगदीं निस्तुल व अद्वितीय असें रत्न आहे, असे मला वाटतें. हें चरित्र म्हणजे या रत्नमालेंतील कौस्तुभ आहे. भारतांतील सर्व घटना, सर्व प्रसंग, त्यांतील धर्मवेत्त्यांनीं केलेलीं प्रवचनें, सागितलेलीं तत्त्वज्ञानें या सर्वांवर या महापुरुषाच्या कर्तृत्वाची, विचारांची व चारित्र्याची छाप पडलेली स्पष्ट दिसून येते. शरीरांतील प्रत्येक अणु, रक्तबिंदु व पेशी यांशी आत्मतत्त्वाचा संबंध असतो आणि त्या आत्मतत्त्वामुळेंच त्या शरीराला एकता, सांगता व पृथगात्मता हे गुण प्राप्त झालेले असतात. महाभारतांतील अनंत रत्नांची ज्याच्यामुळें एक माला बनली आहे व ज्यामुळें तिचें सौंदर्य वृद्धिंगत झालें आहे त्या या कौस्तुभाचा तेजोविलास जितका जवळून न्याहाळावा तितका जास्त मनोरम वाटतो.

## कुल व राष्ट्र

भरतखंडाच्या इतिहासांत श्रीरामचंद्र व श्रीकृष्ण हे दोन अवतारी पुरुष गणले गेले आहेत. त्यांचीं प्रत्यक्ष अवतारकार्यें कोणचीं हें त्यांच्या चरित्रांत

वर्णिलेलें आहे. त्या त्यांच्या चरित्रांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, या दोन पुरुषांनीं धर्म म्हणून जीं तत्त्वें डोळ्यापुढें ठेविलीं होतीं तीं एकमेकांपासून अगदीं भिन्न अशीं होतीं. मानव जातीच्या इतिहासक्रमांत अनुक्रमानें येणाऱ्या दोन भिन्न कालखंडांचीं तीं तत्त्वें होतीं. मानवसमाजाच्या संघटनेंत कुटुंब हा पहिला घटक आहे. तो पहिला पेशी आहे. अशीं अनेक कुटुंबें मिळून नंतर समाज होतो. या दोन अवस्थांत दोन भिन्न धर्मतत्त्वें प्रचलित असणें हें साहाजिक आहे. श्रीरामचंद्र हा कुटुंब किंवा कुल या पहिल्या अवस्थेंतला अवतार असून श्रीकृष्ण हा अशीं अनेक कुलें एकमेकांशीं दृढपणें संलग्न झाल्यानंतर जो समाज निर्माण झाला त्या अवस्थेंतला अवतार आहे. कुल ही रामाची अंतिम निष्ठा आहे. त्यामुळें पित्राज्ञापालन हा त्याचा सर्वश्रेष्ठ धर्म होता. समाज किंवा प्रजा यांच्या कल्याणाची त्याला चिंता नव्हती असें नाहीं; पण पित्याच्या आज्ञेचा अवमान करून तें साधावें अशी त्याची दृष्टि नव्हती. लोकसमूहांत शासन निर्माण करण्याची इच्छा उद्‌भूत झाली कीं त्यांत प्रथम शासनाचा एक लहान एकांक ( युनिट ) तयार होतो आणि मग त्या एकांकांत कोणची तरी सत्ता अंतिम म्हणून मानावी लागते. कुल या एकांकांत पिता ही अंतिम सत्ता सर्व जगांत मानलेली होती, आणि त्यामुळें त्या अवस्थेंत त्या पित्याची आज्ञा पाळणें हा सर्वश्रेष्ठ धर्म ठरत असे. रामचंद्राचें हेंच तत्त्व होतें. आपला पिता काममूढ झाला असून लंपटबुद्धीनें तो आपणास वनवासांत हाकून देत आहे, हें रामचंद्राला मान्य होतें. गंगा ओलांडून एका वृक्षाच्या खालीं विश्रांतीसाठीं त्रिवर्ग बसले असताना रामचंद्रानें मन मोकळें करून हें लक्ष्मणाला सांगितलें; पण म्हणून त्याच्या आज्ञेचा अवमान करणें हें त्याला मान्य नव्हतें. वनवासाला जाण्यापूर्वी लक्ष्मण नाना तऱ्हेनें त्याला सांगत होता कीं, ' हा दशरथ पिता म्हणवून घेण्यास पात्र नाहीं. मी याला कैदेंत टाकतों. त्याची पर्वा न करतां तूं राज्य हातीं घे. ' अशी परोपरीनें लक्ष्मणानें विनवणी चालविली होती. पण रामाचें उत्तर एक. ' मी पित्याची आज्ञा उल्लंघिण्यास असमर्थ आहे. हें रघुकुलाला शोभणार

नाहीं. पित्राज्ञापालन हाच सनातन धर्म होय. पित्यानें जी आज्ञा केली ती क्रोधामुळें किंवा विषयाधीनतेमुळें केलेली असली तरी धर्मनिष्ठ पुरुषानें ती पाळलीच पाहिजे.' (अध्याय २१-५९) असें रामाचें धर्मतत्त्व होतें, आणि त्याप्रमाणें तो वर्तत होता. या वर्तनामुळें अपरिमित हानि होईल हें त्याला दिसत होतें. कैकेयी ही दशरथाला व कौसल्येला विष घालील अशी त्याला भीति वाटत होती. आपण गेल्यावर राज्यावर विपत्ति येईल हेंहि त्याच्या ध्यानीं येत होतें. तरी सुद्धां 'पित्याच्या आज्ञेचें उल्लंघन करणें हा अधर्म होय'— 'धर्म व अर्थ यांना सोडून केवळ कामवशतेमुळें केलेल्या आज्ञेचेंहि उल्लंघन करणें या अधर्माची मला भीति वाटते' असें तो म्हणाला; आणि पित्राज्ञापालन या श्रेष्ठ व सनातन धर्माचें आचरण त्यानें केलें.

### समाजरक्षण हाच धर्म

या ठिकाणीं श्रीकृष्ण असता तर? त्यानें ही पित्राज्ञा कधींहि पाळली नसती हें निश्चित होय. समाजरक्षण हा त्याचा धर्म होता. ती त्याची अंतिम निष्ठा होती. कोणच्याही कार्याची युक्तायुक्तता तो 'लोकसंग्रह' या निकषावरून ठरवीत असे. त्याची धर्माची, सत्याची, न्यायाची व्याख्या एकच होती. समाजाचें कल्याण हाच धर्म होय. धर्मनियम हे लोकांच्या प्रभवासाठीं म्हणजे उत्कर्षासाठींच केलेले असतात, धर्म हें समाजनिरपेक्ष असें कांहीं तत्त्व नव्हे, असें त्याचें मत होतें. आपल्या कांहीं प्रतिज्ञांचें अर्जुन स्तोम माजवूं लागला तेव्हां श्रीकृष्णानें त्याला हें तत्त्व समजावून दिलें. श्रुति हा धर्माचा आधार हें खरें; पण भूतांचा उत्कर्ष हेंच ध्येय पुढें ठेवून श्रुतींत धर्माची व्याख्या केलेली असते म्हणून धर्माधर्मनिर्णय तर्कानें करावा लागतो, असा आपला अभिप्राय श्रीकृष्णानें दिलेला आहे. (कर्णपर्व ६९). रामाच्या ठायीं श्रीकृष्ण असता तर त्यानें आपल्या मृदु, सौम्य पण निश्चयात्मक वाणीनें दशरथाला धर्मतत्त्व विशद करून सांगितलें असतें आणि कैकेयीला लोककल्याणासाठीं कदाचित् शासनहि केलें असतें.

**तारतम्य**

श्रीकृष्णाच्या चारित्र्याचा प्रधानगुण म्हणजे त्याचा हा धर्मविषयक दृष्टिकोन होय. तो अत्यंत मोठा व्यवहारपंडित होता. मानवी संसारांतील शक्याशक्यतेच्या मर्यादा त्यानें पूर्णपणें जाणल्या होत्या. तारतम्याचें अवलोकन हें त्याच्या बुद्धीचें वैशिष्ट्य होतें. त्यामुळें अर्वाचीन काळच्या युटिलिटेरियन किंवा याहूनहि निश्चित म्हणजे प्रॅग्मॅटिस्ट पंथासारखी त्याची धर्मविषयक विचारसरणी होती. व्यवहारपांडित्य हा तिचा सारार्थ आहे. मानवी जीवनांत नेहमीं सत्याचाच जय होतो असें नाहीं, निष्पापता हीच विजयी होते असें नाहीं, नीतियुक्त आचरण हेंच फलदायी ठरतें असें नाहीं, हें त्या मानवव्यवहारवेत्त्यानें चांगलें जाणलें होतें. आणि त्यामुळें समाजरक्षणासाठीं अनेक वेळां असत्याचा, अधर्माचा आश्रय करणें भाग पडतें असें त्यानें अनेकवार सांगितलेलें आढळतें. द्रोणाला फसवून मारणें हा अधर्म होय, हें त्याला मान्य होतें. यामुळें धर्मराजाचा त्या वेळपर्यंत अधांतरीं चालणारा रथ हा भूमीवरून चालूं लागेल हेंहि त्याला दिसत होतें; पण फसवणूक केली नाही तर तो रथ जमिनींत गाडला जाईल हेंहि त्याला कळत होतें; म्हणून 'हे पांडवहो, आतां तुम्ही धर्ममार्ग सोडूनच युद्ध करा–' 'आस्थीयता जये योगो धर्ममुत्सृज्य पांडवाः' | द्रोणपर्व १९१·११ | 'अशा वेळीं असत्य हें सत्यापेक्षां श्रेष्ठ होय–' 'सत्यात् ज्यायः अनृतं वचः' (द्रोण १९१·४७) असा अत्यंत स्पष्ट शब्दांत त्यानें उपदेश केलेला आहे. जयद्रथवधाचे वेळीं, दुर्योधनाच्या वधाच्या वेळीं व इतरहि अनेक प्रसंगीं कृष्णानें हेंच धोरण ठेविलें आणि, मीं अशा तऱ्हेनें कपटाचा आश्रय केला नसता तर धन, राज्य, विजय, समृद्धि हीं मिळालीं नसतीं, ( शल्य ६१–६४ ) असें आपल्या कृत्याचें समर्थनहि केलें. व्यवहारपांडित्य किंवा तारतम्यज्ञान तें हेंच होय. भीष्मद्रोण यांसारखे महात्मेसुद्धां अन्याय, जुलूम, अत्याचार, अधर्म यांच्या बाजूनें उभे राहूं शकतात हें मानवी जीवनांतलें महान् वैगुण्य आहे. धर्मयुद्ध करून याचा निर्णय करावा तर युद्धांत नेहमीं सत्याचाच जय होतो असें नाहीं. युद्धांत कांहींहि घडतें, हें

या मर्त्यलोकांत दुसरें तेवढेंच वैगुण्य आहे. हें श्रीकृष्णानें चांगलें जाणलें असल्यामुळें, समाजरक्षण हाच धर्म असून सत्य हें साधन आहे, हें त्यानें मनाशीं निश्चित ठरविलें होतें. 'दैव आणि पुरुषप्रयत्न या दोहोंवर मिळून लोकहित अवलंबून आहे, हें प्राचीन महात्म्यांनीं विचारपूर्वक ठरविलें आहे.' (उद्योग ७९·४) हें तो धर्मराजाला नेहमीं सांगत असे. मानवी जीवनाचें असें सम्यक् आकलन झालेलें असल्यामुळें धर्मासाठीं धर्म ही एकांतिक धर्मनिष्ठा कृष्ण त्याज्य समजत असे. रामयुगांतहि हा विचार उद्भूत झाला होता; नाहीं असें नाहीं. 'काममूढ पित्याचीसुद्धां आज्ञा पाळावयाची ही तुझी फाजील धर्मनिष्ठा असून ती अत्यंत निंद्य आहे' असें लक्ष्मण रामचंद्राला अनेक वेळां सांगत असे (अयोध्याकांड २३·१४). पण लक्ष्मणाची भूमिका व पुण्याई लहान असल्यामुळें तो रामचंद्राचें मन वळवूं शकला नाहीं. श्रीकृष्णानें आपल्या थोर पुण्याईनें हें व्यवहारज्ञान समाजाला शिकविलें व भारतीय समाज एकांतिक अव्यवहार्य सत्यनिष्ठेनें उत्सन्न होऊं नये यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली.

### क्षात्रसंघटना

त्या काळच्या उत्तर भारतांत जरासंध, कंस, शिशुपाल यांसारखे अन्यायी, जुलमी व मदांध असे अनेक राजे होते. अशा राजांच्या सत्तांचा उच्छेद करून सर्व क्षत्रियमंडळांत एक शिस्त निर्माण करावी, त्यांच्यांतील कलह नाहीसे करून, सख्य घडवून आणून, सर्वत्र शांतता प्रस्थापित करावी आणि अशा रीतीनें भारतीय समाजाची सुस्थिति राखावी हें श्रीकृष्णाचें जीवितकार्य होतें. राजसूय यज्ञाचे आधीं जरासंधाचा वध करणें अवश्य आहे असें त्यानें युधिष्ठिराला सांगितलें त्याचें कारण हेंच होतें. हा जरासंध पाशवी सामर्थ्याच्या जोरावर अनेक राजांना बंदिवान करीत असे. त्यांचें राज्य लुटीत असे. असे ८६ राजे त्यानें कैदेंत टाकले होते व तसे शंभर झाल्यावर तो त्यांना शंकरापुढें बळी देणार होता. अशा वेळीं आपल्या या ज्ञातिबांधवांचें रक्षण करणें आपलें कर्तव्य आहे आणि तें करीत असतां मृत्यु आला तरी तो पत्करला पाहिजे,

अशी कृष्णाची भूमिका होती ( सभा-१५—२४—२५ ). क्षत्रिय-राजमंडळाचें रक्षण करणें ही आपली जबाबदारी आहे याची कृष्णाला नित्य रुखरुख होती. जरासंधाशीं बोलतांना त्यानें हें स्पष्ट करून सांगितलें आहे.' हे राजा, तूं निरुपद्रवी राजांची हिंसा करीत आहेस. आम्ही धर्मरक्षण करण्यास समर्थ आहोंत. आणि अशा वेळीं तें आम्हीं केलें नाहीं तर तुझें पातक आम्हांला लागेल.—' ( अस्मान् तद् एनोपगच्छेत् ) या जाणिवेमुळेंच श्रीकृष्ण जरासंध-वधास उद्युक्त झाला होता. ( सभा. २२—९ ).

जरासंधवधाचे वेळीं, पुढें कौरवपांडवाचे युद्धांत व इतरहि अनेक प्रसंगीं श्रीकृष्णानें जे सामदामदण्डाचे प्रयत्न केले ते पूर्ण निःस्वार्थी हेतूनें केलेले होते. भारतांतील क्षत्रियमंडळाचें सार्वभौमपद आपण घ्यावें अशी चुकूनसुद्धां त्यानें कधीं इच्छा केली नाहीं. बुद्धिमत्ता, सेनासामर्थ्य व धनसमृद्धि इत्यादि सम्राट्पद जिंकण्यासाठीं लागणारे सर्व गुण त्याच्या ठायीं होते. ज्या युधिष्ठिरानें सार्वभौम व्हावें अशी त्यांची इच्छा होती, त्यानें एका पायावर कृष्णाचें सार्वभौमत्व मान्य केलें असतें. असें असूनहि श्रीकृष्णानें तो अभिलाष कधीं धरला नाहीं. जरासंधाला मारून ८६ राजांना त्यानें बंधमुक्त केलें, त्या वेळीं अत्यंत कृतज्ञतापूर्वक त्यांनीं ' आम्हांस कांहीं सेवा सांगा ' असें विनविलें. त्या वेळीं, तुम्हीं सर्वांनीं युधिष्ठिरास साह्य करावें, अशी त्यानें त्यांना आज्ञा दिली आणि स्वतःला अर्पण केलेलीं रत्नेंहि त्यानें त्यांची दया येऊन मोठ्या कष्टानें स्वीकारलीं ( सभा. २४—३९ ). जरासंधाचें राज्यहि त्यानें खालसा केलें नाहीं; तें त्याच्या पुत्राला दिलें. श्रीकृष्णाची ही विशुद्ध बुद्धि त्याच्या प्रत्येक कृतींतून व्यक्त होते. कौरव—पांडवांचा समेट घडवावा म्हणून बोलणीं चाललीं असतांना ' धर्मराजाच्या आज्ञेबाहेर मला जातां येणार नाहीं ' असें इतरांना त्यानें अनेक वेळां निक्षून सांगितलें आहे. कर्णानें पांडवांकडे यावें म्हणून त्याचें मन वळवीत असतांनाहि ' तूं इंद्रप्रस्थाचा स्वामी झालास तर समस्त यादवांसह मी तुझा अनुयायी होईन ' असें भिवचन कृष्णानें त्यास दिलें होतें.

### एकांतिक पावित्र्य

श्रीकृष्णानें सार्वभौमपदाचा लोभ मनांतून काढून टाकला तो आपल्या जीवितकार्याचा विचार करून, त्या थोर ध्येयाला तो मारक होईल हें मनाशीं निश्चित ठरवूनच काढून टाकला असावा असें वाटतें. त्याला लोकांना कठोर व्यवहारनीतीचा उपदेश करावयाचा होता. समाजरक्षण हें त्याचें ध्येय होतें आणि या हेतूच्या सिद्धयर्थ कंटकांचें व दुष्कृतांचें निर्दाळण करणें अवश्य आहे हें त्यानें जाणलें होतें. दुष्कृतांचें निर्दाळण सत्याच्या व एकांतिक पावित्र्याच्या आश्रयानें कधींच होत नाहीं, ही मानवी इतिहासांतील दुःखद उणीव ध्यानांत आल्यामुळें, सत्याच्या व पावित्र्याच्या रक्षणासाटींच त्याना व्यवहारांत मुरड घालणें अवश्य आहे, तसें न केल्यास या अनीतिमय जगांत दुष्ट—चांडाळांचें वर्चस्व होऊन समाज रसातळाला जातो, प्रजा उत्सन्न होतात, हा त्याच्या बुद्धीचा निश्चय झाला होता. यामुळेंच ‘ कित्येक वेळां असत्य हें सत्यापेक्षां श्रेष्ठ असतें ’. ‘ या वेळीं धर्म सोडूनच लढणें अवश्य आहे ’. ‘ भीमसेन धर्मानें लढेल तर त्याला जय मिळणार नाहीं; अन्यायानें लढणें प्राप्त आहे ’. असा अनेकदां त्यानें उपदेश केला आहे. अशा वेळीं याला स्वतःला सार्वभौमपदाचा अभिलाष आहे अशी शंका जरी कोणाला आली असती तरी त्याच्या वाणीला कसलेंच यश आलें नसतें. पण असें प्रतिपादन तो करीत असतांहि साऱ्या भरतभूमींत त्याच्या लोकहितबुद्धीविषयीं कोणाला शंका आली नाहीं. ‘ जें लोकहिताला अनुकूल तेंच सत्य ’, ‘ जें प्राण्यांना उत्कर्षकारक तेंच धर्मपूत ’ हे त्याचे विचार स्वार्थमूलक नसून त्यामागे समाजाच्या हिताची पराकाष्ठेची तळमळ आहे, हीच प्रतीति भारतीय प्रजांना त्या काळीं येत होती आणि म्हणूनच प्रत्यक्ष सावभौम न होतांहि तो तत्कालीन भारताचा अनभिषिक्त सम्राट् झाला होता. त्याचें धर्मप्रवचन ऐकण्यास अखिल भरतभू त्या वेळीं उत्सुक असे. श्रीकृष्ण येणार ही वार्ता पसरतांच मैलोमैल रस्ता तुडवीत येऊन लोक रस्त्याच्या दुतर्फा उभे रहात. दूरदूरचीं अंतरें तोडून विद्वान् लोक त्याचें भाषण श्रवण करण्यास येत आणि तें ऐकण्यांतच स्वतःच्या जीविताची सफलता मानीत.

## वाणीचें शिल्प

आणि खरोखरच, भरतखंडाच्या इतिहासांत श्रीकृष्णाची एक थोर वक्ता म्हणून अग्रमालिकेंत गणना करावी लागेल. श्रीकृष्णाचें एकेक भाषण म्हणजे वाणीच्या शिल्पाचा एकेक नमुनाच असे. शिल्पकारानें एखादी घडीव मूर्ति आपल्यापुढें उभी केली आहे असे त्याच्या श्रोत्यांना वाटत असे. मीमासेंत उपक्रमोपसंहाराचें जें महत्त्व वर्णिलें आहे तें श्रीकृष्णाच्या भाषणाचा आदर्श पुढें ठेवूनच वर्णिले असेल, असें म्हणावयास हरकत नाहीं. कौरवसभेंत उभा रहाताच पहिल्याच वाक्यांत त्याने आपल्या आगमनाचा हेतु व विचाराचा व्याप स्पष्ट करून सांगितला. ‘ कौरव आणि पांडव यांचा साम व्हावा, युद्ध होऊं नये, वीरांचा प्राणनाश होऊं नये, अशी प्रार्थना करण्यासाठी मी आलों आहें ’. असे त्याचें पहिलें वाक्य आहे आणि शेवटीहि समारोप तसाच निःसंदिग्ध व सर्व भाषणाचा सारार्थरूप आहे. ‘ पांडव तुझी सेवा करावयास सिद्ध आहेत किंवा तुझ्याशीं युद्धहि करावयास तयार आहेत. हे धृतराष्ट्रा, यांतलें तुला काय रुचत असेल ते सांग.’ श्रीकृष्णाचीं महाभारतातील सर्वच भाषणें अशीं सुबद्ध, आंखीव व शिल्पयुक्त आहेत. स्वतः भारतकारांनीं त्याच्या वक्तृत्वाचें मोठें सुंदर वर्णन केलें आहे. ‘ श्रीकृष्णाचा स्वर मेघासारखा गंभीर होता. स्वराची उंची कमी न होतां तो एकसारखा बोलूं शकत असे. त्याचे वर्णोच्चार योग्य त्याच स्थानांतून होत. ते नेहमीं हेतुयुक्त, अर्थसंपन्न असून त्यांत गोंधळ कधीं नसे. ’( उद्योग. ९१–१७,१८ ). स्वतः तो एक महान् तत्त्ववेत्ता असल्यामुळे जगाला शाश्वत सत्यें सागण्याच्या भूमिकेंतूनच तो नेहमीं बोलत असे. दीर्घकाल चिंतन करून मनाशीं निश्चित केलेले सिद्धांत त्याच्या वाणीच्या ओघांतून मोठ्या प्रतिष्ठेनें बाहेर पडत आणि जग त्यांना शिरसावंद्य मानी. श्रीकृष्ण बोलूं लागला कीं शाश्वदर्थसंपन्न असे एखादें सुभाषित त्याच्या मुखांतून ऐकण्यास मिळणारच, अशी लोकांची खात्री असे. ‘ जो समर्थ असतो व जगाला वश करूं शकतो त्यालाच साम्राज्य प्राप्त होते ’. ‘ हे राजा, बालिश पुरुष परिणामाकडे लक्ष न देता एकाएकीं कार्याला हात घालतो, म्हणून अशा बालिश शत्रूंचा कोणी विचारहि करीत नाहीं ’. ‘ कर्माला अनुकूल अशा ज्या विद्या त्याच सफल होत असतात. कर्म

न करतां संन्यासच जो श्रेष्ठ मानतो त्या दुर्बल पुरुषाचें बरळणें व्यर्थ आहे '. अशा तऱ्हेचीं शाश्वत सत्यें श्रीकृष्णाच्या मुखांतून नित्य बाहेर पडत आणि त्यांच्यामागें दीर्घ चिंतन व विपुल अनुभव यांची पुण्याई उभी असल्यामुळें तीं आजहि जगाच्या आदराला पात्र झालेलीं आहेत.

उत्कट रागद्वेष

मानवी स्वभावाची घडण हा विधात्याचा एक चमत्कार आहे. अत्यंत भिन्न किंवा अगदीं परस्परविरोधी असेहि गुण मानवाच्या ठायीं अविरोधानें नांदूं शकतात; इतकेंच नव्हे तर केव्हां केव्हां परस्परांना पोषक होतात हें पाहून मोठा विस्मय वाटतो. श्रीकृष्णाचें चरित्र पहातां असें दिसतें, कीं विवेक, व्यवहारदृष्टि, स्थिर प्रज्ञा हाच त्याच्या प्रकृतीचा स्थायीभाव होता. अशा या पुरुषाचे व्यक्तिगत जीवनांतले रागद्वेष अत्यंत तीव्र होते हें पाहून मन विस्मयानें व आनंदानें भरून जातें. विचारशील मनुष्य सहसा विकारांच्या अधीन होत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याचे विकार फारसे उत्कट रूपहि धारण करीत नाहींत. त्याच्या विकारांच्या धारा बऱ्याच बोथट झालेल्या असतात आणि त्याचें विकाराचें बोलणेंहि सौम्य, समतोल व समन्वयी असें असतें. श्रीकृष्ण याला अपवाद होता. त्याच्या बोलण्याला बहुतेक वेळा अगदीं जहरी अशी धार असे व त्यांतील अर्थ भेदक, मर्मघातक आणि प्रेम किंवा द्वेष अगदीं एकांतिकपणें व्यक्त करणारा असा असे. हस्तिनापूरला गेला असतांना दुर्योधनानें श्रीकृष्णाला भोजनाचें आमंत्रण दिलें. प्रथम साधें कारण सांगून त्याने नकार दिला; पण दुर्योधनानें पुन्हा आग्रह करतांच श्रीकृष्णानें ताडकन् उत्तर दिलें, ' अरे, दुसऱ्याच्या घरीं जेवावयास जातात तें प्रेम असलें तर किंवा आपल्या घरीं अन्न मिळत नसलें तर जातात. येथें तुझ्यामाझ्यांत प्रेम नाहीं आणि मी अन्नाला अजून महाग झालेला नाहीं. ' श्रीकृष्ण कौरवांकडे जाऊन समेट करील व आपल्या अपमानाचा सूड घेतला जाणार नाहीं अशी द्रौपदीला भीति वाटली व अत्यंत संतापून जाऊन तिनें कृष्णाचीहि निर्भर्त्सना केली. त्यावेळीं श्रीकृष्णानें तिला

सांगितलें, 'कृष्णे, भिऊं नको. कौरवस्त्रिया विधवा होऊन रडत असलेल्या लवकरच तुझ्या दृष्टीस पडतील. कालपक्व असे धार्तराष्ट्र जर माझें म्हणणें ऐकणार नाहींत तर रणांगणांत मरून पडतील आणि त्यांचीं प्रेतें कोल्हीं-कुत्रीं खातील याविषयीं शंका बाळगूं नको. हिमालयसुद्धां एकादे वेळीं चलित होईल, पण माझें बोलणें निष्फल होणार नाहीं.' आपल्या प्रिय भगिनीवरचें गाढ प्रेम आणि कौरवांबद्दलचा तितकाच तीव्र द्वेष या भाषणां-तून कमालीच्या उत्कटतेनें व्यक्त होतो. रागद्वेषाची ही उत्कटता हें श्री-कृष्णाच्या लोकोत्तर सामर्थ्याचें एक रहस्य होतें. तो ज्यांना जवळ करी त्यांच्यासाठीं प्राणहि वेचण्यास तो सदा सिद्ध असे, आणि ज्यांचा तो द्वेष करी त्यांचें निर्दाळण करून टाकावें हीच त्याची वृत्ति असे. 'न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।' हें वचन त्याच्या स्वभावाला मुळींच लागू पडणार नाहीं. एकंदर मानवी व्यवहारात उत्कट रागद्वेष याच प्रबल अशा प्रेरणा असतात. या प्रेरणांनीं श्रीकृष्णाचें मन पूर्ण संपन्न होतें असें त्याच्या अनेक प्रसंगींच्या उद्गारांवरून दिसतें.

## देव नव्हे—मानव

या त्याच्या तीव्र प्रवृत्तींवरूनच श्रीकृष्ण हा कोणी देवकोटींतला पुरुष नसून मानवी गुणांनीं नटलेला, मानवी भावनांनीं संपन्न असलेला, मानवी मर्यादांतच राहाणारा, तुमच्याआमच्यासारखाच विकारविचारांच्या आहारीं असलेला, पण या सामान्यांतच असामान्य उंचीला व लोकविलक्षण पदवीला गेलेला असा पुरुष होता, हे स्पष्टपणें ध्यानांत येतें. मध्यंतरीच्या काळांत त्याला परमेश्वररूप आणलें गेल्यामुळें त्याच्या जीवनांतील हें वैशिष्ट्य दुर्लक्षिलें गेलें होतें. पण महामति वेदव्यासांनीं या पुरुषाचें चरित्र वर्णितांना असें दुर्लक्ष केलेलें नाहीं हें आपलें भाग्य होय. महाभारतांतला श्रीकृष्ण हा या अपूर्ण जगतांतील अपूर्ण असाच मानव होता, याविषयीं शंका घेण्यास व्यासांनीं जागा ठेवलेली नाहीं. जरासंधाविषयीं बोलतांना, 'सतत तीनशें वर्षे याच्याशीं झुंजत राहिलों तरी त्याचा पराभव करण्यास आपण समर्थ होणार नाहीं हें आम्हीं जाणलें व त्याच्या भयामुळें ज्ञातिबांधवांसह आम्ही मथुरेंतून

पळून जाऊन द्वारका नगरींत राहिलों. ' असें श्रीकृष्णाने प्रांजलपणें युधिष्ठिरास सांगून टाकलें. युद्धाचे प्रयत्न सुरू झाले त्या वेळीं कृष्णाने अनेक प्रसंगीं जे उद्‌गार काढले त्यांवरून अतिमानुष शक्ति गृहीत धरून हा बोलत आहे अशी शंकासुद्धां येत नाहीं. ' हा घोर अनर्थ ओढवला आहे. याचा परिणाम काय होईल, यशस्वी कोण होईल हें कांहीं सांगतां येत नाहीं. मानवाला जेवढें शक्य आहे तेवढें मी करीन, परंतु प्राक्तन मला हाणून पाडतां येणार नाहीं. ' असे श्रीकृष्णाचे उद्‌गार आहेत. अर्जुनानें जयद्रथवधाची प्रतिज्ञा केलेली कळतांच श्रीकृष्ण अत्यंत चिताक्रांत झाला. ' अर्जुना, तूं हा मोठा अविचार केलास. आमचा सल्ला न घेतां तूं हें करावयास नको होतेंस. अरे, उद्यां संध्याकाळच्या आंत जयद्रथाचा वध करणें किती अशक्य आहे याची तुला कल्पना नाहीं. ' असें कृष्ण म्हणाला, आणि त्या रात्रीं श्रीकृष्णाला या काळजीमुळें झोंप आली नाहीं. या व अशा तऱ्हेच्या अनेक प्रसंगावरून श्रीकृष्णाचें चरित्र पूर्णपणें मानवकोटींत येऊन पडतें आणि त्यामुळें त्या दिव्य व अलौकिक चरित्राचें वैभव शतगुणित होतें.

महाभारत हें या भरतभूमींचें वैभव आहे; आणि भगवान् श्रीकृष्ण हें त्या महाभारताचें वैभव आहे. महाभारताच्या सुवर्णकोंदणांत बसविलेला हा कौस्तुभ आज हजारों वर्षांनंतरहि आपल्या भास्वर दीप्तीनें व अव्यय तेजानें जगाला धवळून टाकीत आहे. जगामधल्या अनेक देशांतील इतिहासपूर्व काळांतील वाङ्मय आज उपलब्ध झालें आहे. त्यापैकीं कोणच्याहि ग्रंथात असलें दिव्य चरित्र आपणास पहावयास सापडत नाहीं. मानवी व्यवहाराचें सूक्ष्म आकलन, धर्माधर्माचा निश्चय करणारी परिणत प्रज्ञा, अधिकारवाणीनें त्या धर्माचें प्रवचन करण्याइतकी चारित्र्याची उची, लोकसंग्रहाची तळमळ, अमोघ वाणी, इतके सर्व गुण त्या मागल्या काळांत एकवटलेले पाहून मन विस्मित होऊन जातें, आणि मानवजातीच्या इतिहासांत क्वचित् जमून येणारा हा योग भरतभूमीच्या भाग्यांत लिहिला गेला या जाणिवेने आजच्या पडत्या काळांतहि मस्तक उन्नत होतें.

---

फेब्रुवारी १९५२

# ७. विश्वाविरुद्ध

## एक नवी शक्ति

इ. स. पूर्व ३९९ या सालच्या एका दिवशीं अथेन्स नगरीच्या लोकसभेंत जगाचा इतिहास घडविला जात होता. मानवी संस्कृतीची तोंपर्यंत प्रगति चालू होतीच; पण त्या दिवशीं त्या लोकसभेत ही प्रगति अत्यंत वेगानें चालविणारी शक्ति निर्माण होत होती. विवेकनिष्ठा हें त्या शक्तीचें नांव. सर्व विश्व आपल्या विरुद्ध असलें तरी आपल्या विवेकाच्या बळावर त्या विश्वाचा मुळींच मुलाहिजा न करतां, आपलें मत आग्रहानें प्रतिपादन करण्याचें व त्यासाठीं देहदंड सोसण्याचें मन:सामर्थ्य जगाच्या संसाराच्या इतिहासांत मानव त्या दिवशीं प्रथमच प्रगट करीत होता. अथेन्समधील लोकसभेच्या नेत्यानीं सॉक्रेटिसावर अभियोग चालविला होता. अखिल राष्ट्राला मान्य असलेल्या देवता हा मानीत नाहीं व रूढ नीतीपासून तरुणांना च्युत करतो, वाममार्गाला नेतो असे त्याच्यावर आरोप होते. वास्तविक सॉक्रेटीस ग्रीक देवता मानीत नव्हता असें नाहीं; पण प्रत्येकानें आपल्या विवेकबुद्धीच्या निकषावर कोणतेंही तत्त्व—देवाचें अस्तित्वसुद्धां—पारखून पहावें असें तो सांगत असे. एखादी गोष्ट देवांना प्रिय आहे म्हणून ती शुभ व आदरणीय ठरत नसून ती गोष्ट शुभ व आदरणीय आहे म्हणून ती देवाना प्रिय होते असें, काहींसें उपयुक्तता-वादासारखें प्रतिपादन तो करीत असे. ज्ञान हा अत्यंत मोठा सद्‌गुण व अज्ञान हा अत्यंत घातुक दुर्गुण होय हा विचार तो आपल्या शिष्यांना शिकवी. नीतीच्याहि बाबतींत हेंच होतें. रूढ नीतिनियम पाळूं नयेत असें तो कधींच म्हणाला नाहीं; पण नीतिकल्पनांना अतींद्रिय, गूढ, दैवी शक्तींचा म्हणजे देवाच्या वचनांचा आधार अवश्य नाहीं, ऐतिहासिक व समाजिक अनुभवांवरून नीतिनियम ठरवावे असा त्याचा आग्रह होता. अर्थातच व्यक्तीचा विवेक हें नीतीचें अधिष्ठान ठरलें. आतां या प्रतिपादनांत नीति व देव यांविषयीच्या रूढ कल्पनांवर प्रत्यक्ष हल्ला केला नसला तरी त्याचा परिणाम तोच झाला. कारण बुद्धीचा निकष लावल्या-

बरोबर प्रस्थापित नीतितत्त्वांवरील तरुणांची श्रद्धा ढळणें अपरिहार्य होतें. त्याचप्रमाणें विवेकाचा नेत्र उघडतांच ग्रीक देवतांविषयींची भाविक, भोळी श्रद्धा जशीच्या तशी टिकून राहणें शक्य नव्हतें. सनातनी लोकांच्या मतें याचाच अर्थ तरुणांना बिघडविणें व पाखंड माजविणें असा होत होता, व यासाठींच त्यांनीं सॉक्रेटिसला न्यायासनापुढें खेचलें होतें. अनिटस, मेलिटस, लिकॉन प्रभृति लोकसभेच्या नेत्यांनीं यांत पुढाकार घेतला होता. त्यांना व इतर सभासदांना उद्देशून विवेकवादाचा, बुद्धिनिष्ठेचा हा आद्यप्रणेता म्हणाला—

"माझ्या अथेन्सकर मित्रानो ! मागें अँफिपोलिसच्या व डेलियमच्या रणांगणावर मी सैनिक म्हणून लढत असताना आपल्या सेनापतींनीं मला एका जागीं ठांसून उभें राहण्यास सांगितलें होतें. त्या वेळीं मृत्यु समोर दिसत असूनहि ती आज्ञा मीं धैर्यानें पाळली; जागचा हाललों नाहीं. आज तर माझ्या विवेकाला परमेश्वराची आज्ञा झालेली आहे. 'स्वतःच्या व इतरांच्या अंतरात्म्यांचें संशोधन करण्याचें तत्त्ववेत्त्याचें कार्य तूं कर,' अशी ती आज्ञा आहे. ही आज्ञा मीं त्याच निष्ठेनें पाळली नाहीं तर तें फारच विचित्र होईल. आज तुम्ही एखादे वेळीं म्हणाल कीं, 'सॉक्रेटिस, एक वेळ आम्ही तुझी गय करतो; पण तूं पुन्हां मात्र असली बौद्धिक चिकित्सा व संशोधन करतां कामा नये.' असें तुम्ही म्हणालात तर त्यावर माझें उत्तर असें आहे : अथीनी मित्रांनो, माझा तुमच्यावर लोभ आहे, प्रेम आहे; पण तुमच्यापेक्षां मी माझ्या चित्तांत स्फुरणारी परमेश्वराची आज्ञाच जास्त मानीन. आणि जोपर्यंत जिवांत जीव आहे व वाचेंत बळ आहे तोंपर्यंत लोकांना माझें तत्त्वज्ञान शिकविण्यापासून कधींहि परावृत्त होणार नाहीं. तेव्हां मला मुक्त करा वा न करा; पण येवढें ध्यानांत ठेवा कीं, तुम्ही कोणताहि निर्णय घेतला तरी मी माझा मार्ग सोडणार नाहीं. मग शंभर वेळां मृत्यु पतकरावा लागला तरी चिंता नाहीं."

साक्रेटिसानें विवेकनिष्ठेसाठीं, स्वतःच्या मतासाठीं मृत्यु पतकरला या गोष्टीमुळें जगाच्या इतिहासाचा प्रवाह बदलून गेला.

## तिचें वैशिष्ट्य

सॉक्रेटिसाच्या या आत्मबलिदानाचा विशिष्ट अर्थ आपण समजून घेणें अवश्य आहे. धर्मासाठीं, स्वजनांसाठीं, स्वामीसाठीं उदात्त भावनेनें आत्मबलिदान करणारे लोक सॉक्रेटिसाच्या आधींहि अनेक होऊन गेले असतील; पुढच्या इतिहासांत तर निश्चित होऊन गेले आहेत. पण त्या सर्वांहून हें बलिदान निराळें आहे. सॉक्रेटिसानें निर्माण केलेली व रॉजर बेकन, जॉन हस, लूथर, ब्रूनो यांनीं पुढें चालविलेली परंपरा त्या परंपरांहून अगदीं निराळी आहे. धर्मासाठीं किंवा स्वामीसाठीं ज्यांनीं ज्यांनीं प्राण दिले त्यांच्यामागे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें—प्रत्यक्ष देहानें नसतील तर मनानें व सहानुभूतीनें,—हजारों लोक उभे होते. त्या त्या व्यक्तींचा समाज किंवा त्यांच्या पक्षाचे लोक यांचा त्यांना बहुधा पाठिंबा असतो. त्यांचे त्यांना धन्यवाद मिळतात. तेथें शत्रूकडून जो आघात होतो तो या सर्व समाजावर होत असतो. त्याचा प्रतिकार सर्वांनाच करावयाचा असतो. आणि कृतीनें नव्हे तरी निदान मनानें त्या व्यक्तींचे स्वजन त्याच्या कृत्यांत सहभागी असतात. सॉक्रेटिस हा सर्व समाजाविरुद्ध एकटा उभा होता. स्वजनांच्या विरुद्धच त्याचा लढा होता. त्याच्या बाजूला फक्त त्याची विवेकशक्ति होती. त्याला पाठिंबा असलाच तर तो फक्त चारदोन मित्रांचा; त्याच्या समाजाचा नव्हे. श्रीबंदावीर किंवा श्रीछत्रपति संभाजी यांनीं धर्मासाठीं मृत्यु पतकरला त्या वेळीं अखिल शीख समाज व मराठा समाज या पुरुषांच्या मागें मनानें उभा होता. मुरारबाजी, बाजी प्रभु, तान्हाजी यांनीं आत्मबलिदान केलें तेव्हां तर समाज त्यांच्यामागें प्रत्यक्षच उभा होता. म्हणजे ते लढे एक समाज विरुद्ध दुसरा समाज असे होते. सॉक्रेटिसाचा लढा एक व्यक्ति विरुद्ध सर्व समाज असा होता. ते लढे प्रस्थापित झालेल्या, मान्यता पावलेल्या

तत्त्वांसाठीं होते; हा लढा कोणाला मान्य नसलेल्या, सर्वस्वी नवीन व म्हणूनच पाखंडी गणलेल्या अशा तत्त्वासाठीं होता. त्या लढ्यांत आत्मबलिदान करणाऱ्या वीरांच्या मागें स्वसमाजाची शक्ति उभी होती. या लढ्यांत या व्यक्तींच्या साह्याला फक्त त्याच्या विवेकनिष्ठेची शक्ति होती. एक व्यक्ति विरुद्ध विश्व असा हा लढा होता. त्याची अपूर्वता ही आहे.

टिळक आणि आगरकर यांची तुलना केली म्हणजे ही अपूर्वता नीट ध्यानांत येईल. टिळकांनीं सर्व जन्म ब्रिटिश साम्राज्याशीं लढा करण्यांत वेंचला. त्या लढ्याचें स्वरूप अत्यंत उग्र व भयावह असेच होतें. टिळकांना त्यांत यातनाहि अपरिमित सोसाव्या लागल्या. पण हा संग्राम चालू असताना आरंभापासूनच टिळकांचे स्वजन—महाराष्ट्रीय जनता—त्यांच्या पाठीशीं उभे होते. पुढे पुढें तर अखिल भरतभूमि त्याना आशीर्वाद देत होती. आगरकराचा लढा याहून अगदीं निराळा होता. त्यांना स्वजनांशींच संग्राम करावयाचा होता. त्याच्यामागें कोणीहि उभें नव्हतें. त्यांना साह्य फक्त त्यांच्या विवेकदेवतेचें होतें. व्यक्ति विरुद्ध अखिल समाज असा तो लढा होता. ब्रिटिश साम्राज्य नष्ट व्हावें अशी इच्छा करणारे हजारों, लाखों लोक टिळकांच्या मागें उभे होते; मनूचें साम्राज्य नष्ट व्हावें या गोष्टीला कोणाचाच पाठिंबा नव्हता. ती कल्पनाच लोकांना असह्य होती. तिला फक्त आगरकराचा, त्यांच्या विवेकाचा पाठिंबा होता. त्यांच्या संग्रामांतील अपूर्वता ती हीच होय.

## मार्टिन लूथर

या लढ्यातला एकाकीपणा फार भयानक असतो. मनुष्य त्यानेच हैराण होऊन जातो. मार्टिन लूथरवर पोपनें बहिष्कार घातला त्या वेळीं त्याच्या मनाची अवस्था कशी झाली त्याचें वर्णन त्याच्या चरित्रकारानें केलें आहे. सर्व जगांत आपण एकटेच आहोंत या विचारानें क्षणभर तो हादरून गेला. सर्वत्र अंधार, भयाण शून्यता ! लूथरनें स्वतःच आपल्या मनाच्या दारुण व्यग्रतेचें वर्णन केलें आहे: “ प्रत्यक्ष परमेश्वराची वाणी, बायबल माझ्या

बाजूस होतें तरी पोपच्या विरुद्ध उभें रहातांना माझ्या मनाला किती यातना झाल्या. किती वेळां तरी तो भयंकर प्रश्न मीं माझ्या मनाला विचारला ! जगांत तूंच एकटा शहाणा आहेस काय ? बाकी सर्व लोक इतके मूढ असतील ? शतकानुशतकांची ही परंपरा — ही सर्व चुकलेली असणें शक्य आहे ? आणि शेवटीं तुझेंच मत चुकीचे होतें असें ठरलें तर ? पोपच्या बाजूला कोणती सेना आहे ? विद्वत्ता, प्रतिभा, प्रतिष्ठा, सत्ता, पावित्र्य, चमत्कारसामर्थ्य, राजवैभव, बहुसंख्य जनता, शतकांची पुण्याई, थोर हुतात्म्यांचा आशीर्वाद, सर्व धर्ममहामंडळें, सर्व धर्मगुरु आणि रोमचें पीठ !–आणि माझ्या बाजूला ? वायक्लिफ, लोरेंझोव्हॅला यांचीं पुस्तकें आणि चारदोन मित्र. असा हा संग्राम आहे. ''

असें असूनहि लूथरनें तें बहिष्कारपत्र अग्नींत फेंकून दिलें. लूथरचा चरित्रकार म्हणतो, ' आपण एकाकी आहोत हें जाणूनहि ज्याचें धैर्य खचत नाहीं, अशा स्थितींतहि जो स्वतःला समर्थ मानतो तो खरा धैर्यशील पुरुष होय. '

आपल्या मतासाठीं मृत्यु पतकरावयाचा ही संस्कृति सॉक्रेटिसाने प्रथम जगांत आणली. त्यानें ही गोष्ट जाणूनबुजून, बुद्धिपुरःसर केली होती. शिक्षा झाल्यावर त्याला कांहीं दिवस तुरुंगांत ठेविलें होतें. तेथून त्याला सहज पळून जातां आलें असतें. प्लेटोनें त्याची सर्व व्यवस्था केली होती. अधिकाऱ्यांचीहि त्यानें पळून जावें अशीच इच्छा होती. कारण त्यांना त्याच्या देहान्त शासनाची अंमलबजावणी करण्याची जरा भीतीच वाटत होती. म्हणून अप्रत्यक्ष रीतीनें मदत करण्यास तेहि तयार होते; पण सॉक्रेटिसानें तें साफ नाकारलें. तो म्हणाला, ' आतां मी येथून जाईन तो अशाच प्रदेशांत कीं जेथें मतासाठीं देहदंड सोसावा लागत नाहीं. '.

### स्वतंत्र चिंतन

सॉक्रेटिसाची ही परंपरा मध्यंतरीं कांहीं शतकें लुप्त झाली होती. आणि ही विवेकनिष्ठा लुप्त होती तोंपर्यंत युरोपची सर्व प्रगतिहि कुंठित होऊन बसली

होती. जगाच्या पाठीवरील प्रत्येक देशाच्या इतिहासावरून हें स्पष्ट दाखवितां येईल कीं, स्वतंत्र चिंतनाला, अवलोकनाला, अनुभूतीला व अनुभूतींतून प्राप्त झालेल्या ज्ञानाच्या प्रसाराला जितका, ज्या प्रमाणांत व ज्या क्षेत्रांत अवसर मिळतो तितका, त्या प्रमाणांत व त्या क्षेत्रात समाजाचा उत्कर्ष होतो. हें स्वतंत्र चिंतन व संशोधन जेथें, कोणत्याहि कारणानें का होईना, मुळींच होत नाहीं तो समाज रानटी, पाशवी स्थितीला गेलेला असतो. चवथ्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत युरोपची हीच स्थिति होती. अशा स्थितींत ज्या देशांत कोणी सॉक्रेटिस निर्माण झाला नाहीं ते देश परवांपरवांपर्यंत दास्य, विटंबना, दारिद्र्य या कर्दमांत लोळत पडले होते. इंग्लंडचें भाग्य असें कीं, तमोयुगानंतरचा पहिला सॉक्रेटिस–बुद्धिनिष्ठेपायीं आत्मबलिदान करणारा पुरुष–त्या भूमींत निर्माण झाला. त्याचें नांव रॉजर बेकन. ( १२१४–१२९४ ) ऑक्सफर्ड येथें विद्यार्थी असतांनाच आपल्या गुरुजींची अंधश्रद्धा त्याला पटेना. त्या लहान वयांतच, ॲरिस्टॉटलचें वचन, त्याचे सिद्धान्त स्वत: प्रयोग करून पाहिल्याशिवाय मी मानणार नाहीं, असा पीळ त्याच्या मनांत निर्माण झाला. पुढें पॅरिसच्या विद्यापीठांत प्राध्यापक झाल्यावर तो आपले विचार उघडपणें बोलून दाखवूं लागला, तेव्हां धर्मपीठांचे अधिकारी त्याच्याकडे रोंखून बघूं लागले. स्वतः प्रयोग करणें, आपल्या बुद्धीचा वापर करणें हें त्यांना महापातक वाटत असे, आणि त्या कार्यासाठींच रॉजर बेकनचा अवतार होता. आतां त्याचे जे ग्रंथ उपलब्ध झाले आहेत, त्यांवरून बंदुकीची दारू, दुर्बिण, वाफेचें यंत्र यांचा त्यानें त्याच वेळीं शोध लावला होता असें दिसतें; पण त्या काळीं त्याचे ग्रंथ कोणी वाचण्यासहि तयार नसल्यामुळें आणि पुढें चारपांचशें वर्षें ते रोमच्या धर्ममंदिरांतील कपाटांत धूळ खात पडल्यामुळें त्याच्या या प्रचंड संशोधनाची लोकांना कल्पनाहि आली नाहीं. त्याच्या समकालीनांनीं एवढेंच जाणलें कीं, हा पाखंडी आहे; इतकेंच नव्हे तर चेटक्याहि आहे. विज्ञानसंशोधनाला प्रारंभींच्या काळीं धर्मपीठाचा व सामान्य जनांचाहि कडवा विरोध असण्याचें कारण असें कीं, विज्ञानांतून कांहींशी

अतिमानुष शक्ति निर्माण होत असे, आणि अतिमानुष शक्ति ही परमेश्वर किंवा भूत ( सैतान ) या दोघांच्या ठायींच असते अशी त्या काळीं श्रद्धा होती. त्यामुळें प्रारंभींच्या शास्त्रज्ञांकडे लोक 'सैतानाचे दूत' अशा दृष्टीनें पहात आणि त्यांना चेटके ठरवून जिवंत जाळीत. रॉजर बेकन स्वत: फ्रान्सिस्कन पंथाचा धर्मगुरुच असल्यामुळें तो अग्निमुखांतून सुटला इतकेंच; पण आजन्म तुरुंगवास मात्र त्याच्या कपाळींचा टळला नाहीं. 'सत्यज्ञान हें वेदवचनांवरून मिळत नाहीं व अंधश्रद्धेनेंहि तें प्राप्त होत नाहीं; तें फक्त बुद्धि, स्वानुभव, चिंतन, प्रयोग यांनींच प्राप्त होतें.' असें तो सांगत राहिल्यामुळें त्याच्या पंथाच्या आचार्यांनींच त्याला तुरुंगांत डांबून टाकलें. जगाला ज्ञानकिरणांनीं उजळून टाकणाऱ्या या महाभागाच्या आयुष्याचीं चोवीस वर्षें अंधारकोठडींत गेलीं; तेथेंच शेवटीं त्याचा अंत झाला. मरतांना त्यानें आपल्या शिष्यांना पुढील संदेश दिला: 'स्वतंत्र संशोधनाच्या मानवाच्या हक्कासाठीं मी आत्मबलिदान करीत आहें. येथून पुढें मानवजाति याच तत्त्वान्वयें आपलें वर्तन ठेवील अशी मला आशा आहे. प्रयोग करून पहाणें, ते करीत असतांना प्रमाद करण्यासहि अवसर असणें, पुन्हा प्रयोग करणें, पडताळा पहाणें याची संधि प्रत्येकाला मिळाली पाहिजे, हें शास्त्रज्ञांचें ब्रीदवाक्य आहे. आपण शतकानुशतकें याच मार्गानें जाऊं या. अर्थव्यवस्था, राज्यपद्धति, समाजरचना, दण्डनीति या सर्व बाबतींत आपण सारखे प्रयोग, पुन्हा प्रयोग याच धोरणाचा अवलंब करूं. म्हणजे शेवटीं यांतूनच मानवाला उत्कर्षाचा मार्ग सांपडेल.'

'मानवजाति याच तत्त्वान्वयें आपलें वर्तन ठेवील,' हा रॉजर बेकन याचा आशावाद जगांतील इतर देशांच्या बाबतींत जरी फारसा खरा ठरला नाहीं तरी त्याच्या मायदेशांतील मानवजातीनें तो पुरेपूर प्रत्यक्षांत आणला. त्याच्या मृत्यूनंतर थोड्याच वर्षांनीं जॉन वायक्लिक ( १३२४—१३८४ ) याचा जन्म झाला व त्यानें बेकनचें असिधाराव्रत पुढें चालविलें. ख्रिस्ती धर्मांतील कर्मकांडावर त्यानें चरचरीत टीका केली, बायबलचें इंग्रजींत भाषांतर करून तें सर्वांना सुलभ करून दिलें आणि विशेष म्हणजे पोपच्या अंतिम

सत्तेवर आक्षेप घेतला. धर्मपीठानें संपत्तिपासून अलिप्त रहावें, मिळकती करूं नयेत असें सांगून राष्ट्रीय धनाचा वांटा सर्वांना सारखा मिळावा अशीं कांहींशीं समाजवादी मतें त्यानें प्रतिपादिलीं. अर्थात् धर्माचार्यांना हें मानवण्याजोगें नव्हतें. त्या काळांत धर्माचार्यांच्यापुढें राजे, लोकहि चळचळा कांपत असत. अशा त्या आचार्यांनीं वायक्लिफला धर्मपीठापुढें खेंचलें. त्या वेळीं त्याला अग्निप्रवेशाचीच शिक्षा व्हावयाची, पण जॉन ऑफ गॉंट हा राजघराण्यांतील पुरुष त्याच्याच मताचा होता व वायक्लिफला त्याचा पाठिंबा होता म्हणून तो वांचला. पण त्या दोघांच्या मागून, वायक्लिफचा जो लोलर्ड पंथ त्या पंथाच्या अनुयायांचें धर्माधिकाऱ्यांनीं सत्र सुरू केलें आणि शेंकडों लोक चितेवर ठेवून जाळून मारले. या सर्वांनीं आपली विवेकनिष्ठा न सोडतां आनंदानें चितारोहण केलें. जॉन बॅडबी याला याच प्रकारें देहान्त शासन झालें. देह जळूं लागतांच यातना असह्य होऊन तो ओरडूं लागला तेव्हां याला पश्चात्ताप झाला आहे, असें समजून आचार्यांनीं त्याला बाहेर काढलें; पण तशाहि स्थितींत त्या बहाद्दरानें आपल्या मताचा आग्रह सोडला नाहीं, व तसाच तो पुन्हा चितेंत शिरला. इंग्लंडला पुढें जें वैभव प्राप्त झालें त्याच्या मागें व्यक्तिस्वातंत्र्याची ही पुण्याई सतत उभी होती.

### तिच्या अभावीं

चवदा, पंधरा व सोळा हीं शतकें म्हणजे पश्चिम-यूरोपच्या इतिहासांतील ग्रीक विद्येच्या पुनरुज्जीवनाचा काळ होय. त्या काळाचे व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिनिष्ठा, विवेकनिष्ठा हें मुख्य लक्षण होतें. इंग्लंडनें त्या निष्ठेची जेवढ्या अनन्यभावानें उपासना केली तेवढ्या अनन्यतेनें इतर कोणत्याहि देशानें केली नाहीं. फ्रान्स, जर्मनी, हॉलंड, इटली, स्पेन, पोलंड या प्रत्येक देशांत उज्जीवनाची लाट उसळली होती हें खरें; पण या प्रत्येक देशांत कांहींना-कांहीं कारणामुळें—आणि मुख्य म्हणजे लोकांनीं अनन्यभक्ति न दर्शविल्या-मुळें, या लाटा मंदावल्या आणि इटली, स्पेन व पोलंड या देशांत तर त्या अगदीं विरून नाहींशा झाल्या. त्यामुळें तें देश पुढें तीन-चारशें वर्षें कर्द-

मांतच रुतून बसले असें इतिहास सांगतो. सर्बिया, बोन्सिया इ. आजचे युगोस्लाव्हियांतील देश, आणि बल्गेरिया, रुमानिया, ऑस्ट्रिया, हंगेरी, ग्रीस आणि रशिया येथें उज्जीवनाच्या लाटा पोंचल्याच नव्हत्या. अर्थात् त्यांचें डोकें अल्पकाळहि कर्दमांतून वर निघालें नाही. विवेकनिष्ठा—विवेकासाठीं आत्मबलिदान करण्याइतकी उत्कट निष्ठा—ही समाजाच्या उन्नतीस अत्यंत अवश्य असलेली अशी प्रेरक शक्ति आहे. ती निष्ठा जेथें नाहीं, सर्व विश्वाविरुद्ध एकट्यानें उभे राहण्याचें सामर्थ्य ज्या समाजांतील व्यक्तींच्या ठायीं नाहीं, तो समाज पशुतेच्या वर येत नाहीं आणि एकदां आला असला तरी पुढे ही निष्ठा जर मंदावली तर तो पुन्हा अधोगामी होऊं लागतो.

**पश्चिम व पूर्व युरोप**

'अॅनॅलस् ऑफ युरोपियन सिव्हिलिझेशन' या नावाचा एक ग्रंथ अल्फ्रेड मेयर या पंडितानें तयार केला आहे. त्यांत त्यानें १५०१ ते १९०० या चार शतकांतील संस्कृतीच्या प्रगतीची सनावलि दिली आहे. १५०१ हें साल घ्यावयाचें व युरोपांतील इंग्लंड, फ्रांस, बेल्जम, हॉलंड, स्विडन, जर्मनी, इटली, स्पेन, पोलंड, हंगेरी, झेकोस्लोव्हाकिया, बल्गेरिया, रुमानिया, ऑस्ट्रिया, ग्रीस, रशिया या देशांत त्या सालीं काव्य, नाटक, कादंबरी, चित्रकला, शिल्पकला, संगीत, रसायन, पदार्थविज्ञान, ज्योतिष, गणित, अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान या मानवी संस्कृतीच्या प्रत्येक क्षेत्रात कोणता ग्रंथ वा कलाकृति निर्माण झाली हें क्रमानें सांगावयाचें, अशी त्याची पद्धत आहे. असा चारशें वर्षांचा प्रत्येक देशांतील संस्कृतीचा इतिहास त्यानें दिला आहे. साहित्य, कला, विज्ञान व तत्त्वज्ञान हीच मानवाची संस्कृति आणि ही संस्कृति हेंच मानवत्वाचें लक्षण हें ज्यांना मान्य आहे त्यांना विवेकनिष्ठा व ही संस्कृति यांचा अविभाज्य संबंध कसा आहे, हें वरील इतिहासावरून अगदीं सहज समजून येईल. साधारणपणें पहिल्या तीनशें वर्षांत पूर्व-युरोपांतील देशांत म्हणजे ऑस्ट्रिया, हंगेरी, रुमानिया, बल्गेरिया, युगोस्लाव्हिया,

रशिया या देशांत संस्कृतीच्या एकाहि क्षेत्रांत एकहि ग्रंथ वा कलाकृति निर्माण झालेली नाहीं. या तीन शतकांत या देशांचीं नांवें या इतिहासांत येतच नाहींत. पोलंड, स्पेन, इटली हे देश आरंभीं अग्रमालिकेंत दिसतात व तें योग्यच आहे. कारण बुद्धिस्वातंत्र्याचा आग्रह धरणारी उज्जीवनाची चळवळ प्रथम इटलींतच सुरू झाली होती. पोलंडमध्येंहि विद्येचें पुनरुज्जीवन वेगानें होत होतें आणि स्पेनमध्येंहि आरंभीं हें वारें पोंचलें होतें; पण पुढें तेथील मदांध सत्ताधीशांनीं अंध धर्मश्रद्धेचें वातावरण अट्टाहासानें निर्माण केल्यामुळें आणि तें भेदून टाकण्यासाठीं आत्मबलिदान करणारे पुरुष त्या भूमींत निर्माण न झाल्यामुळें हे देश संस्कृतीच्या इतिहासांत दिसेनासे होतात. १८५० नंतर पुन्हा त्यांचें ओझरतें दर्शन होऊं लागतें. या वेळीं पूर्व-युरोपातील देशहि संस्कृतीच्या क्षितिजावर थोडे येऊं लागतात. आणि याचें कारण हेंच कीं, तेथेंहि आतां स्वतंत्र चिंतन, व्यक्तिस्वातंत्र्य, त्यासाठीं आत्मार्पण ही वृत्ति प्रभावी होऊं लागली होती. पश्चिम-युरोपातील देश मात्र आरंभापासून सारखे आपल्या डोळ्यापुढें उभेच आहेत.

### सत्य जळत नाहीं

पश्चिम-युरोपातील इंग्लंडखेरीज इतर देशांत विवेकाची उपासना इंग्लंड-इतक्या निष्ठेनें झाली नाहीं तरी, तेथें सॉक्रेटिस, रॉजर बेकन, वायक्लिफ यांची परंपरा चालविणारे थोर पुरुष मुळींच निर्माण झाले नाहींत असें नाहीं. मधूनमधून अशा महाभागांचे अवतार तेथें होत होते म्हणूनच त्यांची कांहीं मर्यादेपर्यंत तरी प्रगति झाली. जॉन हस हा असाच एक अवतारी पुरुष होता. बोहेमियांतील हसिनेट्झ् या खेड्यांत जॉन हसचा ( १३६९–१४१५ ) जन्म झाला. आपल्या कर्तृत्वानें चढत जाऊन प्राग विद्यापीठांत तो प्राध्यापक झाला. तेथेंच त्यानें धर्मचिंतन सुरू केलें. याच सुमारास जॉन वायक्लिफचे ग्रंथ त्याच्या वाचनांत आले आणि त्याच्या मनांत क्रांतिकारक विचार उद्भवले. प्रस्थापित धर्म, त्यांतील कर्मकांड, धर्माचार्यांचें विलासी जीवन, त्यांचा धनलोभ व त्यांचीं पापकृत्यें यांवर तो कडक टीका करूं लागला. अर्थांतच रोमच्या

धर्मपीठाची त्याच्यावर वक्र दृष्टि झाली. पवित्र रोमन साम्राज्याचा सम्राट् सिसिग्मंड हा रोमच्या पोपच्या हातचें बाहुलें होता. त्यानें जॉन हसला कॉन्स्टनस् येथील न्यायासनापुढें उपस्थित राहण्यास फर्माविलें. प्रथम सम्राटानें त्याला अभय दिलें होतें; पण हस कॉन्स्टनस्‌ला येतांच धर्मगुरूंनीं त्याला अंधारकोटडींत रवाना करून त्याचे अनन्वित हाल केले. त्याच्यावर नास्तिकपणा, पाखंडीपणा व त्या विचारांचा प्रसार करणें हे आरोप होते व 'आपलें सर्व प्रतिपादन चुकीचें असून आपल्याला त्याबद्दल प्रश्चात्ताप होत आहे,' असें त्यानें लिहून द्यावें अशी धर्माचार्यांनीं त्याला आज्ञा दिली.

'पोप, सम्राट्, राजे, सरदार यांच्या आज्ञा कांहींहि असल्या तरी आपल्या विवेकबुद्धीला पटल्यावांचून त्या कोणींहि मानूं नयेत,' असें सांगणारा हा पुरुष धर्माचार्यांची ही आज्ञा कशी मानणार ?

परमेश्वराच्या मंदिरांत राहून पापपुण्याच्या मालाची अडतेगिरी करणाऱ्या या वणिग्‌जनांना तेथून हांकलून लावण्याची वायक्लिफच्या ग्रंथावर हात ठेवून जॉन हसनें प्रतिज्ञा केली होती. आज प्रागच्या धर्माचार्यांनीं वायक्लिफचे ग्रंथ जाळून टाकण्याचा हूकूम दिला. उद्यां कदाचित्......!

जॉन् हस लहान असतांनाच त्यानें एक प्रयोग केला होता. एकदां तो आईच्या मांडीवर डोकें ठेवून निजला होता. पलीकडे शेकोटी होती. विस्तवानें भाजल्यावर कसें वाटतें हें पहाण्यासाठीं त्यानें आपला हात सहज त्या शेकोटींत खुपसला ! त्याची आज त्याला आठवण झाली. त्या वेळीं अग्निज्वाळा या अगदीं असह्य झाल्या होत्या असें नाहीं !

'तूं पोपचा अधिकार मानीत नाहींस, मग कोणाच्या आधारानें तुझें प्रतिपादन तूं करतोस ?' न्यायासनावरील धर्माचार्यांनीं त्याला विचारलें.

'मला आधार फक्त माझ्या विवेकबुद्धीचा आहे !' हसनें उत्तर दिलें.

'पण शेकडों पंडित प्रतिज्ञेवर सांगत आहेत कीं, तुझीं मतें असत्य आहेत.

हे सर्व धर्मगुरु, शास्त्री, दशग्रंथी विद्वान् लोक यांच्यापेक्षां आपण जास्त शहाणे आहोंत असें तुझें म्हणणें आहे काय ? '

' माझी निष्ठा परमेश्वरावर व माझ्या सदसद्विवेकबुद्धीवर आहे. शेंकडों नव्हे, लक्षावधि शास्त्री व धर्माचार्य जरी विरुद्ध निर्णय देऊं लागले तरी माझ्या विवेकाची साक्ष त्यापेक्षां मला जास्त वंदनीय वाटते. '

या विवेकबळाच्या आधारानेच जॉन हस शांतपणें चितेवर चढला. अग्नीच्या ज्वाळा वरवर चढूं लागल्या तेव्हा तो आपल्या मित्रांना म्हणाला, ' शोक करूं नका. त्या ज्वाळा जड शरीराला जाळतील. सत्याला जाळण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठायीं नाही. '

जॉन हसची ही परंपरा पाश्चिम-युरोपच्या थोर पुरुषांनी अखंड पुढें चालवून आपल्या बलिदानाने विवेकस्वातंत्र्याची जपणूक केली. म्हणूनच त्या भूमींत धर्म, तत्त्वज्ञान, विज्ञान, साहित्य, स्वातंत्र्य, धन व लोकसत्ता यांची प्रगति झाली. पुढें हळूहळू धर्माचार्यांचा विरोध कमी झाला. प्रत्यक्ष आत्मबलिदान करण्याचे प्रसंग कमी येऊं लागले; पण आपलीं नवीं मतें, नवें तत्त्वज्ञान, नवा धर्म, नवें शास्त्रीय सत्य यांच्या रक्षणासाठीं, प्रसारासाठीं, अखिल विश्वा-विरुद्ध एकट्यानें उभें रहाण्याचें जें मनोधैर्य,—त्याची आवश्यकता मात्र प्रत्येक शतकांत तितकीच होती—त्यासाठीं होणाऱ्या शिक्षा सौम्य होत गेल्या इतकेंच. ल्यूथर, रूसो, व्हाल्टेअर यांना असाच लढा लढावा लागला. इतकेंच नव्हे, तर गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत विज्ञानाची दोनतीनशें वर्षें प्रगति झाल्या-नंतरहि आपला उत्क्रांतिवादाचा सिद्धांत जगाला पटवून देण्यासाठीं डार्विनला याच तऱ्हेचा संग्राम याच विवेकनिष्ठेच्या बळावर करावा लागला.

विवेकनिष्ठेसाठीं आत्मबलिदान करणें ही मानवी संस्कृतीच्या प्रगतीसाठीं एक अत्यंत अवश्य असलेली गोष्ट आहे असें दिसतें. कारण नुसत्या सत्याचें, नवतत्त्वाचें, नवविचाराचें आवाहन माणसाच्या मनाला पोंचत नाहीं. त्या सत्याच्या मागें अग्निज्वाळांचा प्रकाश जेव्हां दिसतो तेव्हांच माणसाची दृष्टि

तिकडे वळते, एरवीं नाहीं. माणसाच्या बुद्धीचें हें फार मोठें वैगुण्य आहे; पण तें आहे खरें. केवळ तर्कशुद्धता, ऐतिहासिक प्रमाणें, स्वानुभव, इतकेंच काय, पण दृक्प्रत्यय हासुद्धां मानवी मनाला नवसत्याकडे वळविण्यास असमर्थ आहे. सनातन धर्मशास्त्र, वेदवचनें, प्रस्थापित रूढी यांच्याकडून मानवाची दृष्टि काढून ती नव्या तत्त्वांकडे वळवावयाची असेल तर 'आत्मार्पण' हा एकच उपाय आहे, आणि हें जाणूनच सॉक्रेटिसानें बुद्धिपुरःसर आत्मबलिदान केलें. सॉक्रेटिसाचें नवें तत्त्वज्ञान अमर झालें तें त्यामुळेंच. त्याच्या मृत्यूपूर्वी, त्याचा खटला चालू असतां, त्याचें तत्त्वज्ञान केवळ सत्यतेच्या दृष्टीनें पहातां नंतरच्या इतकेंच शुद्ध होतें; पण त्या सत्याच्या ठायीं सामर्थ्य निर्माण झालें नव्हतें. लोकांच्या मनात धुसून तेथें दृढ बैठक धरून बसण्याची शक्ति त्या सत्याच्या ठायीं नव्हती. देहदंड आनंदानें सोसण्यांत सॉक्रेटिसानें जे व्यक्तित्वाचे तेज प्रगट केलें त्या तेजामुळें त्या सत्याच्या ठायीं ती शक्ति निर्माण झाली. त्यानें लोकमताची एकदम पकड घेतली, आणि ज्यांनीं त्याला शिक्षा केली होती तेच लोक आतां त्याचे शत्रू जे अनिटस व मेलिटस त्यांच्याविरुद्ध खवळून उठले, त्यांना त्यांनीं देशोधडीला लावलें व अथेन्समध्यें सॉक्रेटिसाचा पुतळा उभारला. याचा अर्थच असा कीं, सामर्थ्य आहे तें विवेकानें निर्माण केलेल्या सत्यांत नसून त्या विवेकनिष्ठेसाठीं केलेल्या आत्मबलिदानांत आहे.

### भारताचें वैगुण्य

दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, आपल्या अत्यंत श्रेष्ठ, अत्यंत उज्ज्वल अशा भारतीय संस्कृतींत या सामर्थ्याचा अभाव हें फार मोठें वैगुण्य आहे; ही अत्यंत मोठी उणीव आहे. वेदकाळापासून तों इंग्रजी शिक्षणाच्या प्रसारानें येथें पाश्चात्य विद्येचा प्रभाव निर्माण होईपर्यंत या भूमींत सॉक्रेटिस झालाच नाहीं. आणि पाश्चात्य संस्कृतीचा मात्र प्रारंभच सॉक्रेटिसपासून झाला. येथें भारतीय संस्कृतीच्या बाजूनें एक गोष्ट सांगणें अवश्य आहे. ख्रिस्ती धर्मानें पाश्चात्य देशांत जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत ज्याप्रमाणें मानवी मनावर व बुद्धीवर अत्यंत कडक असें नियंत्रण ठेविलें होतें तसें धर्माचें

हेकट व आततायी नियंत्रण या भूमींत कधींहि कोणत्याहि धर्माचार्यांनीं प्रस्थापित केलें नव्हतें. धर्म, तत्त्वज्ञान, साहित्य, विज्ञान या सर्व क्षेत्रांत येथें माणसांच्या मनाला, त्यांच्या विवेकाला, बुद्धीला पूर्ण स्वातंत्र्य होतें. तत्त्वज्ञानांतील नव्या मतासाठीं किंवा विज्ञानांतील नव्या संशोधनासाठीं येथें कधींहि कोणाचाहि छळ झाला नाहीं, आणि या विवेकस्वातंत्र्यामुळेंच येथें त्या त्या क्षेत्रांत प्राचीन काळीं भारतानें असामान्य प्रगति केलेली होती. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, भारतांत कोणत्याच प्रकारचा जुलूम व अन्याय नव्हता. वर्णसंस्था, जातिसंस्था, अस्पृश्यतेची रूढी, बालविवाह, सक्तीचें वैधव्य, सक्तीचें सहगमन इ. स्त्रियांवरील अन्याय, परदेशगमन-बंदी, मनुष्य जुलमानें धर्मभ्रष्ट झाल्यास त्याच्या परावर्तनाची बंदी, अनेक प्रकारचे जाचक कर, राजसंस्थेचा व मदांध राजांचा जुलूम यामुळें होणारा छळ मुळींच उपेक्षणीय नव्हता. आणि या सर्वाला धर्मशास्त्राचा—धर्मवचनांचा म्हणा किंवा रूढ धर्मशास्त्राचा म्हणा—पाठिंबा होता. पण याविरुद्ध तत्त्वज्ञान निर्माण करून त्याच्या प्रतिकारार्थ पाय रोंवून संग्राम करण्यासाठीं या भूमींत कधींही, कोणीही उभाच राहिला नाहीं.

### विवेक × वेद

जुन्या धर्मशास्त्राला किंवा रूढ धर्माला कोणीं विरोधच केला नाहीं असें नव्हे; तत्त्वज्ञानपूर्वक विरोध केला नाहीं, जुन्या धर्मशास्त्राला आव्हान देऊन त्याच्या जागीं नवें धर्मशास्त्र स्वतःच्या विवेकाच्या आधारें प्रस्थापित करण्याची रग कोणीं दाखविली नाहीं, असा वरील म्हणण्याचा भावार्थ आहे. राजकारणशास्त्रांत बंडाळी आणि क्रांति यांत भेद दर्शविला जातो. बंडाळी म्हणजे क्रांति नव्हे; शासनाचें, समाजरचनेचें जें जुनें तत्त्व असेल तें उच्छिन्न करण्याच्या हेतूनें व नवें तत्त्व सांगून त्याअन्वयें समाजरचना करण्यासाठीं जी उठावणी केली असेल ती क्रांति होय; एरवीं सर्व बंडाळ्या किंवा दंगेधोपे होत. त्याचप्रमाणें प्रस्थापित सनातन धर्माविरुद्ध या देशांत बंडाळ्या झाल्या, पण क्रांति झाली नाहीं. कांहीं समाजधुरीणांनीं देशकाल पाहून धर्म-

सुधारणा केल्या; पण त्या विवेकबळानें, बुद्धीला पटेल तें ग्राह्य मानूं अशा तत्त्वानें, अशा आग्रहानें केल्या नाहींत. जुन्या स्मृतीऐवजीं नव्या स्मृति आणणाऱ्यांनीं पुन्हा वेदवचनांचें प्रामाण्य चालूच ठेविलें. आठव्या शतका-पासून तर नव्या स्मृति रचणेंहि बंद झालें. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतहि लोकांनीं विवेकबुद्धीच्या आधारानें नवे सिद्धान्त सांगण्याची जोखीम पतकरली नाहीं. शंकराचार्य, रामानुजाचार्य यांनीं गीता, ब्रह्मसूत्रें, उपनिषदें यांवर भाष्यें लिहून त्या आधारानें स्वतःचे विचार मांडले. कांहीं थोर विभूतींनीं एक पाऊल आणखी पुढें टाकलें. भगवान् गौतमबुद्ध, भगवान् महावीर यांनीं सनातन धर्माला विरोध केला तो स्वतःच्या विवेकबळानें केला हें खरें आहे; पण त्यांनीं विवेकनिष्ठेचें तत्त्वज्ञान, म्हणजे बुद्धिप्रामाण्याचें तत्त्व प्रस्थापित केलें नाहीं. वेदाधारें चालणाऱ्या शब्दप्रामाण्याच्या अंध परंपरेऐवजीं त्यांनीं दुसऱ्या, पण शब्दप्रामाण्य-परंपराच निर्माण केल्या. युरोपांतील जीजस्, सेंट पॉल, पीटर यांचें कार्य याच प्रकारचें होतें. तेथील रूढ धर्माला त्यांनीं विरोध केला त्या वेळीं अखिल समाजाविरुद्ध ते एकटेच उभे होते; पण असा समाजाविरुद्ध उभें रहाण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीला आहे हें मात्र त्यांना मान्य नव्हतें. सॉक्रेटिस, रॉजर बेकन यांचें तें वैशिष्ट्य होतें. स्वतःच्या विवेकानें, बुद्धीनें, विचार करण्याचा हक्क प्रत्येकाला आहे, हें तत्त्व प्रस्थापित करण्यासाठीं त्यांनीं आत्मबलिदान केलें. जॉन हसनें यासाठींच मृत्यूला कवटाळलें. "प्रत्येक व्यक्तीला धर्मस्वातंत्र्याचा हक्क आहे. बायबलाचा, परमेश्वराच्या वचनांचा आपल्या मताप्रमाणें अर्थ लावण्याची प्रत्येकास मोकळीक मिळाली पाहिजे; इतकेंच नव्हे, तर पाखंडी लोकांचे ग्रंथ वाचण्याचें स्वातंत्र्यहि प्रत्येकास असलें पाहिजे, कारण त्यावांचून सत्यज्ञान होणार नाहीं," असें जॉन हसचें प्रतिपादन असे. त्याला देहान्त शासन झालें तें त्यासाठींच. उज्जीवन-युगांतले ब्रूनो, गॅलिलिओ हे जे विज्ञान-संशोधक, त्यांचे संग्राम तर केवळ यासाठींच होते. स्वतःची बुद्धि, अनुभव, तर्क, विवेक यांना अवसर मिळाला पाहिजे, सत्यज्ञान याच साधनांनीं करून घेतलें

पाहिजे आणि तें प्राप्त करून घेण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीस मिळाला पाहिजे हें तत्त्व प्रस्थापित करण्यासाठींच त्यांनीं देहदंड सोसला.

### संग्राम नाहीं

मानवाच्या विवेकबुद्धीवरची ही जी अनन्यनिष्ठा तिचा आग्रह धरणारा, तिच्यासाठीं संग्राम करणारा, एकहि पुरुष ब्रिटिशपूर्व भारतीय इतिहासांत झाला नाहीं, ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. स्त्रिया, शूद्र, अंत्यज यांच्यावर होत असलेल्या अन्यायाची जाणीव अनेकांना होत होती. कष्टकरी जनता, शेतकरीवर्ग पिळून निघत आहे हेंहि अनेकांना दिसत होतें; पण ज्यांच्यावर अन्याय होत होता ते लोक किंवा त्याच्या वतीनें समाजांतल्या इतर वर्गांतले लोक यांतून, ही समाजरचनाच आमूलाग्र बदलली पाहिजे आणि समाजरचनेचीं नवीं तत्त्वे ठरविण्याचा आम्हांला अधिकार असला पाहिजे, अशा बैठकीवरून प्रस्थापित धर्मशास्त्राशीं संग्राम करण्यास कोणीहि उभा राहिला नाहीं. ही विषमता अन्याय्य आहे असें पारमार्थिक क्षेत्रापुरतें प्रतिपादन संत-साधु करीत होते; पण तेथेंहि ते संग्रामास सिद्ध झाले नाहींत. कांहींनीं रूढ धर्मशास्त्राविरुद्ध आचरण केले, पण तसें तत्त्वज्ञान प्रस्थापित करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला नाहीं. एकनाथ महाराच्या घरीं जेवावयास गेले. चातुर्वर्ण्य तर अनेकांनीं उधळून दिलें होतें. रूढ धर्माप्रमाणें नामदेव, तुकाराम यांना वास्तविक धर्मप्रवचनाचा अधिकार नव्हता, तरी त्यांनीं धर्मप्रवचने केलीं. मल्हारराव धनगर असल्यामुळें राजा होण्याचा अधिकार त्याला नव्हता, तरी तो राजा झाला; पण इतकें करूनहि चातुर्वर्ण्य हें समाजरचनेचें तत्त्व चूक आहे, समाजविघातक आहे, नव्या तत्त्वाअन्वयें समाजरचना झाली पाहिजे असें मात्र कोणीं सांगितलें नाहीं; तसा कोणीं आग्रह धरला नाहीं. इतकेंच नव्हे, तर लिहिण्याची जेव्हां वेळ येई तेव्हां ते सर्व सनातन धर्माचेंच समर्थन करीत असत. चातुर्वर्ण्याचें समर्थन एकनाथानें केलें, एवढेंच नव्हे तर तुकारामानेंहि तें ठायीं ठायीं केलें आहे. वर्णधर्म न पाळणारे लोक नरकांत जातील असें तो म्हणतो. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांना जातिव्यवस्था, वर्ण-

व्यवस्था, अस्पृश्यता यांविरुद्ध पुष्कळ विचार सांगावयाचे होते आणि मधूनमधून त्यांनीं ते सांगितलेहि आहेत; पण सनातन धर्मशास्त्राच्या विरुद्ध आम्ही हें स्वतःच्या विवेकाच्या आधारानें, त्या बळावर सांगतों, आणि तसें सांगण्याचा प्रत्येकास हक्क आहे, आमच्या बुद्धीला पटलें, विवेकाला मानवलें तरच आम्ही सनातन धर्मशास्त्र मानूं, अशी भूमिका त्यांनीं घेतली नाहीं. ती त्यांच्या स्वप्नांतहि नव्हती. जें कांहीं थोडे त्यांना नवीन सांगावयाचें होतें तें त्यांनीं जुन्याच्या प्रवाहांतच मिसळून दिलें. त्याशीं जमते घेत घेत, त्याच्या-पुढें नमत, त्याला वदन करीत त्यांनी तें सांगितलें. याचासुद्धां थोडाबहुत उपयोग होतो, नाहीं असें नाहीं; पण यांतून विवेकनिष्ठेची महाशक्ति कधींहि निर्माण होत नाहीं, आणि ती नाहीं म्हणजे प्रगति नाहीं. 'अॅनलस् ऑफ युरोपियन सिव्हिलेझन' या अल्फ्रेड मेयरच्या ग्रंथाचा वर उल्लेख केला आहे. त्याप्रमाणें इ. स. १००० ते १८०० या काळाची भारताच्या संस्कृतीचा हिशेब घेणारी सनावळी तयार केली तर एवढ्या आठशें वर्षांच्या काळांत काव्य, कादंबरी, नाटक, राजनीति, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास, धर्म, पदार्थविज्ञान, रसायन, गणित, नृत्य, चित्र, शिल्प या क्षेत्रांत किती ग्रंथ व किती कलाकृती त्या सनावळींत आपल्याला नोंदतां येतील याचा प्रत्येक भारतीयानें विचार केला आणि या आठशें वर्षांतील बहुतेक सनांपुढें आपल्याला जागा मोकळीच ठेवावी लागेल हें त्याच्या ध्यानांत आलें तर विवेकनिष्ठा ही केवढी उज्जीवक शक्ति आहे, मानवी संस्कृतीच्या प्रगतीला तिची किती आवश्यकता आहे, तिच्या अभावीं समाजचे समाज कसे मृतवत् होतात, हें त्याला सहज कळून येईल. आणि अशा या विवेकनिष्ठेच्या भक्तीनें संग्राम करण्यासाठी, आत्मबलिदान करण्यासाठीं पूर्वकाळीं भारतांत कोणीच उभा राहिला नाहीं ही आपल्या संस्कृतींतली फार मोठी उणीव आहे, हें आपलें फार मोठें दुर्दैव आहे, हा विचारहि त्याला पटेल.

**बंडखोरीचें तत्त्वज्ञान**

विवेकनिष्ठेसाठीं संग्राम करण्याचें धैर्य, विश्वाविरुद्ध एकट्यानें उभें रहाण्याचें

हें मन:सामर्थ्य भरतभूमींत आगरकरांनीं प्रथम प्रकट केलें. पाश्चात्य विद्येचा प्रसार येथें होऊं लागल्यापासूनच या सामर्थ्याच्या जोपासनेची तयारी येथें होऊं लागली होती. राजा राममोहन रॉय, ईश्वरचन्द्र विद्यासागर, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, महात्मा फुले, रानडे, भांडारकर या सर्व थोर पुरुषांनीं सनातन धर्मशास्त्रावर टीकास्त्र चालविलें होतें. पण तसें करतांना त्यांनीं आपल्या बाजूला पुरातन काळच्या अन्य ऋषींचें साह्य घेतलें होतें. त्यांतल्या त्यांत लोकहितवादी व महात्मा ज्योतिराव फुले यांचा हल्ला जास्त मूलगामी स्वरूपाचा होता. त्यांची बैठक बरीचशी विवेकनिष्ठेची होती; पण जुन्या शास्त्रांना जळजळित आव्हान देऊन, 'आमच्या स्मृति आम्हीच रचणार,' अशी घोषणा करून, बुद्धीला पटत नसेल तर परमेश्वराचें वचनहि आम्ही मानणार नाहीं, असें जाहीरपणें सांगून अनुभव, इतिहास, तर्क, यांच्याच केवळ आधारानें नव्या समाजरचनेचें संपूर्ण तत्त्वज्ञान सांगण्याचें कार्य, आणि या रीतीनें विवेकनिष्ठा ही अद्‌भुत शक्ति या भूमींत निर्माण करण्याचें कार्य आगरकरांनीं केलें. लोकहितवादींनीं सूत्ररूपानें नवे विचार आपल्या पत्रांतून मांडले होते. ज्योतिरावांनीं आपल्या कवनांतून, पोवाड्यांतून व संवादांतून आपले विचार सूत्ररूपानें मांडले होते; पण एवढ्यानें नव्या विचारांना तत्त्वज्ञानाची उंच प्रतिष्ठा प्राप्त होत नाहीं. नव्या तत्त्वांचा सर्व बाजूंनीं विचार करणें, आधारप्रमाणांनीं त्यांचें मंडन करणें, तुलतेनें त्यांचें तारतम्य दाखविणें, इतिहासाच्या साह्यानें जगाच्या पसाऱ्यांत त्यांचें स्थान दाखवून देणें, त्यावर आलेल्या व येणाऱ्या आक्षेपांचें निरसन करणें, त्यामुळें होणाऱ्या समाजरचनेचें स्वरूप दाखवून देणें, अशा पद्धतीनें जेव्हां सूत्रमय विचारांचा प्रपंच केला जातो तेव्हां त्यांना नवतत्त्वज्ञानाचा दर्जा प्राप्त होतो. आणि हें सर्व करीत असतांना त्या तत्त्वांचा प्रणेता समाजाकडून होणाऱ्या यातना सोसतांना जें अग्निदिव्य करतो, अखिल विश्वाविरुद्ध केवळ आपल्या विवेकानें जेव्हां तो संग्राम करूं लागतो तेव्हां त्यांतून विवेकनिष्ठेची शक्ति निर्माण होते. ती शक्ति येथें आगरकरांनीं निर्माण केलेली आहे.

## मानवत्वाचें लक्षण

आगरकरांचा संग्राम चालू होता त्या वेळीं विवेकनिष्ठेचें माहात्म्य सर्वत्र मान्य झालेलें होतें. युरोपांत इंग्लंड, फ्रान्स, हॉलंड, स्वीडन या देशांत ती शक्ति निर्माण होऊन वाढीस लागली होती. जर्मनी, इटली या देशांतहि विचारांचें वळण बदलून विचारवंत लोक या मार्गाकडे वळले होते. पूर्व-युरोपांत अजून प्रत्यक्ष व्यक्तिस्वातंत्र्य आलें नव्हतें, तरी आपल्याला त्याच मार्गानें जावयाचें आहे हा विचार तेथील लोकांना मान्य झाला होता. पूर्वेकडच्या देशांतहि व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य यांचाच उद्‌घोष चालू झाला होता. सारांश, विवेकनिष्ठा ही एक महाशक्ति आहे व तिच्याच साह्यानें आपल्या समाजाची भावी काळांत प्रगति करून घ्यावयाची आहे, हा विचार त्या काळीं जगन्मान्य होत आला होता. या वाटचालींत कोणी पुढें होते, कोणी अजून मागें होते, इतकाच फरक होता; पण जगाच्या वाटचालीची दिशा ठरून गेली होती. तिच्याबद्दल कोठें वाद नव्हता. यापुढें कालचक्र एकाएकीं उलटें फिरूं लागेल व सॉक्रेटिसाच्या काळाच्याहि मागें आपण जाऊं, असें त्यावेळीं कोणाच्या स्वप्नातहि आलें नसेल; पण आज जगांत तसें दुर्दैवानें घडलें आहे, घडत आहे. पूर्वींच्या काळीं धर्माचार्यांनीं मानवी जविन एकपट नियंत्रित केलें असेल तर आज त्याच्या शतपट नियंत्रित करावें असें धोरण हिटलर, मुसोलिनी, स्टॅलिन यांनीं विसाव्या शतकांत आंखलें. मानवाच्या विवेकाला अवसर तर द्यावयाचा नाहींच, उलट ती शक्ति अजिबात नष्ट करून टाकावयाची, अशी या पुरुषांची महत्त्वाकांक्षा होती, आणि या ध्येयसिद्धीसाठीं त्यांनीं उपाययोजनाहि तशीच केली. पूर्वीं सॉक्रेटिस किंवा रॉजर बेकन हे धर्मद्रोही आहेत असें वाटलें तर त्यांनाच फक्त देहान्तशासन द्यावें, त्यांनाच फक्त तुरुंगांत ठेवावें असें सत्ताधीशांचें मर्यादित धोरण असे. आतां तसें नाहीं; सॉक्रेटिस, बेकन, हस यांच्या बायकामुलांचा, आप्तांचा, मित्रांचा आतां बळी घेतला जाईल. हेमलॉक्‌चा पेला सॉक्रेटिसाबरोबरच किंवा त्याच्या आधीं त्याच्या बायकोला,

मुलीला, मुलाला प्यावा लागेल, आणि त्याचे मृत्यू पाहूनहि सॉक्रेटिसाचें धैर्य गळलें नाहीं तर शेवटीं त्यालाहि विष घ्यावें लागेल. त्यामुळें विवेकनिष्ठेचा संग्राम पूर्वींपेक्षां शतपट अवघड होऊन बसला आहे. जॉन हस हा स्वतःचा देह चितेवर ठेवण्याचें धैर्य प्रकट करूं शकेल; पण त्याच्यादेखत त्याच्या लाडक्या लेकीला चितेवर उभी केली किंवा आपल्यामागून तिची हत्या होईल असें त्याला वाटलें तर त्याचें धैर्य कितपत टिकेल यांची शंका आहे. जर्मनींत अशा हत्या नित्य होत असत; रशियांत आज होत आहेत. यामुळें जगाच्या भावी स्वरूपाविषयीं विचारी लोकांच्या मनाला दारुण चिंता वाटूं लागली आहे. मागल्या काळीं मदांध राजे किंवा सुलतान, लोकांच्या घरादारांचा असा विध्वंस करीत; पण तें त्यांच्या लहरीवर असे. आतां मानवाला पद्धतशीर यमयातना भोगविण्याची यंत्रणाच सिद्ध झाली आहे; आणि ज्या विज्ञान-संशोधनामुळें मानवाची आतांपर्यंत प्रगति झाली त्याचें बळ सत्ताधीशांनीं हातीं घेतल्यामुळें राज्ययंत्राला प्रतिकार करणें हें व्यक्तीला हळूहळू जास्त कठीण होत जाणार आहे. या व असल्या अनेक कारणांमुळें विवेकनिष्ठेची उपासना पुढील काळांत किती अनन्यतेनें होईल याविषयीं मन साशंक होतें. तरी पण नवीन पिढीच्या तरुणांनीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, मानवाच्या प्रगतीचें तें एकमेव साधन आहे या उपासनेवाचून मानवाला मानवत्वच लाभणार नाहीं, त्याचा पशु होऊन जाईल. म्हणून सत्ताधीशांनीं मानवाच्या हातची ही महाशक्ति नष्ट करण्यासाठीं ज्याप्रमाणें अनेक नव्या युक्त्या शोधून काढल्या आहेत, कल्पना लढविल्या आहेत, योजना आंखल्या आहेत त्याचप्रमाणें त्या निष्फळ करून टाकण्यासाठीं मानवानेंहि आपली बुद्धि लढविली पाहिजे व या महाशक्तीची जपणूक केली पाहिजे. असें केलें तरच त्याला मानव ही पदवी सार्थतेनें लावतां येईल.

ऑक्टोबर १९५२

# ८. आमची फौजदारनिष्ठा

आत्मा हा सर्वव्यापी, सर्वसाक्षी आहे हें दाखवून देण्यासाठीं वेदान्तांत नेहमीं एक उदाहरण देतात. एका गुरूनें शिष्याच्या हातीं एक पक्षी दिला व ' जेथें तुला कोणी पहात नाहीं अशा ठिकाणीं जाऊन याला मारून टाक ! ' असें त्याला सांगितले. हे काम फारच सोपें आहे असें वाटून शिष्य त्या पक्ष्याला घेऊन अरण्यांत गेला. शेतकरी, शिकारी, भिल्ल, कातकरी यांनींहि पाहूं नये म्हणून तेथून अगदीं गर्द झाडींच्या मध्यें जाऊन शिष्य उभा राहिला. घनदाट राईमुळे तेथें सूर्यकिरणहि येत नव्हते. तेव्हा कोणी पाहात नाहीं अशी खात्री वाटून त्याने पक्ष्याला समोर धरले नि आता त्याची मान मुरगळणार तोंच शिष्याच्या ध्यानीं आले, कीं ' अरे ! इथे माझें हें कृत्य कुणी पहात नाहीं असं कसं म्हणतां येईल ? मी स्वत: ते पहात आहेच कीं ! ' हे ध्यानांत येतांच तो गोंधळून गेला. कारण, आपण कोठेंहि गेलो तरी आपण हें कृत्य पाहणारच; आणि त्यामुळें या पक्ष्याला ' [illegible] नाहिं नकळत ' मारून टाकणें शक्य होणार नाहीं, असे त्याला दिसूं लागले. त्यामुळें तो तसाच परत गेला व " हे अशक्य आहे " असे त्याने गुरजींना सांगितलें. आपला आत्मा प्रत्येक ठिकाणीं आपल्या कृत्याचा साक्षी आहे, हा विचार शिष्याच्या ध्यानीं आलेला पाहून गुरुजींना आनंद झाला.

### दंडसत्ता कीं लोकसत्ता ?

आपल्या आत्म्याच्या सर्वसाक्षित्वाविषयीं आपल्याला झालेली ही जाणीव आपण वेदान्तापुरती, परलोकापुरती मर्यादित न ठेवता ऐहिक जीवनाच्या व्यवहारांत पदोपदीं जागृत ठेवावी अशी सध्याच्या समाजरचनेची अपेक्षा आहे, आणि ही जाणीव आपण ठेवीत नाहीं हेंच आपल्या सर्व दुःखाचें मूळ आहे. आपण स्वतःला मोठे धर्मनिष्ठ, संस्कृतिनिष्ठ, ध्येयनिष्ठ असें समजतों, पण प्रामाणिकपणें आपण आपल्या अंतर्यामीं शोध केला तर आपण सर्व पोलीसनिष्ठ, फौजदारनिष्ठ लोक आहोंत हें आपल्या सहज ध्यानांत येईल.

समाजाचे, सरकारचे किंवा धर्मांचे कायदे आपण केव्हां पाळणार ? चौकाचौकांत पोलीस उभा असेल तरच ! एरवीं उजव्या बाजूनें सायकल किंवा मोटार दडपून नेण्यास आपण मुळींच कचरत नाहीं ! काळा बाजार करण्याची खंत आपल्याला वाटत नाहीं. वकील असलों तर खोटा पुरावा देऊन खटले जिंकण्यास, डॉक्टर असलों तर वाईट औषधें देऊन रोग लांबविण्यास, शिक्षक असलों तर प्रश्नपत्रिका फोडण्यास, सरकारी अधिकारी असलों तर मुद्दाम प्रकरणें लांबणीवर टाकून पैसे दिले तरच तीं आधीं उरकावीं या धोरणाचा अवलंब करण्यास आपल्याला कशाचीहि क्षिति वाटत नाहीं. आपण काळजी फक्त एकच घेत असतोः "–आपणांस कुणी पाहात नाहीं ना ? पोलीस शेजारीं नाहीं ना ? फौजदार आपल्याला पकडणार नाहीं ना ? " तो पाहात नाहीं अशी खात्री असली कीं दुष्काळांत अनाथांना वांटण्यास दिलेले पैसे स्वतः घेणें, खोटे मतदार दाखवून निवडणूक जिंकणें, आपल्या सग्यासोयऱ्यांना सरकारी कंत्राटें देणें, कॉर्पोरेशनच्या मालकीच्या खताच्या गाड्या आपल्या शेतांत लोटणें, लोकल बोर्डांत रस्त्याची आखणी करतांना आपल्या घरावरून, शेतावरून रस्ता तयार करून घेण्याची कोशीस करणें यांत आक्षेपार्ह असें कांहीं आपण मानीत नाहीं !

आपण संस्कृतिनिष्ठ किंवा धर्मनिष्ठ असतों तर हीं कृत्यें पापमय आहेत असें आपणांस निश्चित वाटलें असतें; पण आपण फौजदारनिष्ठ असल्यामुळे तो जें पाहात नाहीं तें पापच नव्हे, अशी आपली श्रद्धा आहे. आपली श्रद्धा देवावर किंवा आत्म्यावर नसून पोलिसावर आहे ! समाजाची वरील प्रकारें मान मुरगळतांना, आपण स्वतः आपल्याला पाहात आहोंत, ही भीति आपल्याला पुरेशी नाहीं. पुण्यें करावयाचीं तीं फौजदाराच्या साक्षीनें व पापें करावयाचीं तीं देवाच्या किंवा आत्म्याच्या साक्षीनें असें आपलें धोरण आहे.

जगांत दंडसत्ता, लष्करी सत्ता, हुकूमशाही हा प्रकार जो निर्माण होतो तो आपल्या या फौजदारनिष्ठेमुळेंच होत असतो. ज्या क्षणीं चौकांतल्या पोलिसा-

पेक्षां आपण स्वतः श्रेष्ठ आहों असें आपणांस वाटूं लागेल त्या क्षणीं दंडसत्तेचें लोकसत्तेंत रूपांतर होईल. पोलीस साक्षी असला तरच भ्यावयाचें, आपण स्वतः साक्षी असलों तर भ्यावयाचें नाहीं, ही वृत्ति आपण पोलिसाला स्वतःपेक्षां श्रेष्ठ समजत असल्याचीच निदर्शक आहे. आपल्या नीतींचा, पुण्याचा रक्षणकर्ता पोलीस आहे, आपण स्वतः नाहीं, असें आपण ठरवून टाकलें आहे. आणि आपणच असें ठरविल्यानंतर पोलिसी राज्य किंवा दंडसत्ता प्रस्थापित व्हावी यांत नवल तें काय ? आपण स्वतः साक्षी असतांना आपण समाजहिताचे, संस्कृतीचे, धर्माचे दंडक मोडणार नाहीं, समाजविघातक कृत्यें करणार नाहीं असें ज्या वेळीं आपलें ठरेल त्या वेळीं आपलें राज्य, म्हणजेच लोकराज्य प्रस्थापित होईल व तें यशस्वी होईल. आपण देवाला, आत्म्याला, विवेकाला पोलिसापेक्षां श्रेष्ठ मानण्याचें धोरण केव्हां अवलंबिणार एवढाच प्रश्न आहे.

**'आतां श्रम कशाला ?'**

परक्याच्या धनाचा अपहार करूं नये, दुसऱ्याच्या हितसंबधाचा नाश करूं नये या नियमांचें पालन आपल्या हातून व्हावें एवढ्याचसाठीं आपल्याला पोलिसाची जरूर असते असें नाहीं. आश्चर्याची गोष्ट पुढेंच आहे. स्वहितसुद्धां आपण पोलिसाच्या धाकावांचून करीत नाहीं ! सरकारनें कुळ-कायदा केला आणि जमिनीविषयींची शेतकऱ्यांच्या मनांतील अनिश्चितता कमी केली. 'आपल्या कष्टाचें फळ आपल्यालाच मिळेल' अशी ग्वाही त्याच्या मनाला सरकारनें मिळवून दिली. यामुळें सर्वत्र अन्नधान्यांचें उत्पादन वाढेल, पिकें जास्त येतील, अशी अपेक्षा करण्यांत कांहींच वावगें नव्हतें; पण तसें घडलें नाहीं. शेतकरी या आश्वासनानें उत्साही होण्याऐवजीं ढिला झाला. जास्त उत्पादन करून आपण जास्त भोगावें ही वृत्ति त्याच्या ठायीं निर्माण न होतां 'थोडा जास्त आळस करायला हरकत नाहीं' ही त्याची वृत्ति झाली. जपानी शेतकरी व येथला शेतकरी यांची तुलना सध्या नेहमीं करण्यांत येते. त्यांत जपानी शेतकऱ्याच्या शेती करण्याच्या पद्धतीवर भर दिला जातो. त्या पद्धतीला महत्त्व आहे यांत शंकाच नाहीं; पण त्यापेक्षां जास्त शेतकऱ्याच्या वृत्तीला आहे.

'सिक्युरिटी व लिबर्टी' म्हणजे निर्वाहाची शाश्वती आणि व्यक्तिस्वातंत्र्य यांचा समन्वय कसा करावा हा लोकशाहीपुढचा फार गहन प्रश्न आहे. निर्वाहाची शाश्वती मिळतांच मनुष्य जास्त उत्साहानें कामास लागेल अशी अपेक्षा असते. आणि त्यामुळें त्यानें काम किती करावें; उत्पन्न धनाचा वापर कसा करावा; धनाची, जमिनीची, हत्यारांची खरेदीविक्री कशी, केव्हा करावी इत्यादि बंधनें त्याच्यावर घालण्याची जरूर नाहीं असें वाटतें. पण शाश्वती मिळतांच मनुष्य उत्साही न होता 'आतां इतके श्रम करून काय करायचें आहे?' असे म्हणूं लागला तर? फ्रान्समध्यें खाणी, कारखाने यांचें राष्ट्रीयीकरण झालें–म्हणजे हीं सर्व उत्पादनसाधनें जनतेच्या ताब्यांत आलीं–तेव्हा त्याचे उत्पादन वाढण्याच्या ऐवजीं भराभर घटूं लागलें. 'आपण श्रम करून उत्पादन करतों ते एकटा भांडवलवाला खाऊन टाकतो' ही कामगारांची पूर्वीची तक्रार होती; आता आपल्या श्रमाचें फळ जनतेला म्हणजे आपल्यालाच मिळावयाचें आहे, असें निश्चित होताच वास्तविक कामगारांनीं पूर्वीच्यापेक्षां जास्त कष्ट करावे व उत्पादन वाढवावे; पण तसें त्यांनीं केलें नाहीं. स्वार्थी, क्रूर अशा भांडवलवाल्याच्या मुकादमाच्या नजरेखालीं असला तरच तो काम करणार! म्हणजे स्वतःच्या बायकामुलांना भाकरी जास्त मिळेल हें विलोभन त्याला प्रेरक होऊं शकत नाहीं; तर मुकादमाचा आसूड प्रेरक होतो! मुकादम-निष्ठा हा पोलीसनिष्ठेचाच एक प्रकार होय. येथें लोकांनीं असें दाखवून दिलें, कीं स्वतःचें हित साधण्यासाठींसुद्धा आपल्यावर सक्ती करावी लागते! आत्म्याची, विवेकाची, देवाची प्रेरणा पुरत नाहीं. फौजदाराची जड प्रेरणा अवश्य असते.

## एक कोटीची उधळपट्टी

आमच्या पुणें विद्यापीठानें बी. ए. च्या विद्यार्थ्यांसाठीं सध्यां गृहपाठाची (ट्युटोरिअलची) पद्धत सुरू केली आहे. विद्यार्थ्यांना दरसाल पांच प्रश्नपत्रिकांचा अभ्यास करावयाचा असतो. प्रत्येक प्रश्नपत्रिकेच्या अभ्यास-

विषयांतील सहा प्रश्न म्हणजे एकंदर तीस प्रश्न वर्षभरात विद्यार्थ्यांनीं घरीं अभ्यासून लिहून आणले पाहिजेत, असा नियम आहे. वास्तविक विद्यार्थ्यांना अत्यंत उपकारक असा हा नियम आहे. घरीं इतके विषय वाचले जातात, लिहिण्याची संवय होते, आपल्याला लिहितां कसें येत नाहीं तें कळतें, परीक्षेच्या वेळीं एकदम भार पडत नाहीं, असे या पद्धतीचे अनेक फायदे असूनहि हे गृहपाठ शक्य तों टाळण्याकडे बहुसंख्य विद्यार्थ्यांची प्रवृत्ति असते! गृहपाठ न आले तर वर्ष बुडविण्याची धमकी देऊन, विद्यापीठानें ती प्रत्यक्षांत आणण्यास प्रारंभ केला तेव्हां कोठें विद्यार्थी नरम आले! तरीहि वर्षांतून अनेक वेळां धमकीच्या सूचना लावाव्या लागतातच. कडक सूचना फळ्यावर लागल्यावर भराभर गृहपाठ आणून देणाऱ्या, दीन चेहरे करून घरीं भेटावयास येणाऱ्या विद्यार्थ्यांकडे पाहून अडाणी शेतकऱ्यांच्यात आणि या विद्वान् विद्यार्थ्यांच्यांत काय फरक आहे असा प्रश्न माझ्या मनांत उद्भवतो. आपलें यांत हित आहे, हे गृहपाठ आपल्या फायद्याचे आहेत हें सर्वांना मान्य आहे. असें असूनहि सक्ती केल्यावांचून, कोठला तरी दंड उगारल्यावांचून हें स्वहिताचें काम त्यांच्याकडून होत नाहीं; हाहि फौजदारनिष्ठेचाच नमुना नव्हे काय?

परवां विद्यार्थ्यांना मीं एक गमतीचा हिशेब सांगितला. पोलीस उभा नसेल तर हे विद्यार्थी दडपून वाटेल त्या बाजूनें सायकली नेतात. ही गोष्ट अगदीं क्षुद्र वाटते; पण हिशेब काय होतो तो पाहा. अतिशय गर्दी असेल तेथें पोलीस कांहीं झालें तरी अवश्य आहेत; पण काहीं चौक असे आहेत, कीं नागरिकांनीं आपण होऊन वाहनांचा कायदा पाळावयाचें ठरविलें तर तेथें पोलिसाची गरज राहणार नाही. पण दडपून दुसऱ्या बाजूनें जाण्यांत आपल्याला गंमत वाटते; कायदा आपण होऊन पाळण्यांत मेंगळटपणा वाटतो. हिंदुस्थानांतल्या सर्व शहरांतील अशा चौकांचा हिशेब केला तर या अनावश्यक पोलिसांसाठीं आपला एक कोटी रुपये दरसाल खर्च झाला, असा हिशेब

होतो ! हा हिशेब गमतीचा आहे असें मीं वर म्हटले. वास्तविक तो प्राण-घेणा हिशेब आहे; पण विद्यार्थ्यांना ती गंमत वाटते. म्हणून त्याला गमतीचा हिशेब असें म्हटलें आहे.

## आत्म्यास साक्ष ठेवून

सध्यां सरकारनें देशांत समृद्धि निर्माण करण्यासाठीं अनेक योजना आंखल्या आहेत; पण एकहि योजना यशस्वी होत नाहीं ! याच्या कारणांचा आपण विचार केला पाहिजे. कूळकायदा, ग्रामपंचायतीची स्थापना, अनेक प्रकारच्या सहकारि संस्थांची स्थापना, साक्षरताप्रसाराची मोहीम, अन्नधान्याची मोहीम, ग्रामविकासयोजना, पाटबंधाऱ्यांच्या योजना, आरोग्यकेंद्रें—अनंत प्रकारच्या योजना आहेत; पण बहुतेक सर्व अयशस्वी होत आहेत. हें अपयश पाहून त्याचें खापर सर्वस्वी सरकारच्या माथीं फोडण्याची चाल सर्वत्र रूढ आहे. या टीकेंत मुळींच अर्थ नाहीं असें मला म्हणावयाचें नाहीं. सत्तारूढ पक्षावर जनतेनें टीकेचें शस्त्र कायम धरणें लोकशाहींत अवश्य आहे यात शंकाच नाहीं; पण तितक्याच कठोरपणें तें शस्त्र स्वतःवर धरण्याची लोकशाहींत जास्त आवश्यकता असते हें मात्र आपण सोयिस्कर रीतीनें निरागस, निष्पाप चेहरे करून विसरून जातों !

यापुढें सरकारनें प्रत्येक व्यक्तीला अन्न, वस्त्र, आरोग्य, शिक्षण व घर दिलेंच पाहिजे, ही अपेक्षा आपल्या चित्तांत जागरूकपणें वास करीत असते, आणि तिचा आविष्कारहि आपण वेळींअवेळीं करीत असतों; पण लोकांच्या या राज्यांत प्रत्येक व्यक्तीनें निरलसपणें, प्रामाणिक बुद्धीनें, जनहितबुद्धि जाग्रत ठेवून, सामाजिक प्रबुद्धतेनें, पोलिसाच्या दंड्याची अपेक्षा न ठेवतां केवळ आत्म्याच्या साक्षीच्या प्रेरणेनें अहोरात्र कष्ट केले पाहिजेत, ही जाणीव त्या अपेक्षेबरोबर तितक्याच जागरूकपणें आपण बाळगीत नाहीं ! कोणत्याहि देशांत गेलात तरी सरकार या संस्थेला कांहींसें जड यंत्राचें स्वरूप येणें अपरिहार्य आहे. त्यात निरतर चैतन्य खेळत ठेवण्याची जबाबदारी लोकनिष्ठ,

स्वावलंबी संस्थांची आहे. ' स्टेट ' व ' सोसायटी ' या शब्दांत एका पंडितानें असा फरक केला आहे: सरकारच्या सत्तीच्या नियंत्रणाखालीं कारभार करणारा समाज म्हणजे ' स्टेट ' आणि स्वतःच्या जबाबदारीनें, स्वावलंबनानें चालणारा समाज म्हणजे ' सोसायटी. ' असा फरक सांगून तो पंडित म्हणाला कीं, " ब्रिटन हें नऊदशांश सोसायटी आहे व एकदशांश स्टेट आहे." ब्रिटनमध्यें लोकशाही यशस्वी होते यातील रहस्य हें आहे.

## हे भावी पिढीचे शिल्पकार !

ब्रिटनमधील सत्य-युगांतील गोष्टी ऐकून तसे प्रयोग येथें करावे असें कधीं कधीं कोणाच्या मनांत येतें. ब्रिटनमध्ये वर्तमानपत्रें विकणारे लोक पत्राचा गठ्ठा रस्त्याच्या कडेला ठेवून शेजारीं पैशासाठीं एक पेटी ठेवतात; स्वतः विकण्यासाठीं बसत नाहींत. पण लोक हवें तें वृत्तपत्र घेऊन प्रामाणिकपणें पेटींत त्याचे पैसे टाकतात, अशी आख्यायिका आहे. मुंबईला असा प्रयोग परवां करण्यांत आला तेव्हां वृत्तपत्रांचा गठ्ठा व पेटी दोन्ही चोरीस गेलीं ! परवांच केंब्रिजला गेलेल्या एका विद्यार्थ्याचें पत्र आलें. त्यांत त्यानें लिहिलें आहे कीं, तेथें ग्रंथशाळेंत पुस्तकें देण्याघेण्यास, नोंदण्यास कारकून ठेवलेला नसतो; विद्यार्थ्यांना पूर्ण मोकळीक असते. पुस्तक घ्यावें, स्वतः नोंद करावी, घेऊन जावें, काम झाल्यावर परत करावें, सही करावी. तसे येथें केलें तर आमचे विद्यार्थी ' सरस्वती 'वर सध्याच्या दसपट प्रेम करूं लागतील ! आणि दुसऱ्या दिवशीं सरस्वतीचे रूपातर लक्ष्मींत करून ग्रंथशाळेंत कारकुनाची गरज नाहीं हें कलम केंब्रिजच्या बरोबरीनें सिद्ध करून दाखवितील !

सरकारवर टीका करण्यापूर्वी प्रत्येकानें हें आत्मचरित्र वाचलें तर सरकारवर टीका करण्याची गरज फारशी राहणार नाहीं. येथला अमुक एक वर्ग या वृत्तीचा नाहीं असें नाहीं. ' मी स्वतः पाहात आहें, तेव्हां अपकृत्य करूं नये ' इतकी स्वतःविषयीं उच्च भावना येथें निर्माणच झालेली नाहीं. विद्यार्थ्यांच्याच गोष्टीची जरूर नाहीं. परवां दिल्लीला राष्ट्राध्यक्षांनीं शिक्षकां-

विषयीं आपुलकी वाटून, ते भावी पिढीचे मार्गदर्शक आहेत, शिल्पकार आहेत हें जाणून चार हजार प्राथमिक शिक्षकाना राष्ट्रपतिभवनांत निमंत्रण दिलें. त्या वेळीं या ' शिल्पकारां ' नीं तेथल्या मूळच्या शिल्पकलेवर पानतंबाखूच्या पिचकाऱ्या टाकल्या, सामानाची खराबी केली आणि बऱ्याच कपबशा फोडल्या ! ते परत गेल्यावर शिक्षणखात्याच्या अधिकाऱ्यामार्फत या मार्ग-दर्शकाना तंबी देऊन अध्यक्षांना मार्गदर्शन करावें लागलें ! आगरकरांनीं म्हटलें आहे, कीं " नियमन आणि संवर्धन हीं सरकारचीं दोन कामें; ज्या देशांत नियमनांतच सर्व शक्ति खर्च होते–म्हणजे जेथें लोक फौजदारनिष्ठ आहेत–तेथें संवर्धनाला शक्ति शिल्लक राहात नाहीं व देशाची प्रगति होत नाहीं."

## मनोभूमीची नवी मशागत

वर्षानुवर्षे आपण आपल्या शेतांत एक पीक काढीत राहिल्यानंतर पुढें त्याच जमिनींत निराळें पीक काढण्याचा जर आपण विचार केला तर आपली जमीन कसण्याची व मशागतीची पद्धत सर्वस्वी बदलणें अवश्य आहे हें कोणालाहि पटण्याजोगें आहे. खत बदलावें लागेल, पाणी कमीजास्त करावे लागेल, बांध उंच किंवा खालपट करावे लागतील, नांगरट जास्त खोल करावी लागेल, पिकांचा हंगाम बदलणें भाग पडेल–असे अनेक प्रकारचे बदल करावे लागतील. त्याच-प्रमाणें शतकानुशतकें ज्या भूमींत आपण राजसत्तेची प्रस्थापना केली होती, त्याच भूमींत आतां लोकसत्तेची उभारणी करतांना या नव्या रोपाची मशागत व त्याची जपणूक करण्याची पद्धत सर्वस्वी निराळी असली पाहिजे हें अगदीं सहज ध्यानांत येण्याजोगें आहे. येथे आपणांस लोकशाहीच नव्हे तर समाज-वादी लोकशाही स्थापावयाची आहे !

सोव्हिएट रशियांत समाजवाद आणावयाचें ठरलें व त्याची पहिली पायरी म्हणून उत्पादन-साधनांवरील धनिकांचें स्वामित्व नष्ट करण्यांत आलें. पण ही फक्त बाह्य घडामोड झाली. आंतरिक घडामोड कोणती करावी लागली ?

कारखाना काढावा, माल खपवावा, भांडवल गुंतवावें, बाजारपेठ शोधावी, स्पर्धेला तोंड द्यावें, जगभर हिंडावें हा व्याप फार प्रचंड आहे; हा करावयाचा तर त्याला पैशाचें, फायद्याचें तसेंच जबरदस्त विलोभन हवें; तें नसेल व उत्पादनसाधनें घेतल्यावर मी नुसता पगारी नोकरच राहणार असेन, तर मीं इतका प्रचंड व्याप काय म्हणून करावा, असा प्रश्न येतो. त्याला उत्तर दिलें नाही, म्हणजे दुसरें तसेंच विलोभन निर्माण केलें नाहीं तर मनुष्य काम करण्यास, जीव पणाला लावून कष्ट करण्यास तयार होत नाहीं ! रशियातील मनुष्य याला अपवाद नव्हता, यामुळे तेथें भयानक अशी जुलमी राजवट निर्माण झाली. सध्या भारतापुढें तशीच बिकट समस्या येऊन पडली आहे. येथें लोकशाहीसाठीं अवश्य अशी जी वृत्ति समाजात निर्माण होणें अगत्याचें आहे, ती वृत्ति आपण स्वतः होऊन निर्माण करणार आहोंत कीं येथेंहि या दंडाची, हुकूमशाही दंडुक्याची अपरिहार्यता भासणार आहे ही ती समस्या आहे. आपण आपला सर्वस्वी कायाकल्प करून घेतला तरच आपल्याला भेडसावणारी यमदंडाची आपत्ति टळण्याचा संभव आहे. आपल्या मनाची मशागत अगदीं निराळ्या पद्धतीनें आपण केली तरच हे नवें पीक भरघोंसपणें आपणांस काढतां येईल.

फार पुरातन काळापसून आपण स्वतःला समाज असें म्हणवीत आहों. भारतीय समाज, हिंदुसमाज, आर्यसमाज असा आपण इतिहासांत स्वतःचा निर्देश केला आहे, आणि भाषेच्या सोयीच्या दृष्टीनें तें योग्यच आहे. मला सांगावयाचें आहे तें हें, कीं असा 'समाज' म्हणून जरी आपण स्वतःचा निर्देश करीत असलों तरी सामुदायिक जीवनाची कसलीहि जाणीव निर्माण करण्याची आपण खटपट केलेली नाहीं. आपण एकमेकांच्या शेजारीं राहात होतों, एका भूमीवर वाढत होतों इतकेंच. सर्व समाजाच्या अन्नवस्त्राची, विद्येची, संस्कृतीची, नीतिअनीतीची चिंता वहाण्याची पद्धतच कधीं निर्माण झाली नव्हती. सार्वजनिक कार्यें सर्व राजानें करावयाचीं अशी रूढि होती. हें येथेंच होतें असें नाहीं; सर्व जगभरच तसें होतें. युद्धाच्या काळींच फक्त सामुदायिक

जीवनाची जाणीव आपणांस होत असे आणि तीहि फार मर्यादित. कारण आपण लढाया करीत होतों ते राजाचे पगारी नोकर म्हणून. पूर्वीं सर्व सैन्यें भाडोत्रीच असत. अशा या जीवनाच्या पातळींतून पूर्ण सामुदायिक जीवनाच्या पातळीवर आपणांस आतां चढावयाचें आहे. लोकशाही, समाजवादी लोकशाही याचा हाच अर्थ आहे. आणि सहकारी तत्त्वावर सामाजिक जीवन निर्माण करणें हें यापुढें आपलें ध्येय असलें पाहिजे.

## सहकारी वृत्तीची जोपासाना

ब्रिटनमध्यें पांचशें वर्षे प्रयत्न करून ठेचा खात, प्रयोग करीत, तत्त्वें ठरवीत, सिद्धांत बांधीत या प्रयत्नांत लोकांनीं पुष्कळच यश मिळविलें आहे; पण त्याला पांचशें वर्षे लागलीं. रशियांत तें कार्य दंडसत्तेनें अल्प कालांत सिद्ध झालें आहे असें म्हणतात. ब्रिटनइतका कालावधि न लावतां आणि दंडसत्तेचा आश्रय न करतां आपल्याला तें साधेल का, हा प्रश्न आहे. सरकारनें खेडेगांवच्या आर्थिक व्यवहारासाठीं शेकऱ्यांना कर्ज, तगाई सुलभपणें मिळावी म्हणून अनेक ठिकाणीं सहकारी पतपेढ्या स्थापन केल्या; पण लोकांनीं त्या सर्व विफल करून टाकल्या आहेत ! आणि आपलें उद्दिष्ट तर असें आहे, कीं केवळ आर्थिकच नव्हे, तर आपले सर्वच व्यवहार सहकारी पद्धतीनें व्हावे. शेती, उत्पादित मालाची खरेदी-विक्री, गांवांतलि घरें, रस्ते, पाटबंधारे यांची बांधणी—सर्व, सर्व व्यवहार सहकारी पद्धतीनें झाले तरच लोकशाहीला अवश्य तें विपुल धन निर्माण करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं येईल. सध्यां विपुल धन निर्माण झाल्यानंतर समाजानें ज्या आकांक्षा धरावयाच्या तेवढ्या मनांत बाळगून त्या पुऱ्या झाल्या नाहींत तर संग्राम करावा अशी वृत्ति तेवढी तयार झाली आहे ! विपुल धन निर्माण करण्यास अवश्य तें सहकारी जीवन निर्माण करण्याचा प्रयत्न मात्र आपण करीत नाहीं.

सहकारी पद्धतीच्या जीवनाचीं कांहीं उदाहरणें प्रत्यक्ष पाहिल्यावांचून त्याची कल्पना येणार नाहीं. सुदैवानें आपल्या देशांत ही कल्पना रुजत जाऊन

कोठें कोठें तसे प्रयत्न सुरू झाले आहेत. इतर ठिकाणीं हीं उदाहरणें उद्‌बोधक ठरतील म्हणून त्यांचा निर्देश करीत आहें.

खानदेशांत धुळ्याजवळ मोरणें या गांवीं दशरथ पाटील यांनीं या तऱ्हेचा एक उत्कृष्ट प्रयोग केला आहे. दुष्काळाच्या आपत्तीला तोंड देण्यासाठीं त्यांनीं गांवाजवळचा नकाण्याचा कोरडा पडत चाललेला तलाव सहकारी शेतीसाठीं घेतला व त्यांतील पन्नास एकरांची सहकारी पद्धतीनें मशागत करून आतां त्यांत पिकें उभीं केलीं आहेत. जमिनीची साफसफाई, नांगरट, पेरणी वगैरे सर्व कामें सर्व गांवानें केलीं आहेत. पांच रुपयांचा एक असे २०० भाग काढून जमलेल्या भांडवलाच्या रूपानें प्रारंभींचा खर्च करण्यांत आला आहे. पिकांची रखवाली सगळा गांव अशाच सहकारी पद्धतीनें करीत आहे. त्यामुळें चोरीमारीचा, पिकें कापलीं जाण्याचा संभव नाहीं.

सिंहगडच्या पायथ्याशीं असलेल्या खानापूर गांवीं डॉ. मोडक यांच्या नेतृत्वाखालीं गांवकऱ्यांनी आज दहाबारा वर्षे सहकारी पद्धतीनें श्रम करून रस्ते, देवालयें, शाळा अशीं जवळजवळ पन्नास हजार रुपयांचीं कामें केलीं आहेत.

पुण्याचे सुप्रसिद्ध चित्रकार गोंधळेकर यांनीं कांहीं मित्रांच्या साह्यानें ‘ नवा गांव ’ नांवाची संस्था स्थापन केली आहे. वाल्हें या गांवीं नुकतेंच त्यानीं तेथील वस्तूंचें एक प्रदर्शन भरविलें. त्यामुळे गांवकऱ्यांच्या सहकारी वृत्तीला चालना मिळून आतां सहकारी पद्धतीनें गांवाजवळ बंधारा बांधण्याची योजना ते आंखीत आहेत.

उत्तर प्रदेशांतील बातमी वर्तमानपत्रांत आली आहे. ती फारच आशा-दायक आहे. लोकसत्ताक-सप्ताहांत त्या राज्यांतील २० लक्ष लोक सामील झाले होते. त्यांनी या पद्धतीनें ७८०० मैल लांबीचे रस्ते बांधले, २४३ तळीं बांधलीं, अनेक विहिरी खणल्या, कालवे खोदले आणि शाळा, देवालयें यांसाठीं अनेक इमारती बांधल्या.

**मानवतेचा साक्षात्कार**

ही वृत्ति प्रसृत झाली तर आज सरकारी साहाय्यावांचून अडून पडलेलीं

अनत कामें भराभर सिद्धीस जाऊन आपल्या देशांत विपुल धन निर्माण होईल. पण या पद्धतीने कामें झाल्यास सर्वांत मोठा फायदा होईल तो हा, कीं लोकशाहीला अवश्य तो नवा माणूस, नवा नागरिक यांतून निर्माण होईल. आपल्या जीवनाचे कायदे दुसऱ्या कोणीं करून ते [illegible] क्तीनें पाळून घेणें याचें नांव पारतन्त्र्य आणि आपले कायदे आपणच करून ते स्वखुषीनें पाळणें याचे नांव स्वातंत्र्य. प्रत्येक गांवी पाटबंधारे, शेती, शाळा आणि गांवाचा सर्व कारभार सहकारी पद्धतीनें होऊं लागला तर स्वातंत्र्याचा खरा अर्थ लोकांना कळेल. एवढेंच नव्हे, तर त्यांच्या आचरणांत येईल आणि या प्रयत्नांतच जातिभेद, वर्गभेद, गांवांत विनाकारण माजलेल्या फळ्या यांचा लोप होईल. रिकामपणामुळें, दारिद्र्यामुळें, गटबाजीमुळे निर्माण होणारे अनेक दुर्गुण नाहींसे होतील, आणि माणसाचा पुनर्जन्म होईल. सहकारी पद्धतीचें सर्वांत जास्त महत्त्व असेल तर तें यासाठीं आहे.

जबाबदारीची जाणीव, अहोरात्र केलेले कष्ट आणि समोर दिसणारी सुबत्ता यांमुळे मनुष्याच्या वृत्तींतील हीन गुण जळून जाऊन त्याचे सत्त्वगुण वाढीस लागतात. आणि सहकारी पद्धतींत हे सर्व गुण एकवटलेले असल्यामुळे तिच्या आश्रयानें आपली लोकसत्ता अगदीं अल्पावकाशांत सार्थ होण्याची शक्यता आहे. दडसत्तेचा आश्रय न करतां आणि प्रदीर्घ कालावधि न लावतां या देशांत समृद्धि व स्वास्थ्य निर्माण करून येथील लोकसत्ता सार्थ व समर्थ कशी करावी ही भारतापुढें येऊन पडलली समस्या या एकाच मार्गानें सोडवितां येईल.

पण त्यासाठीं आपल्यापैकीं प्रत्येकाच्या वृत्तींत पालट झाला पाहिजे. आपण स्वतः आपल्याला पहात आहों ही भीति पुरेशी असली पाहिजे. आपल्या नीतीचे, कर्तव्यबुद्धीचे, समाजहिततत्परतेचे आपले आपणच संरक्षक आहों, त्यासाठीं पोलिसाची आवश्यकता नाहीं अशी भावना आपल्या मनात उदित झाली पाहिजे. सध्यां पोलीस शिपायाला आपण स्वतःपेक्षां श्रेष्ठ मानतो; त्याला भितों. त्याऐवजीं स्वतःला श्रेष्ठ मानून आपण आपल्याला भिऊं लागलों तर लोकशाहीच्या नवयुगास भारतांत प्रारंभ होईल यात कसलाहि संदेह नाहीं.

---

एप्रिल १९५२

## ९. चवथ्या दशांशाची दक्षता !

१८७० सालीं सप्टेंबर महिन्यांत फ्रान्सच्या उत्तरपूर्वेस असलेल्या सेडान या गांवाजवळ जर्मनी व फ्रान्स या दोन देशामध्यें अत्यंत घनघोर असा संग्राम झाला. या संग्रामांत फ्रान्सच्या सर्व सेना धुळीस मिळून त्या राष्ट्राचा अगदीं निःपात झाला. या प्रबळ अशा राष्ट्राची अशी अवस्था कां झाली हें पहाणें फार उद्बोधक होईल असें वाटतें.

१४ जुलैला फ्रेंच सेना पॅरिसहून निघाल्या तेव्हां त्यांचा उत्साह कांहीं अपूर्वच होता. सैनिकाच्या तोंडून निघणाऱ्या ‘ चलो बर्लिन, चलो बर्लिन ’ या घोषणानीं आकाश कोंदून गेलें होतें. सेनानींनाहि आत्मविश्वास होता आणि आपण बर्लिनचा पाडाव करून जर्मनीला जमीनदोस्त करूं याबद्दल कोणालाच शंका नव्हती. बादशहा तिसरा नेपोलियन मोठ्या दिमाखानें आघाडीकडे निघाला. ‘ आपण तेथें पोंचण्याच्या आधींच मेट्झच्या छावणीवर आम्हीं ४ लक्ष सैन्य जय्यत तयार ठेवतों, ’ असे त्याच्या सेनापतींनीं त्याला आश्वासन दिलें होतें.

पण बादशहा मेट्झला येऊन पोंचला तेव्हां तळावर दोन लक्षच फौज आलेली त्याला दिसली. यामुळें तो संतापला. पण संताप तसाच गिळून आलेल्या सेनेची व्यवस्था तरी नीट आहेना हें पहाण्यासाठीं तो शामियान्यातून बाहेर पडला. सगळ्या छावणीभर फेरी झाली, तरी सैन्याच्या रोटीची व्यवस्था त्याला कोठेंच दिसली नाहीं, म्हणून त्यानें चवकशी केली. कोठीच्या अधिकाऱ्याने घाबरत घाबरत येऊन सागितलें कीं, दाणागोटा आहे पण तो वीस मैलांवर आहे. ‘ आतांच्या आता दोन तासात ‘ शिदोरी ’ येथें आणवा, ’ असें बादशहानें वहातूक-अधिकाऱ्यास सागितलें. थोड्या वेळानें परत येऊन त्यानें सांगितलें कीं, ‘ सरकार, मालगाडीच्या वाघिणी आहेत, पण त्या येथून तीस मैलांवर आहेत.’ बादशहाचा संताप अनावर झाला. दोन लक्ष लोकांना उपाशी ठेवावयाचें कीं काय ? वाघिणी असलेल्या ठिकाणीं तारा गेल्या

तेथील अधिकाऱ्यानें कळविलें कीं, ‘ वाघिणी आहेत, पण त्यांना चार्के नाहींत ! ’ आतां बादशहा हतबुद्धच झाला. शेवटीं, तोफखान्याचे घोडे सोडून ते गाड्यांना जोडून दाणागोटा आणावा, असा त्यानें हुकूम दिला.

मग लढाईची व्यवस्था पहावी असें त्याच्या मनांत आलें. या वेळीं सैनिकांना ‘ ब्रीच लोडिंग ’ या नांवाच्या अगदीं नव्या तऱ्हेच्या बंदुका देण्यांत आल्या होत्या. या त्या काळीं प्रचलित असलेल्या इतर कोणच्याहि बंदुकां-पेक्षां जास्त मारक होत्या. त्या हातीं देऊन संचलन करण्यास सांगा, असें त्यानें फर्माविलें. बंदुका घेऊन सैनिक उभे राहिले. बादशहा तपासणी करूं लागला. सैनिकांनीं बंदुका अशा अजागळासारख्या धरल्या होत्या कीं बादशहाला अनेक शंका येऊं लागल्या. म्हणून त्यानें चारपांच सैनिकांना विचारलें. ते म्हणाले ‘ या बंदुका आजच प्रथम आमच्या हातीं दिलेल्या आहेत. आम्ही यापूर्वीं त्या केव्हांच पाहिल्या नव्हत्या; त्या कशा धरावयाच्या व चालवावयाच्या याची आम्हांला कांहीं कल्पना नाहीं. ’ बादशहा संतापानें लष्करी अधिकाऱ्याकडे पाहूं लागला. खालीं माना घालून ते म्हणाले, ‘ सरकार, तें शिकवावयाचें राहून गेलें आहे.’

‘ मग सर्व उद्योग सोडून आज रात्रभर तें शिक्षण आधीं द्या.’ बादशहानें आज्ञा दिली.

‘होय सरकार.’ माना जास्तच खालीं घालून लष्कराधीश म्हणाले, ‘ पण... पण...या बंदुकाचे तज्ज्ञ शिक्षक छावणीवर नाहींत. त्यांना कांहीं दुसऱ्या कामासाठीं बोर्डोला ( फ्रान्सच्या दुसऱ्या टोकाला ) पाठविलें आहे.’

निराशा, भीति, संताप यांनीं बादशहा पराकाष्ठेचा खवळून गेला. त्याचें मस्तक बधिर होऊन गेलें. तो तसाच छावणींत गेला. बिछान्यावर अंग टाकल्यावर आपली सध्यांची भौगोलिक अवस्था तरी काय आहे हें पहावें असें मनांत येऊन त्यानें फ्रान्सचे लष्करी नकाशे मागविले. त्या अधिकाऱ्यानें येऊन सांगितलें कीं, ‘ जर्मनीवर चढाई करावयाची, बर्लिनवर चालून जावयाचें

असा बेत निश्चित झाला असल्यामुळें आम्ही फक्त जर्मनीचे नकाशे बरोबर आणलेले आहेत. फ्रान्सचे नकाशे लष्करावरोबर आणलेलेच नाहींत.'

फ्रेंच लष्करांत असा गोंधळ होता. उलट जर्मन सेना यंत्रासारख्या हलत होत्या. बिस्मार्क, रून व मोल्टके यांच्या योजना ठरलेल्या होत्या, मार्ग आखलेले होते व धोरणें निश्चित झालेलीं होतीं. कल्पनाशक्ति, निश्चय, साहस या गुणांनीं त्यांचे अधिकारी संपन्न होते. फ्रान्स व जर्मनी यांच्या या संग्रामाचें पर्यवसान काय झालें तें जगाला माहीतच आहे. सेडानला लढाई झाली नाहीं, कत्तल झाली, असें इतिहासकार म्हणतात.

आपल्या देशांतल्या कोणच्याहि संस्थेच्या कारभाराकडे पाहिलें म्हणजे मला सेडानच्या लढाईतल्या फ्रेंचांच्या मेट्झच्या छावणीची आठवण होते. येथल्या म्युनिसिपालिट्या, येथलीं विद्यापीठें, एस्. एस्. सी. बोर्डासारखीं परीक्षामंडळें, पोष्टासारखीं खातीं, नित्य नवीन निघणाऱ्या कंपन्या, कारखाने, बँका, निरनिराळे क्रीडासंघ यांचे कारभार पाहिले म्हणजे असें वाटतें कीं, दुर्दैवानें आपल्यावर एखाद्या युद्धाची आपत्ति ओढवली तर आपली स्थिति या फ्रेंच सेनेसारखी झाल्यावांचून रहाणार नाहीं. कर्तृत्व, कार्यक्षमता, व्यवस्था यांचा आणि आपला सात जन्मांत कधीं संबंध आला होता की नाहीं अशी शंका यावी अशीच आपली सध्यां स्थिति झाली आहे. आपल्याठायीं उत्साह भरपूर आहे, थोडा जास्तच आहे ! आपल्या आकांक्षा फार मोठ्या आहेत. आपण लवकरच जगाला मार्गदर्शन करून त्याच्या गुरुस्थानीं आरूढ होणार आहोंत. अध्यात्मिक सामर्थ्यानें तर आपण फारच संपन्न झालेले आहों आणि त्यामुळें युरोपच्या भौतिक सामर्थ्याला वाकुल्या दाखविण्याचा कार्यक्रम रोज आपण एकदां तरी करतोंच. तेव्हां उत्साह, आकांक्षा, दिव्यदृष्टि, अध्यात्मिक बल इत्यादि गुणांची श्रीमंती आपल्या ठायीं आलेली आहे; पण असें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, हे गुण फ्रान्सजवळहि होते, तरी त्याची धूळधाण झाली. तेव्हां ऐहिक, व्यावहारिक यशाचा व या गुणांचा संबंध फार थोडा असावा असें वादापुरतें तरी आपण मान्य केलें पाहिजे.

या कर्तृत्वहीनतेची, नालायकीची, नादानीची चिकित्सा करताना एक गोष्ट ध्यानीं धरली पाहिजे कीं, या बाबतींत केवळ नेते, अधिकारी किंवा त्या त्या स्थानावरचे सूत्रधार यांना दोष देऊन स्वस्थ बसणें हें युक्त नाहीं. अपयशाचा मोठा वांटा त्यांच्या माथीं जाईल हें खरें; पण एवढेंच म्हणून भागणार नाहीं. दर क्षणाला पन्नास घटना घडत असतात आणि त्यांची जबाबदारी व चिंता निरनिराळ्या अधिकाऱ्यांकडे सोंपविलेली असते. या अधिकाऱ्यांनीं आपापल्या कार्यालयापुरती कामाची वांटणी शेवटच्या कारकुनापर्यंत केलेली असते. धोरण आखणें, दिशा ठरविणें, योजना करून देणें हा कोणत्याहि कार्याचा एक भाग असतो आणि योजनांप्रमाणें उठाव करणें हा त्याचा दुसरा भाग असतो. दुर्दैव असें कीं, आपल्या देशात या दोन्ही भागांत कार्यक्षमतेचें दारिद्र्यच आहे. पण हें मान्य केलें तर उत्तर भागांतील कार्यक्षमतेची जी उणीव, जें दारिद्र्य, त्याचें अपश्रेय बहुसंख्य जनतेकडेच जाईल. तेव्हा चिकित्सा करताना सर्वांनीं अंतर्मुख दृष्टि ठेवली पाहिजे हें उघड आहे.

चिकित्सा करूं लागतांच आपल्यातील पहिला मोठा दोष माझ्या ध्यानात येतो तो असा: माणसाच्या अंगचा प्रत्येक गुण हा कोणत्या तरी विशिष्ट वृत्तींतून निर्माण होत असतो आणि ही वृत्ति त्याच्या मनावर ज्या तत्त्वज्ञानाचा पगडा असतो त्यांतून उद्भूत होत असते. साहस, अविरत संग्राम करण्याची चिकाटी इत्यादि गुण युरोपीय लोकांत दिसतात ते त्यांच्या भौतिकवादावरील निष्ठेमुळें व ऐहिकावरील प्रेमामुळे निर्माण झालेले आहेत. हें प्रेम नाहीं म्हणजे हे गुण नाहींत, किंवा असलेच तर फार अल्प प्रमाणांत, निजोर अवस्थेंत असावयाचे. कार्यक्षमता या गुणाचें असेच आहे. त्याचें मूळ अशाच एका तत्त्व-ज्ञानांत आहे आणि त्याच्या अभावाकडे मला वाचकांचें लक्ष वेधावयाचें आहे.

कोणत्याहि कार्याचें यश हें योजना, आंखणी, त्याची अंमलबजावणी, शिस्त, नियमितपणा, सावधता, शास्त्रीय व तांत्रिक ज्ञान, संघशक्ति यांवर

अवलंबून असण्यापेक्षां तें कार्य करणाऱ्याच्या मनाची शुद्धता, त्याचे उच्च संकल्प, त्याच्या हेतूची पवित्रता, त्याच्या मनांतील भूतदया, त्याचें श्रद्धायुक्त अंतःकरण, त्याचें निरागस, निष्पाप, बालसदृश मन यांवर अवलंबून आहे असा एक समज, अशी एक श्रद्धा आपल्या मनांत खोल मूळ धरून बसलेली आहे. मागल्या काळीं सर्व कांहीं परमेश्वरी कृपेवर, दैवाच्या अनुकूलतेवर आणि नशिबाच्या फांशावर अवलंबून आहे असा भाव होता, तो आतां नष्ट झाला आहे हें खरें; पण त्याच्या जोडीचा हा दुसरा समज, हा दुसरा भाव अजून नष्ट झालेला नाहीं. मनाची शुद्धता, निरागसता, एवढेंच नव्हे तर भोळेपणा, भाबडेपणा याची कांहीं विशेष महती आहे अशी आपली समजूत आहे. अध्यात्मामध्यें व परमार्थक्षेत्रात केवळ भोळ्या भावानें सिद्धि प्राप्त होते हें तर अनेक संतमहंतांनीं सांगितलेंच आहे. सर्व भारिभार पांडुरंगावर, गुरुचरणावर व संतावर घालून आपण निश्चित व्हावें; त्यांच्यावर श्रद्धा टेवणें, त्यांचे दास होणें एवढेंच आपलें काम अशी त्या क्षेत्रांत शिकवण आहे. तेथें भोळेपणा, भावडेपणा, श्रद्धाळूपणा, व्यवहारशून्यता हींच भूषणें मानलेलीं आहेत. 'तुका म्हणे आम्ही तुझीं वेडींवाकुडीं' याच वृत्तीचें तेथें माहात्म्य आहे आणि दुर्दैव असें कीं, ऐहिक क्षेत्रांतहि असा एक समज अगदीं उघडपणें नाहीं तरी आपल्या मनांत खोलवर कोठें तरी वास करून आहे. या गुणांना भोळेपणा, भाबडेपणा, अजागळपणा असे नांव दिलें तर आपण हें कबूल करणार नाहीं; पण निरागसपणा, बालभाव, श्रद्धाळूपणा हीं नांवें दिलीं तर आपल्या हें ध्यानांत येईल कीं, या गुणांचा मोह आपल्याला फार आहे. आपण प्रामाणिकपणें आपल्या मनाच्या सर्व विभागांचा शोध घेतला तर हे गुण असण्यांत आपण भूषण मानतों असें आपल्याला आढळून येईल. वास्तविक कार्यकर्त्या पुरुषाला, 'त्याचे मन बालसदृश आहे,' हें प्रशंसापर न वाटतां शिवीसारखें वाटणें अवश्य आहे; पण आपली दृष्टि तशी नाहीं.

येथें एक गैरसमज होण्याचा संभव आहे म्हणून खुलासा करतों. सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या ठायीं सचोटी, सत्प्रवृत्ति, संयम, निःस्वार्थबुद्धि, सेवावृत्ति, जनहितपरायणता हे गुण असले पाहिजेत याबद्दल वाद नाहीं. किंबहुना कार्यक्षमता, कुशाग्रता, सावधता, कारस्थानपटुता इत्यादि जे गुण वर सांगितले त्यांच्याहि आधीं निर्लोभवृत्ति, भूतदया, उदारदृष्टि हे गुण अवश्य आहेत; पण त्यांचा आणि आपण ज्यांवर आसक्त आहोंत त्या बालभावादि गुणाचा, श्रद्धेचा, आस्तिक्यबुद्धीचा कांहीं एक संबंध नाहीं. निर्लोभी, निःस्पृह, सत्प्रवृत्त असा माणूसहि दक्ष, कुशाग्र, कारस्थानी, कठोर असा असूं शकतो आणि असा तो असला तरच तो यशस्वी होतो. आपले दुर्दैव असें कीं, आपल्या ठायीं कार्यक्षमतेस अवश्य असणाऱ्या या दोन्ही प्रकारच्या गुणांचा अभाव आहे; पण त्याहून मोठें दुर्दैव असें कीं, पहिल्या प्रकारच्या गुणांची महती आपण जशी जाणली आहे तशी दुसऱ्या प्रकारच्या गुणांची जाणलेली नाहीं; किंबहुना त्यांचा काहींसा तिटकारा आपल्या मनात आहे आणि बालभाव, भोळेपणा, अजाण भावडी वृत्ति याचा मोह आपल्याला आहे. कांहीं जणांच्या मनांत असा अगदीं तिटकारा नसला तरी त्याचा असा समज आहे, कीं, हृदय निर्मळ असलें कीं निर्मळ बुद्धि ही प्राप्त होतेच होते. हे दोन्ही प्रकारचे गुण एकरूपच आहेत असें ते मानतात; पण ही भूमिका सुद्धां फार थोडया लोकांची आहे. बहुसंख्य लोकाना भोळेभाबडेपणाचेच महत्त्व विशेष वाटतें; बुद्धीच्या गुणांचें त्यांना वावडें आहे. असें जर नसेल तर पुढील उपदेशाची संगति तुम्ही कशी लावाल ?

एका फार मोठ्या संस्थेच्या प्रमुखानीं आपल्या अनुयायांना उपदेश करतांना असे उद्गार काढले : ‘ मला माणसे कशीं हवीं तें सागतों. रामकृष्ण परमहंस यांच्या जवळ एक सेवक होता. त्याला कागदावर ‘ अ ’ हें अक्षरसुद्धा काढतां येत नसे. कसलाहि व्यवहार त्याला समजत नसे. फुले आण म्हटलें फुलें आणावीं, पाणी आण म्हटलें पाणी आणावें आणि एरवीं रामकृष्णांच्या पायाशीं बसून रहावें अशी त्याची वृत्ति होती आणि रामकृष्ण त्याच्यावरच

खरे प्रसन्न असत. या रामकृष्णांच्या सेवकासारखे कार्यकर्ते मला पाहिजे आहेत. ' अजागळपणाची याहून जास्त प्रशंसा अन्यत्र कोठें सांपडेल का ?

भोळेपणा, साधेपणा, भाबडेपणा यांच्या या प्रशंसेचें बीज वर सांगितल्याप्रमाणें आपल्या परमार्थवृत्तींत, अध्यात्मवृत्तींत आहे. देव भावाचा भुकेला आहे, त्याला दुसऱ्या कशाचीहि गरज नाहीं आणि देवावांचून दुसरें कांहीं प्रासव्य नाहीं अशी आपली श्रद्धा असल्यामुळें कार्यक्षमतेला अवश्य असलेल्या गुणांची अवहेलना करण्यास आपण चटावलों आहों. केवळ श्रद्धा, पावित्र्य, हेतूची शुद्धता यांनीं कार्य होतें, यशप्राप्ति होते असा भ्रम आपण बाळगून आहों. दक्षता, तत्परता, कार्यकुशलता, व्यवस्था या गुणाचा आज अगदीं प्रत्यक्ष तिटकारा आपण करीत नाही; पण सार्वजनिक जीवनात लाच घेणें, वशिला लावणें, खोटे हिशेब लिहिणे हे भयंकर गुन्हे आहेत अशी जी आपली बुद्धि आहे ती बेसावधपणा, अजागळपणा, अनियमितपणा, भोंगळ कारभार याविषयीं नाहीं. पहिल्या गुन्ह्याना कायद्यात शिक्षा आहे; दुसऱ्याना कायद्यात तर नाहींच, पण जनमनांतहि नाहीं. वास्तविक, पहिल्यामुळें जनतेचें जेवढें नुकसान होतें, तिला जो त्रास होतो, यातना सोसाव्या लागतात तितक्याच यातना कार्यकर्त्यांच्या अंगच्या दुसऱ्या प्रकारच्या अवगुणामुळें सोसाव्या लागतात.

भोळेपणा, श्रद्धाळूपणा, बालवृत्ति यांची महती परमार्थप्रवणतेमुळें आधींच या देशांत फार होती. पाश्चात्याच्या आगमनानंतर भौतिकवादाच्या प्रसारामुळें, विज्ञानाच्या अभ्यासामुळें आणि ऐहिक आकांक्षाच्या वाढीमुळें तीं वास्तविक कमी व्हावयाची. तशी ती होतहि होती; पण इतक्यात अध्यात्मिकतेनें पुन्हा जोर केला. महात्माजींच्या अध्यात्मबलाचें राजकारण सुरू झालें आणि त्यामुळें पुन्हा निरागसपणा, बालभाव, श्रद्धा, अंतःकरणाची शुद्धता, आत्मनिष्ठा यांची महती वाढून कार्यक्षमतेच्या घटकगुणांची हेळसांड होऊं लागली. सुदैवानें महात्माजींचें अध्यात्म जुन्या संतांच्यासारखें नव्हतें. त्यांत ऐहिकाचा तिटकारा नव्हता, समाजाच्या उत्कर्षाविषयीं उदासीनता नव्हती, राष्ट्रीय आकांक्षां-

बद्दल पराङ्मुखता नव्हती. महात्माजी स्वतः श्रेष्ठ कर्मयोगी असल्यामुळें निवृत्तीचा त्यांच्या राजकारणाला वासहि नव्हता. त्याचप्रमाणें जुन्या संतांची अप्रतिकार वृत्ति त्यांत नव्हती. इतकेंच नव्हे तर प्राणपणानें अन्यायाचा प्रतिकार हाच त्यांचा संदेश होता. आणि प्रतिकाराची ही रग एका मदांध सत्तेशीं संग्राम करीत राहून त्यांनीं या भरतभूमींतील हीनदीन जनतेंत निर्माण केल्यामुळें आपलें राष्ट्र आज नभोमंडळांत उंचच उंच जाऊन बसलें आहे. जुन्या संतवृत्तींतल्या अध्यात्माचा निवृत्ति, अप्रतिकार, उदासीनता हा एक भाग महात्माजींनीं निखालस नष्ट केला. पण त्याचा दुसरा भाग म्हणजे बालभाव, श्रद्धा, नाममहिम्याचें श्रेष्ठत्व, प्रार्थनेची गुणावहता, बुद्धीच्या व तर्काच्या निर्णयाला कमी लेखून आत्म्याच्या हुंकाराच्या आज्ञा शिरसावंद्य मानण्याची वृत्ति—हा जो दुसरा घटक याचें महत्त्व त्यांनीं कमी तर केलें नाहींच तर उलट अनेक पटीनें वाढवून ठेविलें. आणि यामुळें आमच्या अंगच्या कार्यक्षमतेच्या गुणाला मोठा धक्का पोंचला असें माझें मत झालें आहे. आणि तें त्या महापुरुषाच्या चरणाशीं निवेदन करण्याची मी अनुज्ञा मागतों.

आपल्याला स्वातंत्र्य मिळालें त्याचें श्रेय कोणच्या शक्तीला जातें याची अनेकांनीं मीमांसा केली आहे. त्या मीमांसेचा विचार केला तर तो आपल्या विषयाच्या दृष्टीनें उद्बोधक होईल. कॉंग्रेसच्या बहुतेक सूत्रधारांचें, प्रवक्त्यांचें व अनुयायांचें मत असें आहे कीं, आपण अध्यात्मबलानें, सत्य-अहिंसेच्या बलानें स्वातंत्र्य मिळविलें आहे आणि म्हणून त्यांच्या मीमांसेंत सुभाषचंद्रांच्या प्रयत्नांना स्थानच नाहीं. कारण त्याचे प्रयत्न शुद्ध जडसामर्थ्यनिष्ठ होते. वास्तविक पहाता कॉंग्रेसनें व महात्माजींनीं या देशांतील असंख्य जनतेंत कायदेभंग, करबंदी, बहिष्कार याच्या साह्यानें जी अलौकिक व अभूतपूर्व अशी प्रतिकारशक्ति जागृत केली आणि एकराष्ट्रीयत्वाच्या व लोकशाहीच्या भावनेनें त्यांच्यात जी संघटना निर्माण केली ती आपल्या स्वातंत्र्याचा मुख्य आधार आहे. पण हें अगदी शुद्ध भौतिक बल आहे आणि केवळ या बळा-

मुळेंच स्वातंत्र्य मिळालें असें म्हटलें तर हिंदुस्थानला जगाचें गुरुस्थान मिळणार नाहीं, आणि काँग्रेसच्या राजकारणाचे अलौकिकत्व सिद्ध होणार नाहीं, अशी लोकांना चिंता वाटते आणि म्हणून आम्हीं सोसलेल्या आत्म-क्लेशामुळें आमच्या राज्यकर्त्यांच्या हृदयाचा पालट झाला, सत्याचा जय झाला, अहिंसा राजकारणांत आली आणि अध्यात्मबलानें आम्हांला स्वातंत्र्य मिळालें असा उद्‌घोष ते करतात. आध्यात्मिक शक्तींच्या या वल्गना इतके दिवस जरी मधुर असल्या तरी आतां स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या दोन वर्षांतल्या घडामोडी पाहिल्यानंतर त्या एकदम बंद होणें अवश्य आहे हे जितक्या लवकर आपण जाणूं तितका आपला उत्कर्ष जवळ येईल.

आपण क्लेश सोसावे व दुसऱ्याचें मन जिंकावें, त्याचा हृदयपालट घडवावा, सत्यानें असत्य जिंकावें, अध्यात्मबलानें भौतिक शक्तीला नामोहरम करावें असा महात्माजींचा प्रयत्न होता. गौतमबुद्ध, जीझस ख्राइस्ट यांचा असाच प्रयत्न होता आणि जगाच्या दुर्दैवाने गौतम—जीझसप्रमाणेंच महात्माजींचा प्रयत्न अयशस्वी झाला आहे ही गोष्ट दुःखद खरी, पण ती झटकन् आकलून आपण आपलें धोरण आंखलें पाहिजे.

येथले भांडवलदार, जमीनदार हे महात्माजींच्या सहवासांत असत. महात्माजींचा त्यांच्यावर विश्वास असे. बिर्लासारख्यांच्या घरीं ते उतरत. पण महात्माजींच्या दैवी, अध्यात्मबलाचा अणुमात्र तरी परिणाम त्यांच्यावर झाला आहे काय? आपल्या निर्लोभवृत्तीनें महात्माजींनीं त्यांची लोभवृत्ति जिंकली आहे काय? मुसलमानांचा हृदयपालट करण्यासाठीं महात्माजींनीं तीस वर्षे आत्मक्लेश सोसले. त्याचें फळ काय मिळालें हें सर्वश्रुतच आहे. हेंहि सोडून द्या. महात्माजींच्या सान्निध्यांत त्यांचे भक्त म्हणून आजचे काँग्रेस-मधील धुरीण गेलीं तीस वर्षे रहात होते. बहुतेक सर्व प्रांतांचा कारभार आज महात्माजींच्या या प्रमुख अनुयायांच्या हातींच आहे. या अनुयायांचा हृदय-पालट किती झाला आहे, त्यांच्यावर महात्माजींच्या पवित्र सद्‌गुणांचा, सत्य-अहिंसेचा किती संस्कार झाला आहे, त्यांच्या आध्यात्मिकतेची किती वाढ

झाली आहे हें मद्रास, बिहार, पूर्व पंजाब, बंगाल, राजस्थान, विंध्य, मध्यभारत येथील मंत्रिमंडळांच्या चारित्र्यावरून स्पष्ट झालें आहे. एकनिष्ठ अनुयायांचा सत्तालोभसुद्धां महात्माजींच्या अध्यात्मबलानें जिकला गेला नाहीं हें स्पष्ट दिसत असतांना ब्रिटिशांना आपण अध्यात्मबलानें जिंकलें, महात्माजींची अहिंसा राजकारणांत प्रभावी ठरली असा भ्रम आपण अजूनहि कायम ठेवावयाचा काय ? सर्व हयात ज्यांनीं महात्माजींच्या पुण्यमय सहवासांत घालविली ते सत्ताधारी होतांच पूर्वीं नसलेला द्रव्यलोभ व सत्तेची अनिवार आसक्ति त्यांच्या ठायीं निर्माण होते आणि जड सामर्थ्याचा, पाशवी बलाचा ते आश्रय करतात, हें दिसत असतांना शतकानुशतकें ज्यांनीं स्वसामर्थ्यानें सत्ता भोगली त्या ब्रिटिशांचा सत्ताभिलाष आपल्या अध्यात्मबलानें, आत्मक्लेशानें नष्ट झाला म्हणून त्यांनीं आपणांस स्वातंत्र्य दिलें असें समजणें हें आपल्या बालभावाला शोभेसें असलें तरी राष्ट्राला अत्यंत घातक आहे. सुभाषचंद्रांनीं हिंदी सैन्यांतूनच राष्ट्रीय सेना निर्माण केली आणि अशा रीतीनें ब्रिटिश राज्याचा मुख्य आधार म्हणजे हिंदी सेनेची ब्रिटिशनिष्ठा तीच नष्ट केल्यामुळें ब्रिटिशांचें कंबरडे मोडलें हें ॲटली, क्रिप्स यांनींहि बोलून दाखविलें आहे. अर्थात् याच्यामागें कॉंग्रेसनें निर्माण केलेली लोकजागृति, प्रतिकारशक्ति व राष्ट्रनिष्ठा नसती तर सुभाषचंद्रांना हें साधलें नसतें यांत वादच नाहीं. म्हणून मुख्य श्रेय कॉंग्रेसला व महात्माजींनाच आहे. पण तें त्यांच्या आध्यात्मिक बलाला नाहीं, त्यांनीं निर्माण केलेल्या शुद्ध भौतिक व बुद्धिगम्य सामर्थ्याला आहे.

हें आग्रहानें सांगण्याचें कारण असें कीं, हें जर आपण एकदां नीट जाणलें, आपण आध्यात्मिक बलानें, अहिंसेच्या सामर्थ्यानें, आत्मिक प्रभावानें स्वातंत्र्य संपादिलें नसून शुद्ध भौतिकबलाने तें संपादिलें आहे आणि ब्रिटिशांच्या-सारखे त्यांतल्या त्यांत विवेकी व शहाणा स्वार्थ जाणणारे राज्यकर्ते नसते तर यापुढले संग्राम इटली, रशिया, चीन यांच्याप्रमाणेंच आपल्यालाहि पाशवी बलानेंच करावे लागले असते, हें जर आपण उमजलों तर भौतिक दृष्टीनें विचार करून आपण राष्ट्रीय सामर्थ्याच्या सर्व अंगोपांगांची वाढ करण्याचा

झटून प्रयत्न करूं. पण तसें न करतां अध्यात्मबलाच्या भ्रमांतच आपण राहिलों तर आपल्या अर्गी कार्यक्षमता येण्याची कधींच आशा नाहीं.

कार्यक्षमता हें पाश्चात्य लोकांनीं एक शास्त्र करून टाकलें आहे आणि त्यांचें विजेचें शास्त्र, शेतीचें शास्त्र, अणूचें शास्त्र यांचें जर आपल्याला अनुकरण करतां येतें, तर या शास्त्राचें कां येणार नाहीं ? पण सध्यां आपलें तिकडे लक्षच नाहीं. आपण कोठल्यातरी भ्रमांत असल्यामुळें कर्तृत्वाची शास्त्रशुद्ध जोपासना करण्याचे प्रयत्नच आपण करीत नाहीं. इतकेंच नव्हे तर आपण त्याचें महत्त्वहि जाणलेलें नाहीं.

कर्तृत्वशास्त्राची रूपरेषा आपण अगदीं वरवर जरी पाहिली तरी आपल्या त्या क्षेत्रांतल्या दारिद्र्याची आपणास सहज कल्पना येईल. एखाद्या कार्याच्या सिद्धीसाठीं आपण जी नवी व्यवस्था घडवीत आहों, ज्या आज्ञा देत आहों, जे कायदे करीत आहों, त्यांचा राष्ट्रीय जविनाच्या प्रत्येक क्षेत्रांत कोणचा परिणाम होईल त्याचें कल्पनाशक्तीनें डोळ्यापुढें पूर्णचित्र उभें करणें व त्या सर्वांची अगाऊ पूर्ण व्यवस्था करणें हा कार्यक्षमतेचा पहिला गुण होय. पण आमच्या राज्यकारभारांत त्याचा गंधहि दृष्टीस पडत नाहीं. आज कायदा करावा आणि मग उद्यां ध्यानांत यावें कीं, अरे ! याला पांचशें अपवाद करणें अवश्य आहे. कायदा करण्यापूर्वी अनुभवानें पुढील परिस्थिति आकळण्याची पात्रता आम्हांत नाहीं. कामगारांना वांटावयाच्या पैशाविषयीं आज एक आज्ञा द्यावी व वांटण्याची वेळ आल्यावर त्यांतल्या अनंत भानगडी ध्यानात येऊन आज्ञा फिरविण्याचा प्रसंग यावा ! या भानगडींची आम्हांला अगाऊ कल्पना येत नाहीं. विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांनीं, वीसवीस वर्षे अनुभव घेतलेल्या अधिकाऱ्यांनीं अगदीं स्वतंत्र कमिट्या नेमून वेळापत्रकें तयार करून कॉलेज-वर लावून द्यावीं आणि मग ध्यानीं यावें कीं, अरे ! एका तासाला एकाच वर्गांत दोन शिक्षक धाडणें युक्त नाहीं ! नियंत्रणें उठविण्यापूर्वी त्याचा परिणाम काय होईल हें आम्हांला कळत नाहीं; उठविल्यानंतर कळतें. फितुरी होऊन

नाश झाल्यावर मग फितुरीची कल्पना येते आणि कत्तली झाल्यावर अशा प्रसंगीं कत्तली होतात हा बोध आम्हांला होतो. फाळणीच्या पूर्वी कत्तलींची कल्पना असती तर दहापांच लक्ष लोकांचे जीव वांचले असते असें अधिकाऱ्यांनींच मागून उद्गार काढले आहेत. पण परक्यांच्याबद्दल असा संशय घेणें आमच्या निरागस बालवृत्तीला शोभलें नाहीं.

कार्यक्षमता अंगी येण्यास कल्पनाशक्तीचें बळ किती मोठें असावे लागतें ते पहा. शिवछत्रपतींनीं आपल्या सैन्यासाठीं काढलेलीं कांहीं आज्ञापत्रें आतां उपलब्ध झालीं आहेत, त्यावरून हा गुण म्हणजे काय याची कल्पना येईल. सैन्य ज्या वाटेनें जाणार त्या वाटेला दुतर्फा शेतातून उभीं पिकें आहेत; त्यांचा आपले शिपाई एखादे वेळीं नाश करतील हें अगाऊ ध्यानीं येऊन त्याविषयीं आज्ञापत्रांत सक्त ताकीद दिली आहे. घोड्यांची व्यवस्था काय, गवतांच्या गंजींची व्यवस्था कशी, हेंहि तपशीलवार सांगून ठेविलेलें आहे. आणि रात्रीं छावणींत पणत्या लावतात, त्यांतील वाती उंदीर नेतात व त्यामुळें पुष्कळ वेळा गवताच्या गजी पेटून जनावरांना चारा रहात नाहीं म्हणून त्याविषयीं अधिकाऱ्यांनीं दक्षता घ्यावी हेंहि सांगण्यास छत्रपति विसरले नाहींत. राजाना कोणत्याच कार्यात अपयश आलें नाहीं, त्यांचा कधीं कोठें गोंधळ झाला नाहीं याचें कारण भवानीची कृपा किंवा राज्यांत चालणारा रामनामसप्ताह हें नसून कल्पनेचा व्याप, सावधता, दक्षता, कार्यकुशलता या गुणांची उपासना हें आहे.

पण हें सर्व सांगत असताना मला पुन्हां पुन्हां एक गोष्ट सांगावयाची आहे ती ही कीं, सध्या आपल्या समाजातील भिन्नभिन्न संस्थांत जी नालायकी, नादानी व कर्तृत्वशून्यता दिसून येते ती त्या त्या संस्थांपुरती किंवा तेथल्या अधिकाऱ्यांपुरतीच आहे अशा भ्रमांत आपण रहाणें धोक्याचें आहे. या संस्था म्हणजे सर्व समाजापुढें ठेवलेले आरसे आहेत. त्यांत आपलेंच प्रतिबिंब आहे हें सर्व समाजानें व विशेषतः सुशिक्षित बुद्धिजीवी मध्यमवर्गानें ध्यानांत

घेतलें पाहिजें. या वर्गाचे आम्ही लोक नांवाला फक्त सुशिक्षित आहोंत. मनानें, बुद्धीनें व म्हणूनच कर्तृत्वानें आम्ही जुन्या, भोळसट, भाबड्या व भोंगळ युगांतच असतों. शाळा-कॉलेजांत आम्हांला भूमिती, व्याकरण, विज्ञान इत्यादि अर्वाचीन विषय शिकवितात, पण त्यांपैकीं एकाचेहि संस्कार आमच्या मनावर झालेले नसतात. आमच्या शाळा-कॉलेजांतील विद्यार्थी हे खेड्यांतील मारुती-सारखे स्वयंभू, गोलसर व निराकार आहेत. नव्या युगाची छिन्नी त्यांच्या-वर चाललेली नाहीं. नव्या युगाचे संस्कार होऊन त्यांना आकार आलेला नाहीं. नव्या शेंदराचे लेपाटे त्यांच्यावर बसतात, नाहीं असें नाहीं; पण आंतले पहिले लेपाटे तसेच असतात. आणि त्यामुळें त्यांच्या बुद्धीवर एक जाड कवच येऊन बसलेलें असतें.

१८९४ सालीं लॉर्ड रॅले व सर विल्यम स्मिथ हे दोन शास्त्रज्ञ हवेच्या घटकांचीं मोजमापें घेत होते. त्याच त्याच मापाच्या ऑक्सिजन व नैट्रोजन या वायूंचीं त्यानीं अनेक वेळां वजनें घेतलीं. तीं अर्थातच जवळजवळ सारखीं आलीं; पण दरवेळीं चवथ्या दशांशांत फरक पडूं लागला. पण एवढ्या सूक्ष्म फरकानेंहि त्यांना बेचैन करून सोडलें. कारण ते शास्त्रज्ञ होते. नव्या युगांतले होते. मारुती नव्हते. जास्त अभ्यास करतां त्यांना आठवलें कीं, १७७५ सालीं कॅव्हेंडिश या शास्त्रज्ञानें वातावरणाच्या घटकांचें पृथक्करण करून अशींच वजनें घेतलीं होतीं व तीं नमूद करून ठेवितांना या प्रक्रियेंत मध्येंच एक लहानसा बुडबुडा दिसतो असें त्यानें लिहून ठेविलें होतें. यांना या चवथ्या दशांशांतील चुकीनें जसें अस्वस्थ केलें होतें त्याचप्रमाणें त्याला या बुडबुड्यानें केलें होतें; आणि याच धोरणानें जास्त संशोधन करतांना त्यांना ‘ अरगॉन ’ या वातावरणाच्या नव्या घटकाचा शोध लागला. चुका होत होत्या त्या त्यामुळें होत होत्या.

ही जी शास्त्रज्ञांची काटेकोरी, सूक्ष्मतम मोजमापें घेण्याची, पुन्हां पुन्हां तपासून पहाण्याची वृत्ति, चवथ्या दशांशाच्या चुकीचीहि उपेक्षा न करण्या-बद्दलची सावधता ती सध्यांच्या युगांत सर्व जीवनांत येणें अवश्य आहे.

त्यावांचून आमचे सार्वजनिक कारभार घड्याळाप्रमाणें सुयंत्र होणें अशक्य आहे. ही वृत्ति, ही सावधता आपल्या ठायीं आहे का, हें आमच्या विद्यार्थ्यांनीं तपासून पहावें. एकदां पास म्हणून जाहीर केल्यावर एस्. एस्.सी. बोर्डाचें किंवा विद्यापीठाचें मागून नापास म्हणून पत्र आलें, किंवा ८५ ऐवजीं ५५ गुण मांडले तर विद्यार्थ्यांना संताप येतो; पण ज्या कारकुनांनीं या चुका केल्या ते दोनतीन वर्षांपूर्वी असेच विद्यार्थी होते. त्यांचे पेपर तपासतांना आम्हीं असेच संतापत होतों व सध्यांहि संतापतों. उत्तरें पुन्हां पुन्हां तपासून चुका राहूं नयेत म्हणून दक्षता घेणारे, व्याकरण, भूमिति, विज्ञान यांचे केवळ सिद्धात न घोकतां मूलज्ञानापर्यंत जाण्याची हौस बाळगणारे, पेपरांत विचारलेले प्रश्न व लिहिलेलीं उत्तरें यांचा थोडा तरी संबंध असावा असें मत असलेले, बारा वाजतां यावयास सांगितलें असतां साडेबाराला येऊन पुन्हा मुळींच उशीर झाला नाहीं अशा भावानें न बसणारे—असे शेंकडा दोन सुद्धां विद्यार्थी सांपडत नाहींत. एम्. ए. चे पन्नास पेपर तपासून पाहतां असें आढळलें कीं, शब्दांची कांहीं जुळणी म्हणून असते, वाक्यांची कांहीं घडण असते व परिच्छेदाची कांहीं रचना म्हणून असते याचा कित्येक विद्यार्थ्यांना गंधसुद्धां नाहीं. ‘ ध्येयवादी पुरुषाच्या मार्गांत स्त्री धोंड आहे असा प्रवाद वामन-रावांच्या रागिणीमध्यें भय्यासाहेबांना थिऑसफीचें वेड असतें. ’ ‘ त्याची तिसरी कादंबरी इन्दु काळे व सरला भोळे ही तर विनायकराव, काशी ढवळे, पाठक, सरल यांनीं आपली जीवित हा आपल्या ध्येयाकरितां वेंचलीं आहेत ’ अशा तऱ्हेचीं वाक्यें एम्. ए. च्या पेपरांत सापडतात. वाक्यांची ही दशा ! मग विरामचिन्हें, अवतरणें, अनुस्वार यांची काय असेल ? हे पेपर वाचीत असतांना दक्षता, सावधता, रेखीवपणा यांचा या विद्यार्थ्यांशीं संबंध असावा अशी चुकूनसुद्धां शंका येत नाहीं. आणि हेच विद्यार्थी एम्. ए. होऊन आतां निरनिराळ्या खात्यांत वरचे अधिकारी म्हणून जाणार. हाताखालचे मदतनीस असे असल्यावर पंडित नेहरू, वल्लभभाई किंवा करिअप्पा काय करूं शकतील ?

स्पेन्सरनें म्हटलें आहे कीं, शाळेंत गणित सोडवितांना एखादा आंकडा चुकल्यामुळें मुलांचें उत्तर चुकतें, पण त्याची विद्यार्थ्यांना लाज वाटत नाहीं. हा आपल्या बुद्धीचा दोष नसून हें केवळ दुर्लक्षामुळें झालें असें समाधान ते करून घेतात. निबंध लिहितांना स्पेलिंग चुकलें आणि शिक्षकांनीं हटकलें तर, स्पेलिंग माहीत होतें पण चुकून तसें लिहिलें गेलें असें उत्तर ते देतात. म्हणजे या दुर्लक्षाच्या चुका खंत बाळगण्याजोग्या आहेत असें त्यांना वाटत नाहीं. आणि हीच वृत्ति घेऊन ते जीवनाच्या आखाड्यांत उतरतात. (Boys carry these mistakes into life.) आणि तेथेंहि तशीच भोंगळ सृष्टि निर्माण करतात.

विद्यार्थ्यांच्या पेपरांतल्या सृष्टीच्याच प्रतिकृति सध्यां आपल्याला प्रत्येक खात्याच्या कारभारांत दृष्टीस पडत आहेत. सरकारी कचेरीच्या कोणच्याहि खात्यांतल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची मुलाखत घ्या. त्यांची सारखी तक्रार असते कीं, चूक न करतां मजकूर टाइप करणारा, गोंधळ न करतां हिशेब करणारा, हवी ती माहिती बिनचूक काढून आणणारा एकसुद्धां कारकून सांपडत नाहीं. बी. ए. झालेल्या दोन मुलींनीं बेळगाव व कानपूर कोठेंशी आहे ही माहिती आपल्या वरिष्ठांकडे जाऊन अगदीं 'बालभावानें' विचारलेली आहे !

सध्याचें युग विमानाचें आहे; पण आपण बैलगाडीच्या युगांत आहों. सूक्ष्मतम अणूंचेंहि पृथक्करण करण्याचें व त्यांतून मारक हत्यारें निर्माण करण्याचें हें युग आहे पण आपण अजून धोंडे, झाडें या हत्यारांच्या संगतींत राहून डार्विनचा सिद्धांत खरा करण्याच्या नादांत आहों.

विद्यार्थ्यांच्या अंगीं जे दोष आहेत म्हणून वर सांगितलें त्याला ते स्वतःच सर्वस्वी जबाबदार आहेत असें मला मुळींच म्हणावयाचें नाहीं; पण मला विद्यार्थ्यांना असें सांगावयाचें आहे कीं, त्यांनीं हा न्याय-अन्याय आतां पहात बसूं नये. सध्याच्या शिक्षण-पद्धतीइतकी टाकाऊ, अधोगामी व शिक्षण-शास्त्राच्या

नांवाखालीं रानटीपणाचें प्रदर्शन करणारी दुसरी कोणचीहि शिक्षण-पद्धति नसेल. पण ती आणखी एक शतकभर सुधारेल असें मला वाटत नाहीं. तेव्हां स्वत: विद्यार्थ्यांनींच कर्तृत्वाचा अभ्यास करून चवथ्या दशांशापर्यंतच्या चुकीचीहि मोजदाद घेण्याची वृत्ति आपल्याठायीं निर्माण करावी. समाजांतील गोंधळाची जबाबदारी आपल्यावर नाहीं, असली अलिप्तवृत्ति ठेवूं नये. कारण एस्. एस्. सी. बोर्डांत किंवा अन्यत्र जो गोंधळ होत आहे तो एका माणसाला निर्माण करता येणार नाहीं. एक माणूस कितीहि श्रेष्ठ असला तरी तो जसें एकट्याच्या बळानें सर्व राष्ट्र वर घेऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें एक माणूस कितीहि नालायक असला तरी तो सर्व समाज अधोगामी करूं शकत नाहीं. तेव्हां आजच्या गोंधळाला आपण जबाबदार नसलों तरी पाच वर्षांनीं जो गोंधळ होणार आहे तो टाळण्याची जबाबदारी मात्र आपणांवर आहे हें विद्यार्थ्यांनीं विसरूं नये.

सध्यांचीं महायुद्धें कशीं होतात इकडे लक्ष देणें अवश्य आहे. वीस-वीस लक्षाची सेना हजार मैलांच्या आघाडीवर पसरून तिचें संचलन यंत्रासारखें घडवून आणणें या जातीच्या कर्तबगारीची तेथें आवश्यकता असते. एवढ्याचें अन्न वेळेवर पोंचाविणें, एवढ्यांना कपडे, तंबू, शस्त्रास्त्रें इत्यादि अवजारें पुरविणें, बातम्या ठेवणें, रुग्णांची व्यवस्था करणें हीं कामें इतकीं अवाढव्य आहेत कीं, शाळा-कॉलेजांतून चवथ्या दशांशाची दक्षता घेण्यास मुलामुलींना जेथें शिकवीत नाहींत तेथें तीं पेलणें कधींच शक्य नाहीं. सध्यांची आपली बोजड मुसळी वृत्ति पाहिली म्हणजे एवढ्यांच्या मलमूत्राची व्यवस्था सुद्धां आपल्याला जमेल असें वाटत नाहीं आणि औरंगजेबाच्या सैन्याप्रमाणें आपली सैन्यें रोगराईनेंच निम्म्याच्यावर मृत्युमुखीं पडतील.

युद्धाचें उदाहरण दिलें आहे, कारण नजीकच्या भविष्यकाळांत आपल्याला घनघोर युद्धें करावीं लागतील यांत शंकाच नाहीं. त्या वेळीं अध्यात्मबलानें जय मिळेल असा भ्रम कोणीं बाळगूं नये. सुदैवानें आपल्या सध्यांच्या

सरकारचेंहि तेंच मत आहे. पण बरेचसे अध्यात्मवादी सज्जन अजून तो भ्रम पसरविण्याचें बंद करीत नाहींत म्हणून धोका वाटतो. तेव्हां महात्माजींनीं स्वातंत्र्य खरें कोणच्या शक्तीनें मिळविलें याची वर केलेली मीमांसा ध्यानीं घेऊन नव्या पिढीनें प्रथम स्वतःला अध्यात्माच्या आणि आत्मबलाच्या माया-मोहांतून सोडवून घ्यावे आणि सावधता, दक्षता, कुशाग्रता, कार्यकुशलता, तंत्रज्ञान, कारस्थानी वृत्ति या गुणांची वाढ करून कर्तृत्वाची म्हणजेच सामर्थ्याची जोपासना करावी. नाहींतर जर्मनीसारख्या एखाद्या महासामर्थ्य-संपन्न राष्ट्राशीं कधीं काळीं आपली गांठ पडली तर फ्रान्स-जर्मनींत झालेल्या सेडानच्या युद्धातल्याप्रमाणें आपल्याहि रणांगणाला, रणांगणाचें रूप न राहतां कत्तलखान्याचे रूप येईल.

नोव्हेंबर १९४९

# १०. सोव्हियेट रशियाची संस्कृति

## १. साहित्य

संस्कृति या शब्दाचा अर्थ अत्यंत व्यापक असा आहे. राजकारण, धर्मशास्त्र, समाजशास्त्र, अर्थकारण, तत्त्वज्ञान, नीति, साहित्य, कला, विज्ञान इत्यादि क्षेत्रांत मानवानें आपल्या मनाच्या व बुद्धीच्या सामर्थ्यानें जें कांहीं उच्च वैभव प्राप्त करून घेतलें असेल, जो कांहीं पुरुषार्थ गाजविला असेल त्या सर्वांचा अंतर्भाव 'संस्कृति' या शब्दांत होतो. 'सोव्हियेट कम्यूनिझम्, ए न्यू सिव्हिलिझेशन्' या आपल्या ग्रंथांत सिडने वेब्र यांनीं याच व्यापक अर्थानें हा शब्द वापरला आहे. या लेखांत इतका व्यापक अर्थ विवक्षित नाहीं. रशियांतील लोकसत्ता, तेथील अर्थव्यवस्था, तेथील समाजनियमनें यांचा अन्यत्र अनेक वेळां अनेक लेखांत मीं उहापोह केलेला आहे. आतां त्याविषयीं नव्यानें लिहिण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. येथें सोव्हियेट रशियाच्या सध्यांच्या संस्कृतीचा विचार करतांना 'संस्कृति' हा शब्द बऱ्याच मर्यादित अर्थानें वापरलेला आहे. राजकारण, अर्थकारण यांचा संस्कृतींत जरी अंतर्भाव होत असला तरी साहित्य, कला आणि विज्ञान हे संस्कृतीचे प्रधान घटक मानले जातात. मानवाच्या मनःसामर्थ्याचें व बुद्धिसामर्थ्याचें परमोच्च वैभव याच क्षेत्रांत खरें दिसून येतें. आणि यांच्या उंचीच्या मापानें एकंदर समाजाच्या उंचीचें मापन करणें हें जगांतल्या सर्व पंडितांना आतांपर्यंत मान्य झालेलें आहे. म्हणून सोव्हियेट रशियांतील साहित्य, कला व विज्ञान यांचें परीक्षण करून त्या देशाच्या संस्कृतीचें मूल्यमापन करावें असा प्रस्तुत विचार आहे.

रशियांतील साहित्य, कला व विज्ञान या संस्कृतीच्या क्षेत्रांतील तीन शाखांचा पृथक्पणें व सविस्तर असा विचार करण्यापूर्वीं त्या सर्वांचें एकंदर सामान्य रूप कसें आहे तें थोडक्यांत पाहूं. आधार, प्रमाणें, वचनें देऊन तपशिलानें विवेचन करावयाचें तें नंतर करूं.

सोव्हियेट रशियांत साहित्य, कला व विज्ञान यांवर अत्यंत कडक असें सरकारी नियंत्रण आहे. वाङ्मयाचा हेतु काय असावा, ग्रंथांत कोणत्या मताचा पुरस्कार करावा, उत्कर्ष कोणाचा दाखवावा, अपकर्ष कोणाचा, घटनांची मीमांसा कशी करावी, भावना कोणत्या प्रगट कराव्या, सत्य कशाला म्हणावें, निषेध कशाचा करावा, याविषयीं प्रत्येक लेखकाला, कलाकाराला व शास्त्रसंशोधकाला सरकारी दण्डनाच्या अनुरोधानेंच धोरण ठेवावें लागतें. याविषयीं तेथें विकल्प नाहीं. सरकारनें निर्देशिलेल्या धोरणाची अवज्ञा झाल्यास बहुधा त्याला देहदंड भोगावा लागतो. निदान अत्यंत कठोर असें दुसरें शासन तरी भोगावें लागतेंच. या जगांतून उठविलें नाहीं तरी सुखाच्या संसारांतून सरकार त्याला खास उठवितें.

सरकारी नियंत्रणांतील पहिला व सर्वव्यापी दण्डक असा आहे कीं, सोव्हियेट रशियांत सरकारमान्य असें जें मार्क्सचें तत्त्वज्ञान त्याशीं विरोधी असें कोणत्याहि ग्रंथांत, कादंबरी, लघुकथा, नाटक, काव्य, चित्रपट, संगीत, खगोलशास्त्र, रसायन, पदार्थविज्ञान, जीवनशास्त्र यांत कांहींहि असतां कामा नये. मार्क्सवादांतील विरोध-विकासवादाचा जो सिद्धान्त त्याला बाधक असें कोणतेंहि मत, कोणताहि विचार, कोणताहि सिद्धांत साहिला जाणार नाहीं. शास्त्रसंशोधकांनीं शोधिलेलीं सत्यें विरोधविकासमताला पोषक असलींच पाहिजेत. कादंबरींत वर्गविग्रहाला चेतना देणारा विषयच घेतलेला असला पाहिजे. ‘ कलेसाठीं कला ’ हें तर सोव्हियेट दंडराजांना मान्य नाहींच पण निरपेक्ष सत्यसंशोधन हेंहि त्यांना मान्य नाहीं. कित्येक सोव्हियेट मार्क्सवादी पंडितांनीं असा स्वच्छ अभिप्राय दिला आहे कीं, निरपेक्ष सत्य असें कांहीं नसतेंच. प्रत्येक सत्य हें वर्गसापेक्षच असतें. तेव्हां साहित्य असो, कला असो वा विज्ञान असो; त्यांतील घटना, प्रसंग, मतें, भावाविष्कार, नादलहरी, रंगसंगति, संशोधनें हीं सर्व विरोधविकासवाद, वर्गविग्रह—म्हणजे एकंदर मार्क्सवाद—यांनीं घालून दिलेला जो क्षुण्ण मार्ग त्यापासून रेखामात्र सुद्धां इकडेतिकडे जातां कामा नयेत असा रशियांतील दण्डधरांचा कायदा आहे. आणि तेथील प्रजाजन अतिशय एक-

निष्ठेनें या कायद्याचें परिपालन करीत असत असें पुढील कवींना सांगतां यावें अशी आजची परिस्थिति आहे.

लेखक, कलाकार व शास्त्रज्ञ यांच्या प्रतिभेवर अगदीं अल्प जरी नियंत्रण घातलें तरी त्यांचा कोंडमारा होऊन त्यांच्या कृती कृत्रिम, जीवहीन होतात. मग रशियातल्या या वरील प्रखर नियंत्रणाने काय होत असेल त्याची सहज कल्पना येईल. पण येवढ्यानेंच हा गळफास पुरा होत नाहीं. प्रत्येक मत व सिद्धांत हा मार्क्समताला पोषक असलाच पाहिजे इतकाच आग्रह असता तरी, आमचीं मतें व सिद्धांत तसेच आहेत, असा निर्वाळा प्रामाणिकपणें किंवा अप्रामाणिकपणें देऊन, भागवितां आलें असतें. पण तेवढाहि अवसर सोव्हियेट सत्ताधीशांनीं त्यांना ठेवलेला नाहीं. मार्क्सवादाला अनुकूल काय, प्रतिकूल काय, पोषक काय, बाधक काय हे ज्याचे त्यानें ठरवावयाचें नसून तो अखत्यार सर्वस्वी राजसत्तेला आहे. मार्क्सवाद मला मान्य आहे; पण माझ्या मतें त्याचा अर्थ असा आहे, असे म्हणण्याचें स्वातंत्र्य रशियांत नाहीं. मार्क्स, एंगल्स यांच्या वचनांचा अर्थ लेनिन–स्टॅलिन यांनीं जो निश्चित केला तोच सर्वांनीं मान्य केला पाहिजे आणि मार्क्सवादाचा असा स्टॅलिनप्रणीत जो अर्थ त्याशीं तुमचें साहित्य व विज्ञान एकनिष्ठ असलें पाहिजे असा रशियांत सर्वत्र दण्डक आहे.

पण याहि फांसांतून लेखकाची प्रतिभा एखादे वेळीं निसटून जाण्याचा संभव आहे असें वाटल्यावरूनच कीं काय, तो आणखी आवळून टाकण्याची व्यवस्था तेथें केलेली आहे. मार्क्सवादावर स्टॅलिननें एकदां भाष्य लिहून ठेविलें आणि तें मानलें पाहिजे असें आज्ञापत्र काढलें, असें झालें असतें तरी लेखकांची प्रतिभा थोडी निर्घोर झाली असती; पण तसें नाहीं. रशियांतले दण्डराज मार्क्सवादाचें भाष्य दरवेळीं नवीन रचतात आणि काल आपल्याच भाष्याप्रमाणें वागणाऱ्या कलाकारांना आज, आजच्या भाष्याप्रमाणें ते वागत नाहींत म्हणून मार्क्सद्रोहाचा आरोप करून फांशी देतात. आज कीर्ति, गौरव, मान, प्रतिष्ठा यांच्या अत्युच्च पातळीवर मोठ्या दिमाखानें उभे

असलेले लेखक वा संशोधक उद्यां अक्षरशः रशियांत मातींत मिसळलेले जे अनेक वेळां दिसतात त्याचें हें कारण आहे. सत्ताधीशांच्या मनांतला मार्क्स-वादाचा अर्थ एका क्षणांत बदलतो आणि मग कालचे पार्टीनिष्ठ लोक आज पार्टीद्रोही ठरतात.

सोव्हियेट रशियांतील साहित्य-कला-विज्ञानावरील बंधनाचें स्वरूप हें असें आहे. त्याचें प्रतिपादन मार्क्सवादाला अविरोधी असलें पाहिजे एवढाच कागदा-वरच्या कायद्याचा अर्थ असला तरी प्रत्यक्षांत, तें स्टॅलिनच्या त्या त्या वेळच्या लहरीशीं अविरोधी असलें पाहिजे, आणि एवढ्या अफाट देशात कोट्यवधि प्रजेच्या लेखनावर नजर ठेवण्यास स्टॅलिन असमर्थ असल्यामुळें त्यानें वेळोवेळीं जो साहित्यफौजदार नेमला असेल त्याच्या प्रतिभेच्या लहरीशीं तें अविरोधी असले पाहिजे, असा अर्थ होत असतो.

सोव्हियेट रशियांत साहित्य, कला व विज्ञान यांवर या प्रकारचें नियंत्रण आहे. यामुळें तेथें संस्कृतीच्या या शाखाचे पल्लव कोणच्या स्वरूपाचा आविष्कार करितात तें आता पहावयाचे आहे. प्रथम आपण साहित्याचा विचार करूं.

सोव्हियेट रशियांत १९३० सालीं खारकॉव्ह या शहरीं आंतरराष्ट्रीय लेखक व कलाकार यांची परिषद भरली होती. तिच्यामध्यें सर्वानुमतें साहित्यिक व कलाकार यांना पुढीलप्रमाणें नियम लावून देण्यांत आले. ( १ ) कामगारसाहित्य व कला याना व्यक्तिवाद मान्य नाही. ( २ ) कष्टकरी लोकांचा कलाकार हा विरोधविकासवादी असलाच पाहिजे. ( ३ ) कामगार साहित्य व कला हीं संघटित, शिस्तबद्ध व सामुदायिक असलीं पाहिजेत ( ४ ) कम्युनिस्ट पार्टीच्या काटेकोर नियंत्रणाखालींच त्यांची निर्मिति झाली पाहिजे. ( ५ ) आणि कामगारसाहित्याचा वर्गविग्रहाचें साधन म्हणूनच वापर झाला पाहिजे.

या नियमांची सक्त बजावणी व्हावी म्हणून एक साहित्यमंडळ नेमण्यांत येऊन बेझीमेन्स्की याला त्याचा सर्वाधिकार देण्यांत आला. अधिकार हातीं

येतांच त्यानें पहिला आदेश काय दिला? ‘भाई स्टॅलिन याच्या आज्ञांचें तंतोतंत पालन हा आपल्या साहित्याचा एकमेव जीवितहेतु आहे’ हा तो आदेश होय. आणि या त्याच्या परिपत्रकांत ‘काव्याची पंचवार्षिक योजना’, ‘चित्रकलेच्या आघाडीवरील तुफानी सेना’ अशा तऱ्हेची नियोजनाची भाषा वापरलेली आहे.

‘सोव्हियेट लिटरेचर’ हें सोव्हियेट रशियांतील साहित्याला वाहिलेलें मासिक आहे. त्याच्या भिन्नभिन्न अंकांतील अनेक लेखकांचीं कांहीं अवतरणें पुढें देतों. त्यांवरून तेथील साहित्यावरील बंधनांची कल्पना येईल. या लेखकांनीं अर्थातच ती स्थिति गौरवास्पद म्हणूनच तिचा उल्लेख केला आहे हें वाचकांनीं विसरू नये. ‘सोव्हियेट सरकार व कम्युनिस्ट पार्टी हीं लोक-मताचीं निदर्शक असून तींच मोठ्या चतुराईनें सामाजिक वास्तववादाच्या मार्गानें आपल्या वाङ्मयाला वळण देतात.’ (एस्. लुकिन्—सोव्हियेट लिटरेचर, जुलै १९५२). निकोलायेव्हा या लेखकानें अगदीं गहिवरून आपली कृतज्ञता पुढीलप्रमाणें व्यक्त केली आहे. ‘१९ व्या कॉंग्रेसच्या वेळीं आपणा लेखकांच्या सर्व अडचणी पार्टीनें दूर केल्या आहेत, आणि आपणांस असा आदेश दिला आहे कीं, समाजांत अजून जे दोष, जीं पापें, जे दुष्टाचार आहेत त्यांविरुद्ध शस्त्र धरा. भाई मेलेंकाव्ह यानें साहित्याच्या मूलप्रश्नांची चिकित्सा करून फारच उत्कृष्ट बोध केला आहे.’ भाई मेलेंकाव्ह यानें असें साहित्यविषयक अलौकिक ज्ञान काय दिलें तें पहाण्याजोगें आहे. सोव्हियेट रशियांत ‘सामान्य माणसाचा’ सध्यां गौरव चालू असल्यामुळें कोणत्याहि कथानकाचा नायक ‘सामान्य माणूस’च असला पाहिजे असा नियम आहे. यामुळें रशियन लेखकांच्या पुढें एक प्रश्न येऊन पडला होता व अजूनहि आहे. या सामान्य नायकाच्या अंगीं शौर्य, धैर्य, साहस, निष्ठा, त्याग असे असामान्य गुण दाखवावे कीं नाहीं? नायक हा जर सामान्यवर्गाचा प्रतिनिधि असावयाचा तर त्याच्या अंगीं असामान्यत्व दाखविणें हें योग्य कीं निषिद्ध? अशी शंका येऊन अनेक लेखक आपले नायक अगदीं गुणहीन, खरेखुरे सामान्य दाखवूं

लागले. त्यामुळें त्यांचें साहित्य अगदीं नीरस होऊं लागलें. हें तेथील साहित्यफौजदारांना न आवडून त्यांनीं लेखकांना उपदेश केला कीं, नायक सामान्यांचा प्रतिनिधि असला तरी, 'प्रातिनिधिक म्हणजे क्षुद्र, गुणहीन' असें समजूं नका. या प्रतिनिधींतहि अलौकिक गुण असूं शकतात. तेव्हां तुम्ही तसे नायक रंगवीत जा.

परवांच्या १९ व्या कॉंग्रेसच्या वेळीं सध्यांचा (इ स. १९५३) दंडराज मेलेंकाव्ह यानें सोव्हियेट लेखकांना या तऱ्हेचा उपदेश केला. वास्तविक वाङ्मयांतील या सत्यांत नवीन असें कांहीं नाहीं. सामान्य वर्गाच्या प्रतिनिधींतहि अलौकिक, असामान्य गुण असूं शकतात हें सत्य सर्व देशांतल्या साहित्यिकांनीं आज हजारों वर्षे जाणलेलें आहे. पण मेलेंकाव्हनें तें १९ व्या कॉंग्रेसमध्यें सांगितलें तेव्हां त्यावर लिहितांना निकोलायेव्हा म्हणतो,' मेलेंकाव्हचें हें वचन लहान आहे. पण त्यातून आम्हांला नवें विश्व दिसूं लागलें; आणि त्यामुळें आमचें मन त्याच्या विषयींच्या कृतज्ञतेनें उचंबळून आलें.' १९ व्या कॉंग्रेसच्या वेळीं स्टॅलिन हयात होता, आणि बाहेरच्या जगाला त्याच्या जागीं मेलेंकाव्ह येईल अशी कल्पनाहि नव्हती. पण तेथील लेखकांना हा वास लागलेला असावा. त्यामुळें त्याच्या सामान्य वचनातहि आपल्याला विश्व दिसलेंच पाहिजे व कृतज्ञतेनें आपलें मन उचंबळून आणलेंच पाहिजे, हें महासत्य त्यांनीं जाणलें असावें. त्या सत्याचाच आविष्कार निकोलायेव्हाच्या उद्गारांत झालेला दिसतो. (सोव्हियेट लिटरेचर : जाने. १९५३ : पृ. १४०)

ऑगस्ट १९५२ च्या अंकांतील—'सोव्हियेट जनतेची मागणी' या लेखांत लेखकानें सोव्हियेट साहित्याचा हेतु काय असला पाहिजे, याविषयीं पुढील स्पष्टीकरण केलें आहे. 'सोव्हियेट रशियांत नव्या जमान्याचा सर्वत्र विजय कसा होत आहे, नव्या सत्तेखालीं सर्व तऱ्हेनें मानवी सद्‌गुणांचा विकास कसा होत आहे, हें दाखविणें हाच सोव्हियेट साहित्याचा जन्महेतु आहे.' एखाद्या लेखकाला हें मान्य नसलें, नव्या जमान्यावर त्याला टीका करावयची असली तर? त्यानें आपल्या लघुकथेंत वा कादंबरींत या सत्तेखालीं

मानवाचा कोंडमारा होत आहे असें दाखविलें तर ?–तर त्याचें काय होईल ? तेंच आतां पहावयाचें आहे.

इ. स. १९२५ ते १९५० या २५ वर्षांत राजकारण, धर्म, राष्ट्रनिष्ठा, पूर्वपरंपरेची पूजा, आंतरराष्ट्रीयता, विवाह, स्त्री-पुरुषसमता, कुटुंबसंस्था आर्थिक समता, अमेरिकेसारख्या भांडवली राष्ट्राशीं संबध, जर्मनीसारख्या दण्डसत्ताक राष्ट्राशीं संबंध, तरुण स्त्री–पुरुषांचें प्रेम, अपत्याविषयींचा दृष्टिकोन, कामगार–शेतकरी यांचे संबंध, सैन्याचें व सैनिकांचे अधिकार इत्यादि विषयांसबंधीं सोव्हियेट रशियांतील सत्ताधाऱ्यांची मतें सारखीं बदलत आहेत, हें जगप्रसिद्ध आहे. एवढ्यासाठीं त्यांना कोणीं दोष दिला नसता. परिस्थितीप्रमाणें माणसानें विचार पालटावा, शहाणे व्हावें हें श्लाघ्यच आहे. मग रशियांतल्या या नित्याच्या मतपरिवर्तनांत आक्षेपार्ह असें काय आहे ? पहिली गोष्ट अशी कीं धर्म, राष्ट्र, विवाह, अर्थ याविषयीं स्टॅलिनचे जें जें नवीन मत असेल तेंच खरें मार्क्सवादाचें तत्त्व असा रशियांत दण्डक आहे. संकुचित राष्ट्रनिष्ठा नसणें, स्वतःला जगाचा नागरिक मानणें हा एके काळीं खरा मार्क्सवाद होता; पण इ. स १९२६ सालानंतर सत्ताधाऱ्यांचें मत पालटलें आणि हळूंहळूं राष्ट्रनिष्ठा, परंपरेची पूजा हाच खरा मार्क्सवाद असें ठरलें. दुसरी गोष्ट अशी कीं परिस्थिति पाहून विचार पालटून हें जें शहाणें व्हावयाचें त्याचा अधिकार फक्त स्टॅलिनलाच आहे. स्टॅलिनच्या आधीं मार्क्सवादाचा असा नवा अर्थ कोणालाहि कळतां कामा नये असा रशियांत दुसरा दण्डक आहे. आणि तिसरें म्हणजे स्टॅलिन शहाणा झाला कीं सर्वांनीं त्याचप्रमाणें शहाणें झालें पाहिजे असाहि कायदा आहे. लेखक, कलाकार व विज्ञानशास्त्रवेत्तेहि या शहाणपणाच्या लाटांतून मुक्त असता कामा नयेत. त्या त्या वेळीं मार्क्सवादाचा जो नवा अर्थ राष्ट्र, धर्म, प्रेम, आतरराष्ट्रीय संबंध याविषयीं दंडराजांनीं प्रवर्तित केला असेल तो जाणून त्यांनीं त्याचें प्रतिपादन केलें पाहिजे. पण हें येथेंच थांबत नाहीं. थोड्या अवधीपूर्वीं स्टॅलिनप्रणीत जो मार्क्सवाद त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांतून, नाटकांतून प्रसृत केला तो स्टॅलिनच्या

मतें शिळा झाल्याबरोबर त्यांचें मागलें प्रतिपादन हाहि गुन्हा ठरतो. स्टॅलिनचा नवा अर्थ बरोबर असें म्हटलें तर जुना चूक होता असें ओघानेंच येईल. पण स्टॅलिन चूक करूं शकत नाहीं, हा सोव्हियेट जीवनांतला आदि सिद्धांत आहे. आणि ब्रिटनमध्यें 'राजा प्रमाद करूं शकत नाहीं' हा संकेत जसा केवळ कागदावर असतो तसा रशियांत हा सिद्धांत केवळ कागदावर नसतो— माणसांची कातडी सोलून त्यांवर तो लिहिला जातो! स्टॅलिन चुकूं शकत नाहीं याचा अर्थ मार्क्सवादाचा या लेखकांनीं पतकरलेला अर्थ स्टॅलिनप्रणीत नव्हताच असा होतो. त्यांनीं तो आपल्या बुद्धीनें केलेला विपर्यास होय. अर्थात् त्यासाठीं त्यांनीं बळी गेलेंच पाहिजे!

१९३३ सालीं हिटलर सत्तारूढ झाला आणि जर्मन राष्ट्राची अत्यंत वेगानें संघटना करून तो आक्रमणाची भाषा बोलूं लागला. राष्ट्रनिष्ठा, परंपरेचा अभिमान या महान् प्रेरणा त्याच्या संघटनेला सामर्थ्य देत होत्या. या प्रेरणाशीं मार्क्सवादाचें हाडवैर आहे. त्यामुळें आंतरराष्ट्रीय निष्ठा, विश्वकुटुंबवाद, जगांतील कामगारांची राष्ट्रनिरपेक्ष संघटना या प्रेरणांनीं सोव्हियेट रशियांत समाजसंघटना चालू होती; पण जर्मनीच्या बलाची जशी जशी कल्पना येऊं लागली तसतसा या भिकारी, दरिद्री प्रेरणांवरचा रशियन दण्डधरांचा विश्वास उडूं लागला, व जर्मन आक्रमणाला तोंड द्यावयाचें तर आपल्याला त्याच्याच प्रेरणांचा आश्रय केला पाहिजे असें त्यांच्या ध्यानांत आलें. यावेळीं त्यांनीं तसें सांगून त्या धोरणाचा अवलंब करावयास हरकत नव्हती; पण मग त्या दण्डराजांच्या व खुद्द मार्क्सच्या सर्वज्ञत्वाला, प्रमादराहित्याला व सर्वंकषत्वाला बट्टा लागला असता; म्हणून नवें धोरण हा मार्क्सवादाचाच विकास आहे असें त्यांनीं जाहीर केलें आणि त्यांच्याच आज्ञेवरून जुनें धोरण मान्य करून तसें साहित्य लिहिणाऱ्या लोकांवर ट्राट्स्कीवादी असा आरोप ठेवून त्यांचा निकाल लावला. 'असोसिएशन ऑफ प्रॉलिटेरियन रायटर्स' या संस्थेला इतके दिवस सरकारमान्यता होती. आतां

ती बरखास्त करण्यात आली. वर सांगितलेला साहित्यफौजदार बेझीमेन्स्की हा तिचा प्रमुख होता. तो जगांतून नाहींसा झाला !

पुढें दहा वर्षें राष्ट्रनिष्ठा व पूर्वजपूजा यांचा काळ होता. या काळीं ॲना खामाटोव्हा व मायकेल झासचेंको या दोन साहित्यिकांना फार मान मिळूं लागला. ॲना म्हणजे मॉडर्न पुष्किन व झासचेंको म्हणजे चेकॉव्ह अशा त्यांना पदव्या मिळाल्या. याच काळांत टॉलस्टॉयसारख्या जुन्या लेखकांना मान्यता मिळाली. टॉलस्टॉय हा लेखक सरंजामदार वर्गांतला असल्यामुळें तो चांगला असणें शक्यच नाहीं असें ग्लेब्रॉव्हसारखे शिक्षणाधिकारी पूर्वी जाहीरपणें सांगत. पण आतां मार्क्सवादाचा विकास झाला होता, त्यामुळें टॉलस्टॉयचें नशीब उचकटलें व तो सर्वश्रेष्ठ साहित्यिक ठरला. पण राष्ट्र-निष्ठेची लाट युद्ध संपल्यानंतर ओसरूं लागली. जर्मन आक्रमणाच्या भीती-मुळें त्या अंगाने मार्क्सवादाचा झालेला विकास सूज ओसरते तसा ओसरला. सरकारी यंत्रें फिरलीं आणि ॲना खामाटोव्हा व मायकेल झासचेंको यांना त्यांच्या उच्च पीठावरून एकदम धुळींत खेचण्यांत आलें. पुष्किन व चेकॉव्ह यांच्याइतके श्रेष्ठ साहित्य प्रसवणाऱ्या या लेखकाच्या वाङ्मयावर सेंट्रल कमिटी ऑफ दि कम्युनिस्ट पार्टी हिनें आग पाखडण्यास सुरुवात केली. 'यांचें वाङ्मय अत्यंत पोकळ, नीरस, अर्थशून्य असें असून त्यामुळें तरुणांच्या मनाला अधोगामी वळण लागतें' असा अभिप्राय तिनें देऊन टाकला. (२१-८-१९४६).

कॉन्स्टंटिन् फेडिन या लेखकाला एकदां विपुल कीर्ति मिळाली होती. आतांहि अलीकडे त्याला 'स्टॅलिन-प्राइझ' मिळून त्याचे नशीब उजळलें आहे; पण अशा मोठ्या लेखकांची रशियांत प्रतिष्ठा कितपत ठेविली जाते ? एखाद्या लहान मुलाला आपण अगदीं सहज जशी चटकन् थोबाडींत देतों व 'चुकलों, पुन्हां असे करणार नाहीं' असें म्हणावयास लावतों तशीच या लेखकांना प्रवदा, इझवेस्टिया या सरकारी पत्रांतून सहज चपराक मिळते,

तेहि लाचार होऊन क्षमा-याचना करण्यासाठीं मोठमोठे लेख लिहितात व ' इतके दिवस आम्हांला अक्कल नव्हती, परवांच्या या कानउघाडणीमुळें आतां आम्हांला प्रकाश दिसूं लागला. पिताजी स्टॅलिन यांची ही कृपा होय. ' असें नम्रपणें लिहून गाल चोळीत पुन्हां लेखणी हातीं घेतात. फेडिन याला ' टाउन ॲन्ड मॅन ' या कादंबरीनें कीर्ति मिळाली. त्यानंतर त्यानें ' रेप ऑफ युरोप ' ही दुसरी कादंबरी लिहिली; पण तिच्यांतील नायक हा फौज-दारांच्या पसंतीला आला नाहीं. तेव्हां त्यांनीं त्याची अगदीं लांडगेतोड केली. लगेच त्यानें माफीपत्र सादर केलें. माझा नायक म्हणजे खरा ' सोव्हियेट हीरो ' नाहीं हें माझ्या ध्यानांत आलें; माझी चूक झाली, असें जाहीर प्रकटन त्यानें केलें. त्यावर इझवेस्टिया पत्रानें त्याला शाळकरी पोराला करावा तसा उपदेश केला. ' तुला चांगला नायक निर्माण करता येत नसेल तर ' ट्युनिनी ' नांवाचा एक कर्तबगार कामगार अमक्या ठिकाणीं राहतो, त्याला आदर्श समजून कादंबऱ्या लिहीत जा. ' ( ६ मे १९३६ )

ललितसाहित्यांतलें कोणतेंहि प्रतिपादन विरोधविकासवादांतील सिद्धांतांशीं सुसंवादी असलें पाहिजे असा रशियांतील दंडक असल्याचें वर सांगितलेंच आहे; पण आपल्या हें सहज ध्यानात येईल कीं, कित्येक विषयांच्या बाबतींत विरोधविकासाशीं त्याचा कसा संबंध पोंचतो हें ठरविणें जवळजवळ अशक्य आहे; राष्ट्रनिष्ठा, वर्गविग्रह यांच्या बाबतींत विरोधविकासाशीं संबंध स्पष्ट आहे; पण तरुणतरुणींच्या प्रेमाच्या बाबतींत काय सांगणार ? अशी पंचाईत असल्यामुळें, आणि आपल्या अदमासात कांहीं चूक झाल्यास, तो वरती पसंत न पडल्यास, आपल्यावर भडिमार होईल हें दिसत असल्यामुळें रशियांतील लेखकाची अगदीं त्रेधा होऊन जाते. कुरोचकिन् या लेखकानें आपल्या ' दि थ्री डेज् ' या कादंबरींत प्रेमाचा अधिक्षेप केला. ' प्रेम हा परोपजीवी भांडवली वर्गाचा रिकामा उद्योग आहे ' असें विधान त्यानें केलें; पण बिचाऱ्याचा अदमास चुकला. साहित्यफौजदारांना त्या वेळीं प्रेम ही

कामगार–जगतांतील श्रेष्ठ भावना आहे असा साक्षात्कार होत होता. म्हणून त्यांनीं कुरोचकिन्‌ची चांगली हजेरी घेतली. अर्थात् लगेच त्यानें आपलें मत सुधारलें, नवा प्रकाश दिसल्याचें मान्य केलें आणि प्रेमाच्या गुणवर्णनास प्रारंभ केला. मौजेची गोष्ट अशी कीं, सत्तेच्या जोरावर लेखकांना असें दीनवाणे बनवून त्यांनीं मतें पालटलीं कीं हे फौजदार त्यासाठींहि त्यांची चेष्टा करतात. ‘ काल प्रेमाची निंदा करून आज लगेच स्तुति करण्यास कांहीं वाटत नाहीं ’ अशी कॉमसोमालास्काया प्रवदा ( १९–३–३६ ) या पत्रानें कुरोचकिन्‌वर टीका करण्यास कमी केलें नाहीं.

एडवर्ड ॲशक्रॅफ्ट या लेखकानें ‘ डिके इन् सोव्हियेट रायटिंग ओव्हर ए जनरेशन ’—‘ गेल्या पिढीच्या रशियन् वाङ्मयाचा अधःपात ’ या नांवाचा एक लेख लिहून वर सांगितल्याप्रकारची आणखी बरीच माहिती देऊन सोव्हियेट वाङ्मयावर टीका केली आहे. सर्व साहित्य विधिनिषेधाच्या कैचींत बसवून टाकल्यामुळें त्यांतील सर्जनशीलता नष्ट झाली आहे आणि सोव्हियेट हीरो हा कसा असावा याचा नमुना सरकारनेंच ठरवून दिल्यामुळें कम्युनिस्ट साहित्य म्हणजे अत्यंत रुक्ष, नीरस असे नीतिपाठ होऊन बसले आहेत, असा अभिप्राय त्यानें दिला आहे. त्याच्या मतें साधारणतः १९३६ पासून हा अधःपात वेगानें सुरू झाला. त्याच्या आधीं लेखकांना साधारण स्वातंत्र्य असे. त्या काळांत पुष्कळ चांगल्या कादंबऱ्या निर्माण झाल्या. मायकेल शोलोकोव्ह याची ‘क्वाएट फ्लोज दि डॉन’ ही कादंबरी ॲशक्रॅफ्टच्या मतें उत्तम आहे. त्यांतला नायक हा स्वतंत्र विचाराचा असून तो एकदां लालसेनेच्या विरुद्धहि लढला होता. सध्यांचा आदर्श हीरो तो नाहीं; पण त्यानंतरची ‘ व्हर्जिन सॉइल अपरूटेड’ ही कादंबरी पहा. तंत्रदृष्ट्या ती चांगली आहे; पण सामुदायिक शेतीच्या प्रचाराला वाहिल्यामुळें ती जीवहीन झाली आहे. त्यांतील नायक हा दैवी संपत्तीचा पुतळा व खलपुरुष हा केवळ असुर आहे. झासचेंको हा आरंभीं आपल्या लघुकथांतून अधिकाऱ्यांवर टीका करीत असे. पण आतां? आतां अधिकारी इतके सात्त्विक झाले आहेत कीं व्हाइट सी

कॅनॉलवर काम करणारे जे कैदी कामगार त्यांचा हे अधिकारी, झासचेंकोच्या मतें, आध्यत्मिक पुनर्जन्म घडवून आणतात. युरी युझोव्हस्की या नांवाचा एक सोव्हियेट टीकाकार आहे. इंटरनॅशनल लिटरेचरच्या १९३६ सालच्या एका अंकांत त्याचें एक व्याख्यान आलें आहे. त्यांत त्यानें एका नाटकावर टीका केली आहे. तीवरून सोव्हियेट रशियांतील बंदिस्त साहित्याची कल्पना येईल. टिफलीस या गांवचा एक धनगर हा नाटकाचा नायक आहे. आपण इंजिनीयर व्हावें अशी त्याची महत्त्वाकांक्षा आहे. त्याच्या घरचें वळण सगळें आळशी-पणाचें आहे. त्यावर हा नायक मात करतो व उद्योगीपणा अंगीं बाणवतो. त्याच्या मार्गांत देशद्रोही, लांचखाऊ लोक अनेक अडथळे आणतात. त्यांच्याशीं झगडून तो विजय मिळवितो. कांहीं दांभिक कम्युनिस्ट त्याला त्रास देतात; पण त्यांनाहि तो वठणीवर आणतो. हें सर्व त्या नायकानें स्वपराक्रमानें, स्वावलंबनानें केलें आहे असें नाटकांत दाखविलें आहे. पण यामुळेंच युरी युझोव्हस्कीनें त्या नाटकाची हजेरी घेतली आहे. मार्क्सवादांत व्यक्तीला महत्त्व कमी. व्यक्ति ही कालप्रवाह बदलूं शकत नाहीं. कालप्रवाह तिला निर्माण करतो व चालवितो. सर्व महत्त्व समाजाला आहे. अशा स्थितींत एकाकी व्यक्ति परिस्थितीवर झगडून यश मिळविते असें दाखविणें यांत व्यक्तीचा गौरव होतो व समाजाला कमी लेखलें जातें. या समाजरचनेच्या जुनाट, बुरसलेल्या कल्पना आहेत. मग युझोव्हस्कीच्या मतें नायक कसा दाखवावयास हवा होता ? तो म्हणतो, हा तरुण धनगर आपल्या समाजावरील प्रेमामुळें, भोंवतालच्या समाजाशीं एकरूप झाल्यामुळें व सामुदायिक कष्टाचें महत्त्व त्याला इतरांपेक्षां जास्त समजल्यामुळें विजयी झाला असें दाखविणें अवश्य आहे.

ही सर्व माहिती देऊन व टीका करून अॅशक्रॅफ्ट यानें शेवटीं म्हटलें आहे कीं टॉलस्टॉय, टर्गेनिव्ह, डोस्टोव्हस्की हे जे १९ व्या शतकांतील लेखक, त्यांच्या लेखणीचा एकहि गुण आजच्या वाङ्मयांत दिसत नाहीं ( ‘ भारत-ज्योति ’ : ४ मे ५२ ).

सोव्हियेट रशियाच्या स्वतःच्याच राज्यांत लेखकांची अशी ससेहोलपट चालते असें नाहीं. त्याच्या मांडलिक देशांतील लेखकांनाहि असाच अधिकाऱ्यांच्या नेत्रसंकेतानुरूप तारेवरचा नाच करावा लागतो. लॅटव्हिया हा सोव्हियेट रशियाच्या साम्राज्यांतील एक मांडलिक देश आहे. तेथील पंतप्रधान व्हिलिस लॅत्सिस यानें 'टु दि न्यू शोअर' या नांवाची एक कादंबरी लिहिली. त्यांतला नायक हा लहानपणीं एका सरंजामी सरदाराच्या घरीं असे. आतां ही घटना मार्क्सवादाला अनुकूल कीं प्रतिकूल हे कसें ठरवावयाचें? जरा विचार केला तर असें दिसून येईल कीं, या घटनेचा दोन्ही प्रकारें अर्थ लावितां येईल. लहानपणीं सरंजामदाराच्या घरीं असूनहि मोठेपणीं तो उत्तम कामगार–नेता झाला यावरून मार्क्सच्या शिकवणुकीचा प्रभावच दिसून येतो, असा अर्थ लावला तर त्यांत मार्क्सवादाचा गौरवच होतो; पण तेथल्या वाङ्मयाच्या चौकांतल्या शिपाईबोवाना हा अर्थ मंजूर झाला नाहीं. त्यांनीं एकदम हात आडवा करून पंतप्रधानांची मोटार थांबविली व तिचा नंबर टिपून घेऊन रॉंग साइटीची वर खबर दिली. अन् पिन् क्सिस या सहीनें त्यानें वर असें कळविलें कीं, सरंजामदाराच्या घरीं वाढलेला मुलगाहि कामगार–नेता होऊं शकतो असें दाखवून व्हिलिस लॅत्सिस यानें सरंजामदारीचा गौरव केला आहे. लगेच लॅत्सिसवर सर्व बाजूंनीं काहूर आलें. प्रवदा, इझवेस्टिया इत्यादि सर्व पत्रांत नुसता गदारोळ झाला. लॅत्सिस घाबरून जाऊन क्षमायाचना करूं लागला. आपली कादंबरी दुरुस्त करण्याचें त्यानें आश्वासन दिलें; पण इतक्यांत एक चमत्कार झाला: लॅत्सिसचा वरपर्यंत वशिला लागला म्हणा किंवा वरच्या अधिकाऱ्यांना वर सांगितलेला अर्थ पटला म्हणा, कांहींतरी होऊन प्रवदा पत्रात 'वाचकमंडळ' या सहीनें एक पत्र प्रसिद्ध झालें. त्यात लॅत्सिसच्या कादंबरीचा गौरव करून तिच्यावर टीका करणाऱ्यांना दोष दिला होता. त्याबरोबर ज्यांनीं ज्यांनीं टीका केली होती त्यांनीं, आंतून हे पत्र कोणाचें आहे याची समज मिळाल्यामुळें, आपलीं माफीपत्रें सादर केलीं. प्रवदा पत्रानें स्वतः कादंबरीवर टीका

केली होती, तेव्हां त्यानें क्षमायाचनापर लेख लिहिला व ‘ इतकें उघड सत्य आमच्या कसें ध्यानांत आलें नाहीं कळत नाहीं; आतो प्रकाश दिसला ’ इत्यादि ठरीव मजकूर लिहून टाकला; आणि मग लॅत्सिसचा गौरव इतका झाला कीं शेवटीं त्याच्या कादंबरीला ‘ स्टॅलिन प्राइझ ’ देण्यांत आलें !

साहित्य हें मार्क्सवादाला, विरोधविकासखिद्धांताला, वर्गविग्रहाला पोषकच असलें पाहिजे या दण्डकाचा अर्थ किती हास्यास्पद आहे, ही अपेक्षा किती बालिश, किती पोरकट किंवा दुसऱ्या अर्थानें ‘ मृच्छकटिका’तल्या शकारी वृत्तीची कशी द्योतक आहे हें यावरून दिसून येईल.

झेकोस्लोव्हाकिया हाहि लॅटव्हियाप्रमाणेंच रशियाचा मांडलिक देश आहे. तेथील पी. इ एन्. या क्लबाचा माजी चिटणीस व्हिक्टर फिशी यानें तेथील साहित्यावरील नियंत्रणाविषयीं पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे : ‘ येथील साहित्य सर्वतोपरी सरकारी नियंत्रणाखालीं आहे. माजी अध्यक्ष बेनेस, थोर पुढारी थॉमस मॅसॅरिक यांचे ग्रंथ आज बाजारांत किंवा ग्रंथालयांतहि मिळणार नाहींत. प्रत्येक लिखाण आधीं सेंट्रल एक्झिक्यूटिव्ह कमिटीकडे धाडावें लागतें. तेथून मंजुरी मिळाली तरच प्रकाशन व्हावयाचें. तेथील साहित्यिकांना सरकारने फिटर, मेकॅनिक यांच्या पातळीला आणून पोंचाविलें आहे ! त्यांना हुकुमाप्रमाणें साहित्य तयार करून पाठवावें लागतें. कृषिमंत्र्याकडून त्यांना हुकूम येतात कीं, ‘शेतीची कसणी व गुरांची निपज’ यावर एक कादंबरी लिहून पाठवा. ‘ धरणाचें बांधकाम ’ किंवा ‘ यंत्राची उभारणी ’ यावर एक लघुकथा लिहा, असा दुसऱ्या मंत्र्याकडून हुकूम येतो. आणि या आर्डरीप्रमाणें माल पुरवावा लागतो.’ ( रायटिंग इन् झेकोस्लोव्हाकिया—व्हिक्टर फिशी—टाइम्स ऑफ इंडिया : ७ सप्टेंबर १९५० ).

चीन हा अजून रशियाचा मांडलिक झालेला नाहीं; पण पूर्ण ग्रहण झालें नसलें तरी त्यावर छाया आली आहे यांत शंका नाहीं. ‘ चायनीज लिटरेचर ’ या मासिकाच्या जानेवारी १९५१ च्या अंकांत तेथील साहित्याधिपति चाऊ य्यांग यांचा आरंभींच लेख आहे. ‘ माओत्सीटंग याच्या विचारांचें कला-

साहित्यांत प्रत्यक्षीकरण ' हेंच मुळीं लेखाचें नांव आहे. ' सध्यां माओट्सीटंगनें घालून दिलेल्या मार्गापासून रेसभरहि न चळतां साहित्याची निपज करीत राहणें हें आपलें आद्यकर्तव्य होय ' असें साहित्यधोरण त्यानें सांगितलें आहे. के सिंग या लेखकाच्या ' म्हातारा कामगार कु फुशान ' या गोष्टीवर चाऊ यांग यानें जी टीका केली आहे ती कम्युनिस्टांच्या साहित्यविषयक वृत्तीची निदर्शक आहे. या म्हाताऱ्या कु फुशानचा मुलगा कुओ चाऊहि सिंग हा तेथील कम्युनिस्ट पार्टीचा चिटणीस होता. लढाईच्या काळीं दुर्दैवानें तो जपानी लष्कराच्या हातीं सांपडला. तेथें भयंकर यातनांमुळें एकदां ध्येयच्युत होऊन त्यानें नाइलाजानें जपान्यांना थोडें साह्य केलें. पुढें कांहीं युक्ति करून तो निसटून घरीं परत आला. बापाला मुलाच्या ध्येयच्युतीचें वर्तमान समजताच त्यानें त्याची निर्भत्सना केली व याला पार्टींतून हांकलून द्या, असें अध्यक्षाना सांगितलें. अध्यक्ष जरा उदार होते. त्यानीं त्याला हांकलून दिलें नाहीं; पण चिटणीसपद मात्र कुओ चाऊहि सिंगकडून काढून घेतलें. पुढें कु फुशाननें मुलाला खूप उपदेश केला. त्यामुळें त्याचें मन खंबीर होऊन तो पुन्हां कधींहि ध्येयच्युत झाला नाहीं. अशी ही गोष्ट आहे. हिचा निर्देश करून चाऊ यांग हा फौजदार दरडावतो कीं, ' असली लघुकथा आमच्या कामास येणार नाहीं. अशी कोणींहि लिहितां कामा नये. ' याचें कारण त्यानें काय सांगितलें ? तो म्हणतो, कम्युनिस्ट पार्टीचा चिटणीस ध्येयच्युत होतो, हें दाखविणें योग्य नाहीं. आणि ध्येयच्युत झालेला मुलगा बापाच्या उपदेशानें ताळ्यावर येतो असें दाखविणें तर फारच आक्षेपार्ह आहे. तो पार्टीच्या चेअरमनच्या उपदेशानें ताळ्यावर येतो असें दाखविलें पाहिजे. नाहींतर पार्टीपेक्षां बाप श्रेष्ठ आहे, त्याचा प्रभाव जास्त आहे, असें ठरेल. हें मंजूर नाहीं. ( चायनीज लिटरेचर, १९५१ अंक पहिला, पृ. १३ ).

सोव्हियेट रशियाचें वाङ्मय अत्यंत नीरस, रूक्ष व अधम होण्याचें मुख्य कारण म्हणजे तेथील साहित्यिकांवरील अगदीं करकचून घातलेलीं बंधनें हें होय. त्यांतहि त्यांना घालून दिलेल्या दोन नियमांचा जाच हा वाङ्मयाला

फारच हानिकारक आहे. आणि त्यांचा सोव्हियेट रशियाच्या संस्कृतीशीं मूलभूत संबंध आहे म्हणून त्यांचें विवेचन करून हें सोव्हियेट संस्कृतीचें प्रधान अंग जें साहित्य त्याचें विवेचन संपवूं.

रशियन साहित्य मीं वाचावयास घेतलें त्या वेळीं माझ्या मनांत एक अत्यंत प्रबळ असें कुतूहल होतें. या साहित्यांत समरप्रसंग कोणत्या प्रकारचा असेल? आमच्या देशांत वर्गविग्रह समूळ नष्ट झाला आहे, येथें जातीय उच्चनीचता नाहीं, गरीब–श्रीमंत भेद नाहींत, शास्ते व शासित असा भेद नाहीं, स्त्रीपुरुषविषमता नाहीं, मालक–मजूर, जमीनदार–शेतकरी हीं द्वंद्वें लुप्त झालीं आहेत, असा प्रचार रशियानें जगभर चालविला आहे. त्यामुळेंच असें वाटे कीं, हे सर्व भेद नष्ट झालेल्या समाजांत ललितवाङ्मयाचा आत्मा जो समरप्रसंग तो कशांतून निर्माण व्हावयाचा? ‘ स्त्री–जन्मा ही तुझी कहाणी ’ ही रडकथा तेथें निर्माण होणें शक्य नाहीं. कारण विवाह-बाह्य संतति तेथें बेकायदेशीर मानीत नाहींत व सरकार अशा आपत्तींत सांपडलेल्या स्त्रियांच्या पाठीशीं उभें आहे. समाजहि त्यांना हीन लेखीत नाहीं. तेथें शामच्या आईबापावरचा प्रसंग येणें शक्य नाहीं; कारण खोत, सावकार, दारिद्र्य, त्यामुळें शिक्षणाची अडचण, हे प्रश्नच तेथें नाहींत. तेथें भाविणींचे प्रश्न नाहींत; कारण तेथें भाविणीच नाहींत. मांगगारुडी, मांग, महार यांचे तेथें ‘ बळी ’ पडणार नाहींत कारण हे दलित लोकच आतां सत्ताधीश झाले आहेत. अन्न, वस्त्र, घर, शिक्षण हें तेथें प्रत्येकाला हक्कानें मिळतें. राजसत्ता, धनसत्ता व वंशसत्ता या समूळ नाहींशा झाल्यामुळें संघर्ष व्हावयास अवसरच नाहीं. येऊन जाऊन स्त्रीविषयक वासनेमुळें समर निर्माण व्हावयाचे; पण या स्त्रीवरील मालकीच्या भावना व तज्जन्य असूया, मत्सर या सर्व भांडवली वृत्ति असल्यामुळें ‘ समर ’ निर्मितीला तेथेंहि अवसर नाहीं. मग समर, संघर्ष वा ‘ कॉन्फ्लिक्ट ’ व्हावा कसा?

प्रारंभींच्या रशियन लेखकांच्या हेच ध्यानांत आलें, आणि आपल्या देशांत यापुढें कोणत्याहि प्रकारचा संघर्ष, द्वंद्व किंवा समरप्रसंग शक्यच

नाहीं, असा निर्णय करून ते समरहीन वाङ्मय लिहूं लागले. ( सोव्हियेट लिटरेचर : ऑगस्ट १९५२ : पृ. १५४ ) पण तें वाङ्मय इतकें भिकार, दरिद्री, रूक्ष व हीन होऊं लागलें कीं, तेथल्या साहित्य-फौजदारांना ही अनवस्था वाटूं लागली. म्हणून त्यांनीं असल्या लेखकांची निर्भर्त्सना केली. समरप्रसंगावांचून ललितवाङ्मय रम्य होणें शक्य नाहीं, तेव्हां तुमची उपपत्ति सोडून देऊन तुम्ही समरपूर्ण वाङ्मय लिहीत जा, असा सगळीकडून त्यांना आदेश देण्यांत आला. मार्क्सवादी ध्येयानें प्रवृत्त झालेला नवा समाज, त्यांतील तरुण स्त्रीपुरुष आणि जुन्याचे अभिमानी, बुरसटलेले भांडवली वृत्तीचे सनातनी बुड्डुक यांमधील द्वंद्वांत तुम्हांला वाटेल तितके समरप्रसंग सांपडतील असें फौजदार-मंडळानें लेखकांना फर्माविलें. अर्थात् लेखकांनींहि नम्रपणें तें मान्य करून समरहीन वाङ्मयाचा अधिक्षेप करण्यास व समरपूर्ण वाङ्मय प्रसविण्यास प्रारंभ केला ( सो. लि. : जाने. १९५३ )

पण अशा रीतीनें आज्ञेप्रमाणें वाङ्मयनिर्मिति होऊं लागली तरी खरा समर त्यांना येणें शक्य नव्हतें. वास्तविक सोव्हियेट रशियन जीवितांत इतर देशांतल्याप्रमाणेंच सर्व प्रकारचीं द्वद्वें, सर्व विग्रह, सर्व विषमता कांठोकांठ भरलेलीं आहेत. बाह्य स्वरूपांत कांहीं बदल झाला असेल तेवढाच. परवां त्या चौदा डॉक्टरांना मुक्त केलें, त्यांच्या बाबतचा समरप्रसंग केवढा भयंकर होता ! त्या सर्व डॉक्टरांनीं, आम्ही फॅसिस्ट व भांडवलदार राष्ट्रांना वश होऊन येथल्या अधिकाऱ्यांचे खून केले, असे कबुलीजबाब लिहून दिले होते आणि स्टॅलिन कालवश झाला नसता तर ते सर्व डॉक्टर एव्हांना कालवश झाले असते. पण स्टॅलिन गेल्यावर त्या सर्वांना निर्दोष म्हणून सोडून देण्यांत आलें ! आतां या निरपराध लोकांचे बळजबरीनें कबुलीजबाब घेणाऱ्या पोलिसखात्यावर जर कोणीं कादंबरी वा नाटक लिहिलें तर त्यांत समर-प्रसंगाला काय वाण आहे ? पण पोलिसखात्याचा हा अन्याय मान्य करणारे अधिकारी सुद्धां असली कादंबरी निर्माण होऊं देणार नाहींत ! रशियन स्त्रीपुरुषांना परदेशांत जाणें जवळजवळ अशक्य आहे. देशांत सुद्धां इकडून

तिकडे जाण्यास परवाने लागतात, आणि ते सहज मिळत नाहींत. आतां बातमी आली आहे कीं, हें धोरण बदललें आहे. दोन रशियन स्त्रियांनीं अमेरिकन नागरिकांशीं लग्नें केलीं होतीं. त्यांना आतां अमेरिकेंत जाण्यास परवानगी मिळणार आहे. या क्षेत्रांतील कथानक रंगविलें तर वाटेल तितके समरप्रसंग सांपडतील. कॉन्सेंट्रेशन कँपमध्यें दोन कोटींपर्यंत अभागी जीव मुलांबाळांपासून तुटून अक्षरशः यमयातना भोगीत आहेत. हे दोन कोटी जीव म्हणजे दोन कोटी समरप्रसंग आहेत. पण हे समरप्रसंग वर्णन करण्याचें नुसतें कोणाच्या मनांत आलें तरी त्याला देहान्त शासन होईल. अधिकाऱ्यांनीं नव्याजुन्यांचा संघर्ष दाखवा असें आज्ञापिलें असलें तरी नव्याचा विजयच दाखविला पाहिजे. नवें ते न्याय्य, उत्कर्षकारक, हितावह, सत्य असेंच दाखविलें पाहिजे, असें वेदवचन असल्यामुळें लेखक कितपत स्वतंत्रपणें लिहूं शकतील याची सहज कल्पना येईल. याचा अर्थ असा कीं, सोव्हियेट संस्कृतींत घोर अन्याय, भयानक जुलूम, असह्य यमयातना, घातक विषमता हे सर्व प्रकार इतर समाजांतल्याप्रमाणेंच आहेत; पण त्यांचें वर्णन करण्यास लेखकांना बंदी आहे. इतकेंच नव्हे तर ही नवी सत्ता हितावह आहे असें वर्णन त्यांनीं केलेंच पाहिजे असा दण्डक आहे. अशा कात्रींत धरलेल्या प्रतिभेतून कशा प्रकारचें साहित्य निर्माण होईल हें ज्याचें त्यानें ठरवावें.

समर-प्रसगाप्रमाणेंच ' आदर्श सोव्हियेट नायक ' याच्याविषयींचा नियमहि जाचक आहे. यामुळें तर या साहित्याची कळा अगदींच हीन झाली आहे. हा नायक बुद्धिमान्, धैर्यशाली, सत्त्वशील, नीतिनिष्ठ, त्यागी, समाजहित-दक्ष असा सर्व सद्‌गुणांचा पुतळा असलाच पाहिजे असा नियम आहे. अर्थातच असा पुरुष असत्य भासतो, त्याच्या स्वभावलेखनांत प्रतीतिकारकता येत नाहीं, साच्यांत घालून काढलेल्या बाहुल्यासारखी त्याची सर्वत्र सारखी मूर्ति दिसते, त्यांत जिवंतपणा येत नाहीं, हें ध्यानीं येऊन कांहीं लेखक त्याच्या अंगीं कांहीं मानवी वैगुण्यें दाखवूं लागले. जुलै १९५२ च्या सोव्हियेट लिटरेचरच्या अंकांत अशा लेखकांना एका टीकाकारानें सौम्यशी तंबी दिली आहे. तो

म्हणतो कीं, कांहीं दोष, कांहीं वैगुण्य असल्यावांचून व्यक्तिरेखा जिवंत भासतच नाहींत कीं काय ? आपल्या तरुणांना सोव्हियेट समाजांतला पुरुष कसा असतो तें दाखविणें हा आपला हेतु आहे. म्हणून अगदीं निर्दोष व पूर्ण असेंच तें स्वभावचित्र दाखविणें हें लेखकांचें कर्तव्य आहे. (पृ. १४९ ).

सोव्हियेट रशियांतील साहित्य-फौजदारांचा वरीलप्रमाणें दण्डक असल्यामुळें तेथील साहित्यांत वर उल्लेखिलेल्या ॲशक्रॅफ्टनें म्हटल्याप्रमाणें माणसांची दैवी व आसुरी अशी स्वच्छ विभागणी झालेली असते. नव्या जमान्याला अनुकूल तें अगदीं सत्त्वसंपन्न, सत्यनिष्ठ, स्वार्थत्यागी, समाजसेवापरायण, शूर, नीतिमान् असे असावयाचे आणि त्याला प्रतिकूल ते सर्व देशद्रोही, स्वार्थी, भ्याड, दुष्ट, असे असावयाचे असें ठरलेलें आहे. ई. काझाकेव्हिच या लेखकाची 'स्टार' ही कादंबरी पहा. हिला १९४७ चें 'स्टॅलिन प्राइझ' मिळालेलें आहे. लढाईच्या काळांत सैन्याच्या आघाडीच्याहि पुढें राहून जर्मन सैन्यांत विध्वंस करणाऱ्या कांहीं तरुणांची ही कथा आहे. त्या कथेचा नायक ट्रॅव्हकिन हा असाच सर्वगुणसंपन्न आहे. काट्यूशा ही तरुणी त्याच्या नादीं लागून वारंवार या वीरांच्या पथकांत येत असे. ट्रॅव्हकिनचे मित्र त्यांना दोघांना एकत्र आणण्याचा प्रयत्न करीत असत. पण हा धिप्पाड, शूर तरुण इतका निर्विकार, इतका मोहातीत आहे कीं ही प्रमदा आपल्याकडे कशाला येत असावी हेंहि त्याला उमगलें नाहीं ! आतां या कादंबरींतले जर्मन कसे रंगविले आहेत तें पहा. ट्रॅव्हकिनला वाटलें कीं तो आपल्या मॅमोचाकिन्, ॲनिकानॉव्ह वगैरे मित्रांना आज्ञा देतो कीं, तें जर्मनांचें पथक चाललें आहे त्यांतील दोन सैनिक पकडून आणा. त्या मित्रांना हें कार्य अत्यंत सुलभ आहे. सहा फुटी धिप्पाड जर्मन सैनिक एकेका वेळीं एका काखेंत एक, दुसऱ्या काखेंत दुसरा असे धरून ते सहज पळत जाऊं शकतात. पकडलेले जर्मन सैनिक अर्थातच अगदीं भ्याड, निष्ठाशून्य असे असणारच ! ते रडून गयावया करूं लागतात; रशियनांना कामगारांविषयीं सहानुभूति असते हें जाणून 'अहो, आम्ही पण

कामगार आहों' असें सांगून करुणा भाकतात! या अखिल समुद्रवलयांकित पृथ्वीला आपल्या बाहुबलानें ज्या जर्मन वीरांनीं पांच वर्षे त्राहि भगवान् करून सोडलें होतें, आणि ज्यांनीं सोव्हियेट रशियाचा तर खिमा करण्याची वेळ आणली होती, त्यांचें चित्र सोव्हियेट साहित्यिक या तऱ्हेचें काढतात आणि अशांना तेथील सर्वोच्च पारितोषिक दिलें जातें.

**सोशॅलिस्ट रिॲलिझम् तो हाच!**

मानवाची अशी देवासुर विभागणी कधींच झालेली नसते. एक व्यक्ति वा एक समाज सर्वस्वी दैवी संपदेनें युक्त व दुसरी व्यक्ति वा समाज सर्वस्वी आसुरी संपदेने युक्त असें ब्रह्मदेवाच्या सृष्टींत कधींच सांपडत नाहीं, हें साहित्यिकांनीं फार पुरातन काळापासून जाणलेलें सत्य आहे. महाभारतांतील दुर्योधन–दुःशासन हे अगदीं पूर्ण काळे नाहींत आणि धर्म, अर्जुन, भीम हे पूर्ण उजळ नाहींत. स्वाभिमान, मित्रप्रेम, स्वजननिष्ठा, धैर्य, युद्धचातुर्य, बेडरपणा हे गुण दुर्योधन–दुःशासनांच्या ठायीं आहेत; आणि द्यूताचें व्यसन, चिडखोर-पणा, कामुकता, अनिश्चय इ. वैगुण्यें कधीं कधीं पांडवांच्या ठायींहि दिसतात. कोणत्याहि अभिजात ललितकृतींत मानवाचें असेंच चित्र रेखाटलेलें असतें, आणि तेंच सत्य आहे. दैवासुर विभागणी ही अत्यंत बालिश व पोरकट मनो-वृत्तीची द्योतक आहे. मानव मुळींच न कळल्याचें तें लक्षण आहे. सोव्हियेट रशियांत केवळ साहित्यांतच अशी विभागणी केली जाते असें नव्हे तर प्रत्यक्ष व्यवहारांतहि! स्टॅलिनला ज्यांनीं विरोध केला ते त्या विरोधापुरते दुष्ट, देश-द्रोही झाले असें न म्हणतां त्यांच्या सर्व चरित्रावर डांबर फासण्यांत येतें. लेनि-नच्या सर्वच्या सर्व सहकाऱ्यांना स्टॅलिननें गोळ्या घालून ठार मारलें आहे. हे सर्व अत्यंत थोर राष्ट्रभक्त होते हें उघडच आहे. पण स्टॅलिनच्या काळीं ते सर्व राष्ट्रद्रोही ठरले. हा आरोप जगानें एक वेळ खरा मानला असता; पण स्टॅलिननें ते सर्व प्रारंभापासूनच–नव्हे–मागल्या पिढीपासूनच बदमाष, नीच समाजद्रोही, डाकू असे होते असें कम्युनिस्ट पार्टीच्या इतिहासांत लिहवून घेतलें आहे.

मार्क्सवादाला—म्हणजेच खुद्द मार्क्स व एंगल्स यांना—मानवाचें सम्यक् आकलन कधींच झालें नव्हतें. तें आकलन करण्याची पात्रताच त्यांच्या ठायीं राहिलेली नव्हती. मानवी घडामोडींची अत्यंत एकांगी व अत्यंत विकृत अशी मीमांसा त्यांच्या मनांत घर करून बसल्यामुळें त्यांना मानवाच्या मनाचें स्वरूप, त्याच्या प्रवृत्ति, त्याच्या श्रद्धा, त्याच्या आकांक्षा, त्याच्या निष्ठा, त्याचे संस्कार, त्याचे मोह, त्याचे विकार याचें यथार्थ रूप दिसणें शक्य नव्हतें. मार्क्सनें आर्थिक मीमासा सांगितली म्हणून मानवी जीवनातल्या इतर प्रबल प्रेरणा त्याला मान्य नव्हत्या असें समजूं नये, असें कांहीं पंडित म्हणतात. आणि या विधानाच्या पुष्टीसाठीं मार्क्स—एंगल्स यांचीं कांहीं अवतरणें देतात. मार्क्स—एंगल्स यांनीं तसें म्हटलें आहे हें खरें आहे; पण इतिहासाची मीमांसा करतांना एकदांसुद्धां, चुकूनहि ते इतर प्रेरणांचा विचार करतांना दिसत नाहींत तोंपर्यंत या म्हणण्याचा काहीं उपयोग नाहीं. त्या मीमांसा पाहिल्या म्हणजे यांना मानव कळला नव्हता, कळणें शक्य नव्हतें आणि कोणत्याहि मार्क्सवादी पंडिताला तो कळणें शक्य नाहीं, असेंच कोणालाहि म्हणावें लागेल.

देवासुर विभागणी मनांत धरल्यामुळें सोव्हियेट रशियांतील अधिकाऱ्यांचें होणारें अत्यंत क्रूर आणि हिडिस वर्तन आणि वर दाखविल्याप्रमाणें त्याचें वाङ्मयांत पडलेलें प्रतिबिंब याला प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे मार्क्सचें तत्त्वज्ञानच जबाबदार आहे असें वाटतें. कारण त्यातील सर्व सिद्धान्त अगदीं एकांतिक, बेतोल व अंध असे आहेत. समाजाचे दोन अगदीं कापीव, परस्पर-व्यवच्छेदक असे वर्ग तें तत्त्वज्ञान करते. त्यांचा हितसमन्वय कालत्रयीं होणार नाहीं असा त्याचा सिद्धान्त आहे. अंतिम यशापूर्वी एक वर्ग समूळ नष्टच झाला पाहिजे असें त्याला वाटतें. युद्ध, क्रान्ति, उत्पात, विध्वंस यावांचून समाजाची प्रगति होणें शक्य नाहीं असें त्याचें प्रतिपादन आहे. अशा तत्त्वज्ञानामुळें एकांतिक अंधभक्ति व एकांतिक अंधद्वेष मनांत निर्माण न झाला तरच नवल.

सोव्हियेट रशियांतील अधिकाऱ्यांच्या मनाचें पोषण या तत्त्वज्ञानावर झालेलें आहे. त्यांतच त्यांच्या हातीं अभूतपूर्व अशी सत्ता आलेली आहे. सत्ता व तत्त्वज्ञान या दोहींचें मदिरेंत रूपांतर होण्यास वेळ लागत नाहीं. तसें रशियांत झालेलें आहे. त्यामुळें अंधता व असहिष्णुता हीं त्यांचीं प्रधान लक्षणें झालीं आहेत. या धुंद मनोवृत्तींत साहित्य, कला, विज्ञान या आपल्या बटकी व्हाव्या असें त्यांना सहजच वाटतें. म्हणून कायदे करून, अधिकार-मंडळें स्थापून, त्यांनीं आपल्या वासना तृप्त करून घेतल्या आहेत. सत्ताधीशाच्या वासनेला या प्रकारें बळी पडल्यामुळें सोव्हियेट साहित्याची काय दशा झाली आहे, तेथील लेखकांना कसें लाचारीनें वागावें लागत आहे, अधिकाऱ्याच्या मर्जीनुरूप साहित्याचा कसा प्रसव करावा लागत आहे याचें येथवर वर्णन केलें. कला व विज्ञान यांचीहि सोव्हियेट रशियांत तीच गत झाली आहे. पुढील लेखांत कलाकार व विज्ञानवेत्ते यांच्या ललाटरेषेचें वर्णन करूं.

ऑगस्ट १९५३

---

## ११. सोव्हियेट रशियाची संस्कृति

### २. कला व विज्ञान

शंभर—सव्वाशें वर्षांपूर्वी ज्यावेळेस कम्यूनिझमचा उदय होत होता त्यावेळीं त्या पंथाच्या नेत्यांनीं असा दावा मांडला होता कीं, ' जुन्या समाजरचनेंत सर्वत्र भांडवलाचें वर्चस्व झालें असल्यामुळें साहित्य, कला व विज्ञान यांची अगदीं कोंडी होऊन गेली आहे. त्यांच्या विकासाला अणुमात्र अवसर तेथें राहिलेला नाहीं. भांडवलदारी सत्तेच्या दुष्ट, स्वार्थी वृत्तीमुळें, पाशवी जुलुमामुळें आणि तिनें घातलेल्या अन्याय्य बंधनांमुळें साहित्य-कला-विज्ञान यांच्या मार्गांत पावलोपावलीं प्रतिरोध होत आहे. त्यांची गळचेपी होत आहे. साहित्यिक, कलाकार आणि विज्ञानवेत्ते यांना काडीचेहि स्वातंत्र्य राहिलेलें नाहीं आणि यामुळें सध्यांच्या स्थितींत या कार्यांची प्रगति व परिणति अगदीं अशक्य आहे. म्हणून भांडवली समाजव्यवस्था आमूलाग्र उलथून टाकली पाहिजे, मानवाच्या प्रतिभेला घातलेल्या शृंखला तोडून तिला मुक्त केलें पाहिजे आणि तिला अकुंठ स्वातंत्र्य दिलें पाहिजे. असें केलें तरच साहित्य-विज्ञानावर अधिष्ठित असलेली संस्कृति पुन्हां प्रगतिपथाला लागेल आणि बहुजन-समाजाला तिच्या फळांचा आस्वाद घेतां येईल. हें साधावयाचें तर मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा आश्रय करून जुन्या मूल्याचा समूळ विध्वंस केला पाहिजे आणि नवीं कामगारमूल्यें प्रस्थापून नव्या समाजाची उभारणी केली पाहिजे.'

दैवदुर्विलास असा कीं या मार्क्समताअन्वयें नवसमाजरचना करण्याच्या प्रतिज्ञेचें कंकण बांधून शासनयंत्र हातीं घेतलेल्या सोव्हिएट रशियांतील नेत्यांनींच साहित्यिक, कलाकार व शास्त्रज्ञ यांची इतकी विटंबना आरंभिली आहे कीं द्रौपदीची विटंबना तिच्यापुढें कांहींच नव्हे. मानवी संस्कृतीच्या प्रगतीचा, विकासाचा, परिणतीचा उद्‌घोष करणाऱ्या या लोकांनीं ती संस्कृति, आजपर्यंत जगांत कोणी नेली नसेल इतक्या खालच्या पातळीपर्यंत नेऊन पोंचविली आहे. आणि मानवी प्रतिभेला अकुंठ स्वातंत्र्य देऊं, असें म्हणणाऱ्या

या नरांनीं, आम्ही सांगूं त्याच्या शय्येवर तुला गेले पाहिजे व म्हणूं तो प्रसव निर्माण केला पाहिजे, तूं आतां दासी झाली आहेस असें तिला बजावून खरोखरच तिला दासीच्या–बटकीच्या दशेला आणून ठेविलें आहे.

वाङ्मयकलेला सोव्हियेट शास्त्यांनीं आपली संदेशहारिका दासी कशी बनविली त्याची कहाणी मागल्या लेखांत निवेदन केली आहेच. आज संगीत, चित्र इ. इतर कला आणि विज्ञान यांच्या विधिलिखिताचा विचार करावयाचा आहे. हें विधिलिखित साहित्याच्या लिखितापेक्षां मुळींच निराळें नाहीं. असलें तर त्याहून थोडें जास्त दुष्ट, जास्त भयानक असेंच आहे.

पश्चिम युरोपांत स्वातंत्र्य, समता, लोकसत्ता यांच्या घोषणा चालू असल्या तरी त्या सर्व पोकळ, ढोंगी घोषणा असतात, असें सोव्हियेट जनतेला तेथील पुढारी नेहमीं बजावीत असतात. त्याचप्रमाणें कला, विज्ञान या प्रांतांतील सर्जनशीलता, निरपेक्ष सत्यशोधन, या पाश्चात्यांच्या वल्गनाहि फुकट आहेत, त्या कल्पनांचा वाराहि सोव्हियेट कलेला लागतां कामा नये, अशी सोव्हियेट कलाकारांना सक्त ताकीद मिळालेली आहे. या पाश्चात्य कल्पनांचा संपर्क लागला आहे अशी ज्यांच्याबद्दल सोव्हियेट फौजदाराना शंका येते त्यांना ' पश्चिमाळलेले ' असें संबोधून त्यांची मानखंडना करण्यांत येते. १९४८ च्या फेब्रुवारी महिन्यांत डिमिट्रि शेस्टाकोव्हिच, व्हॅनी युराडेली इ. आठ गीतकारांना सेंट्रल कमिटीनें याच कारणासाठीं धारेवर धरलें व सर्व नवमतवाद व सुधारणावाद यांचा त्याग करा, असा त्यांना आदेश दिला. पुढें दोन महिन्यांनीं एप्रिलांत भरलेल्या गीतकारपरिषदेनें ही आज्ञा शिरसावंद्य मानिली. आरम खाचा टूरियन, सेरगी प्रोकाफिव्ह या गीतकारांनीं ' क्षमस्व ' म्हटलें आणि ' वरून झालेल्या या निर्भत्सनेमुळें आम्हा गीतकारांच्या चैतन्याला व नवनिर्माणशक्तीला बहर आला ' असा परिषदेनें कृतज्ञेचा ठराव केला ! ( हॅनस् कोहन, करंट हिस्टरी, फे. १९४९)

मुंबईच्या जहांगीर आर्ट गॅलरीमध्यें गेल्या वर्षी रशियन चित्रकलेचें प्रदर्शन भरलें होतें. त्यांतील चित्रांवर टीकाकारांनीं असा अभिप्राय दिला आहे

कीं, यांतील सर्व चित्रांचा विषय एकच आहे. तो म्हणजे स्टॅलिन हा होय ! मागें सोव्हियेट रशियांतील एका ग्रंथकाराचा लोकांना सन्मान करावयाचा होता, तेव्हां इतर देशांतल्याप्रमाणें त्याचा पुतळा किंवा तैलचित्र न करतां त्यांनीं स्टॅलिनचा पुतळा उभारला व त्या ग्रंथकाराचा एक ग्रंथ त्या पुतळ्याच्या हातीं दिला. त्या वेळीं हा एक सोव्हियेट रशियाविषयीं विनोद म्हणून प्रसिद्ध झाला होता. पण चित्रकलेंत चित्रकारांनीं हा विनोद खरा करून दाखविला आहे. एफ्. एस्. शूरबिन या चित्रकाराचें ' माझ्या मातृभूमींतील उषःकाल ' या अभिधानाचें एक चित्र वरील प्रदर्शनांत होतें. त्यांत मध्यभागीं स्टॅलिनची प्रतिकृति काढलेली आहे, आणि तो पूर्वेकडे पहात आहे असा देखावा दाखविला आहे. सरस्वतीच्या चित्रांत निर्झर, कमळें, तुषार, मोर, वनश्री हीं येतात. पण तें चित्र त्यांचें आहे असें कोणी म्हणत नाहीं, चित्र सरस्वतीचेंच म्हणतात; आणि वनश्रीचें चित्र काढावयाचे असलें तर चित्रांत तिला प्राधान्य देऊन माणसाला जागा दिलीच तर अगदीं गौण अशी देतात; पण सोव्हियेट कलाकारांना हें धोरण ठेवतां येणार नाहीं. स्वतःच्या नजरेंतून दिसणारा उषःकाल त्यांना दाखवितां येणार नाहीं. उषःकाल हा त्यांना महत्त्वाचा नाहींच; तो स्टॅलिननें पाहिला याला महत्त्व !

आणि हें असेंच असलें पाहिजे असें सोव्हियेट रशियाचें तत्त्वज्ञान आहे, असा तेथला दंडक आहे. ए. गरासिनाव्ह या सोव्हियेट कला–फौजदारानें १९४७ सालीं 'प्रवदा'मध्यें एक लेखमाला लिहून ' सोशॅलिस्ट रिॲलिझमचीं जीं तत्त्वें स्टॅलिननें विशद केलीं आहेत, त्याअन्वयेंच आपण लोकसेवा केली पाहिजे, सोव्हियेट वीरपुरुषांचींच चित्रें काढलीं पाहिजेत ' अशी चित्रकारांना ताकीद केली आहे.

' फॉल ऑफ बर्लिन ' हा चित्रपट येथें नुकताच येऊन गेला. तो ज्यांनीं पाहिला असेल त्यांच्या मनांत सोव्हियेट रशियांतील चित्रपटकला सत्ताधीशांची प्रचारदासी आहे याविषयीं अल्पहि संदेह उरणें शक्य नाहीं. या

कथेत संभाव्यतेचाहि प्रश्न नव्हता; प्रत्यक्ष घडलेल्या इतिहासाशींच संबंध होता. हिटलर, गोअरिंग, गोबेल्स या जर्मनीच्या नेत्यांनीं पांच वर्षे जगाला अक्षरशः रडविलें होतें, आणि सोव्हियेट रशियाचें त्यांनीं तळपट करण्याची वेळ आणली होती; यावरून ते पराक्रमी होते, समर्थ, बलशाली, धूर्त, पाताळयंत्री, संघटनाकुशल, साहसी, शूर, बेडर असे होते याविषयीं कोण-त्याहि कलाकाराला संशय घेणें शक्य नव्हतें. पण सोव्हियेट रशियाच्या तत्त्वज्ञानांत निरपेक्ष सत्याला थाराच नाहीं. सर्व सत्यें वर्गसापेक्ष म्हणजे अंतीं स्टॅलिनसापेक्ष असतात. या चित्रपटांत हिटलर व त्याचे सरदार, सेनापति, मुत्सद्दी, मंत्री हे भ्याड, नादान, बेजबाबदार, झोंपाळू, नाकर्ते असे दाखविले आहेत. तोफेचा नुसता आवाज ऐकून ते दचकतात. मरण—घटका आली तरी ते लग्नसोहळ्यांत दंग आहेत ! या चित्रणांत वास्तविक रशिया-चीच बदनामी आहे. अशा लोकांनीं रशियाची दमछाक केली होती हें सोव्हियेट सत्ताधाऱ्यांना खचित भूषणावह नाहीं. पण असला विवेक कर-ण्याचें स्वातंत्र्य रशियन चित्रकलेला नाहीं. बोलवित्या धन्याच्या आवाजाचे पडसाद वाहून नेणें इतकेंच तिचें कार्य, हीच तिची सर्जनशीलता, हीच कामगारसेवा !

जॉन रीड या लेखकानें ' टेन डेज् दॅट शूक दि वर्ल्ड ' या नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. १९१७ सालीं झालेल्या रशियन क्रांतीचें त्यांत वर्णन आहे. सोव्हियेट रशियांत क्रान्तीच्या बालपणीं या पुस्तकाला मोठा मान होता. ऑक्टोबर–क्रान्तीच्या या स्तोत्राला तेथें महाकाव्यासारखी प्रतिष्ठा होती; पण क्रान्तीच्या तरुणपणीं हें सर्व बदललें. कारण क्रान्ति आतां स्टॅलिनची दासी झाली होती. आणि या पुस्तकांत स्टॅलिनस्तवन मुळींच नाहीं. अर्थातच हें पुस्तक सोव्हियट रशियांत आतां जप्त झालें आहे. या पुस्तकावरून याच नांवाचा चित्रपट सेरजी आइन्स्टाईन या दिग्दर्शकानें केला होता. त्याचीहि कथा अशीच घडली. प्रारंभीं तो फारच लोकप्रिय झाला. पण उत्तरकाळांत तो आक्षेपार्ह ठरविण्यांत आला, आणि तेव्हांपासून सेरजी

आइन्स्टाईनचा छळ सुरू झाला. पुढें या यातनांतून तो कायमचा मुक्त झाला ! याच न्यायानें पाहतां कांहीं दिवसांनीं ' फॉल ऑफ बर्लिन ' या चित्रपटावर अशीच संक्रांत येईल असें वाटतें. कारण त्यांत मेलेंकाव्ह याचें स्तोत्र नाहीं. सोव्हियट क्रांतीनें आतां धनी बदलला आहे. तेव्हां त्याचें गुणस्तवन ज्यांत नाहीं तो चित्रपट चांगला असणें शक्यच नाहीं !

संगीत, चित्र या कलांप्रमाणेंच रशियांत नृत्य, नाट्य, शिल्प इत्यादि कलांची दशा आहे. पण त्यांचें निराळें वर्णन देऊन जागा अडविण्याचें कारण नाहीं. त्या सर्व कहाण्या एकसुरी, एकठशी अशाच आहेत. तेव्हां त्यांच्या ललाटलेखाची सहज कल्पना करतां येईल म्हणून तो उद्योग वाचकांवर सोपवून सोव्हियेट रशियांतील विज्ञानाची गोष्ट आतां सांगतों.

२५ जून १९१८ या दिवशीं लेनिनच्या शासनान्वयें कम्युनिस्ट ज्ञानपीठाची स्थापना करण्यांत आली. त्याच वेळीं ' शास्त्रीय–समाजवादाच्या तत्त्वाअन्वयें सर्व शास्त्रांचा अभ्यास करणें ' हें त्याचें ध्येय ठरविण्यांत आलें होतें. २६ नोव्हेंबर १९२६ च्या सेंट्रल एग्झिक्यूटिव्ह कमिटीच्या शासनात हें ध्येय आणखी स्पष्ट करण्यांत आलें. अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, इतिहास इ. सामाजिक शास्त्रांचा व रसायन, पदार्थविज्ञान, भूगोल, खगोल इत्यादि जड-शास्त्रांचा, मार्क्स–लेनिनवादाच्या सिद्धांतान्वयें विकास करणें हें ध्येय निःसंदिग्धपणें निश्चित केलें गेलें. या ज्ञानपीठाचीं तीन उद्दिष्टें होतीं. मार्क्स-लेनिनवादाचा विकास करणें, भांडवली विकृतीशीं संग्राम करणें व समाज-शास्त्रें व भौतिकशास्त्रें यांत विरोधविकासवादाचा अनन्य पुरस्कार करणें हीं तीं उद्दिष्टें होत.

सिडने वेब या प्रख्यात इंग्रज पंडितानें आपल्या ' सोव्हियेट कम्युनिझम् ' या ग्रंथांत वरील सर्व माहिती दिली आहे. सिडने वेब हे सोव्हियेट रशियां-तील नवसंस्कृतीचे कट्टे पुरस्कर्ते असून सर्व ग्रंथ त्यांनीं अतिशय सहृदयतेनें, सहानुभूतीनें लिहिलेला आहे. आणि सोव्हियेट रशियानें विज्ञानाविषयीं प्रगट केलेल्या या वृत्तीसंबंधीं लिहितांना त्यांनीं सहानुभूतीनें व आपलेपणानेंच

पुढील टीका केली आहे. ते म्हणतात, या धोरणामुळें शास्त्रांच्या क्षेत्रांत पुष्कळ वेळां प्रत्यक्ष वस्तुस्थिति व घटितें यांचा अभ्यास करून निर्णय करण्याऐवजीं मार्क्स, एंगल्स, लेनिन, स्टॅलिन यांच्या वचनांवरून निर्णय केला जातो. एखादा सिद्धात चूक आहे असें सांगतांना शास्त्रीय पद्धतीनें त्याचें खंडन करण्याऐवजीं, हा भ्रंश आहे, ही च्युति आहे, हा अधःपात आहे असा एकदम गहजब केला जातो. एके ठिकाणीं वेब म्हणतात कीं, १८४५ च्या सुमारास मार्क्सनें लिहिलेल्या वचनांना अजूनहि चिकटून बसणें हें विरोधविकासवादाच्या दृष्टीनेंच सयुक्तिक नाहीं. कारण जग सारखें बदलत आहे, हा त्या तत्त्वज्ञानाचाच सिद्धान्त आहे. पण हें कोणी लक्षांत घेत नाहीं. मागें बायबलवचनान्वयें सत्यनिर्णय करीत. आतां मार्क्सवचनाअन्वें करतात एवढाच फरक. मार्क्सच्या डोळ्यांदेखतच हे प्रकार घडूं लागले होते. म्हणूनच 'मी मार्क्सवादी नाहीं' असें त्यानें जाहीर केलें असावें. 'जर्नल ऑफ मार्क्सिस्ट लेनिनिस्ट नॅचरल सायन्सेस' या मासिकांतील लेखांत तेथील शास्त्रज्ञ 'गणितशास्त्रांत आम्ही कम्युनिस्ट पार्टीच्या वतींनेंच निर्णय करणार', 'शल्यतंत्रांत (सर्जरींत) मार्क्सलेनिनवादाचाच पुरस्कार केला पाहिजे' असें अभिमानानें सांगतात. मार्क्सचें तत्त्वज्ञान असें अन्धसिद्धान्त म्हणून स्वीकारलें तर लोकांचा बुद्धिविकास कुंठित होईल अशी सिडने वेब यांनीं भीति व्यक्त केली आहे. पण या शब्दप्रामाण्याच्या रोगांतून सोव्हियट रशिया लवकरच मुक्त होईल अशी आशाहि पण त्यांनीं लिहून ठेवली आहे. ('सोव्हियेट कम्यूनिझम, ए न्यू सिव्हिलिझेशन'—सिडने ॲन्ड बिट्राइस वेब, तिसरी आवृत्ति १९४४, पृ. ७७८, ७७९, ८०१–८०७).

पुढील दहाबारा वर्षांत सिडने वेब यांची ही आशा सफल होण्याची कसलींहि चिन्हें दिसूं लागलीं नाहींत. मँचेस्टर विद्यापीठांतील जीवनशास्त्राचे प्राध्यापक एरिक ॲसबी यांना गेल्या महायुद्धाच्या शेवटीं ब्रिटिश सरकारनें रशियांत पाठविलें होतें. तेथें ते वर्ष दीड वर्ष होते. तेथून परत आल्यावर १९४७ सालीं त्यांनीं 'सायंटिस्टस् इन् सोव्हियट रशिया' या नांवाचा

ग्रंथ लिहून सिडने वेब्र यांनीं उल्लेखिलेला शब्दप्रामाण्याचा रोग सोव्हियेट रशियांत किमपि कमी झालेला नाहीं असाच आपला अभिप्राय नमूद करून ठेविला आहे. रशियन शास्त्रज्ञांबद्दल प्रा. ॲसबी यांना फार आदर आहे त्या शास्त्रज्ञांनीं विज्ञानक्षेत्रांत खूपच प्रगति केली आहे असें त्यांचें मत आहे. पण असें असूनहि ते म्हणतात कीं, शास्त्रज्ञ केवढाहि मोठा असला व त्याचा सिद्धान्त इतर प्रमाणांनीं कितीहि मान्य ठरला असला तरी तो सिद्धान्त जर विरोधविकासवादाशीं विसंगत असेल, त्याविरुद्ध असेल तर त्याचा त्याग करून तो असत्य मानलाच पाहिजे असा रशियांत कायदा आहे. स्टॅलिननें कांहीं 'बोल्शेव्हिक स्वयसिद्धान्त' म्हणून सांगितलेले आहेत. ॲसबी म्हणतात हे सर्व अपसिद्धान्त आहेत. त्यांत सिद्ध असें कांहीं नाहीं. तरीसुद्धा ते प्रमाण मानून अनुभव-प्रयोगांनीं सिद्ध झालेलीं सत्यें अमान्य केलीं जातात. मार्च १९३९ मध्यें कम्युनिस्ट पार्टीची १८ वी परिषद् भरली होती. त्यावेळीं स्टॅलिननें असें जाहीर केलें : 'वैद्यकशास्त्रज्ञांना बॉटनी, फिजिक्स हीं शास्त्रें अवगत नसलीं तरी चालतील; पण विरोधविकासवादाचें ज्ञान त्यांना असलेंच पाहिजे !'

भिन्नभिन्न सामाजिक शास्त्रें व जड शास्त्रें यांच्या क्षेत्रांत या अंध शब्द-प्रामाण्यामुळें, या रानटी सुलतानीमुळें काय परिणाम झाले आहेत तें पाहूं. मागें साहित्याचें विवेचन करतांना सांगितलें होतें कीं, पडितांचा प्रत्येक सिद्धान्त विरोधविकासवादाशीं सुसंगत असला पाहिजे एवढाच कायदा असता तर त्याविषयीं कसा तरी निर्वाह करतां आला असता. पण तसा तो सुसंगत आहे कीं नाहीं हें स्टॅलिनच्या व त्याच्या फौजदारांच्या मर्जीनुरूप ठरावयाचें असल्यामुळें विज्ञानवेत्त्यांच्या कपाळीं कमालीची गुलामगिरी व लाचारी आलेली आहे.

सोव्हियट दंडधारी हे अर्थशास्त्रवेत्त्यांना आपल्या शब्दांच्या तालावर नाचायला लावून त्यांच्याकडून माकडाप्रमाणें खेळ कसे करून घेतात हें सुप्रसिद्धच आहे. १९३० सालीं डॉ. ऑस्ट्रोव्हिट्यानॉव्ह या अर्थपंडितानें

'औटलाइन्स ऑफ पोलिटिकल एकॉनमी' हा ग्रंथ लिहिला. त्या वेळी स्टॅलिनच्या फौजदारांची मर्जी त्याच्यावर सुप्रसन्न असल्यामुळें सर्व विद्यापीठांत तो मान्य होऊन 'कम्युनिस्ट अर्थशास्त्राचा आधारभूत ग्रंथ' असा त्याला मान मिळाला. ही पोलीसमान्यता १० वर्षें टिकली. त्यानंतर दंडधरांची मर्जी, लहर किंवा त्या पंडिताचें दैव फिरलें. इतर देशांत एक ग्रंथ काढून दुसरा नेमतात तेव्हां पहिल्याचा निषेध केला जात नाहीं. पहिल्यांतले मूलसिद्धांतच कांहीं चुकले आहेत असा आरोप करीत नाहींत. नवा ग्रंथ जास्त चांगला आहे, त्यांत विवेचन जास्त स्पष्ट आहे, दृष्टिकोन निराळा आहे अशा तऱ्हेचें कांहीं तरी कारण असतें. किंवा जुन्या ग्रंथाची अद्यावतता कमी झालेली असते. किंवा दुसऱ्या कोणा ग्रंथकाराला राजाश्रय द्यावा, साह्य करावें असाहि हेतु असतो; पण सोव्हियेट रशियांत तसें नाहीं. विज्ञानक्षेत्रांतील फौजदारांची मर्जी फिरतांच ग्रंथ व ग्रंथकार यांच्यावर भडिमार सुरू होतो. डॉ. ऑस्ट्रोव्हिट्यानॉव्ह यांची हीच गत झाली. त्यांनीं लेनिनचीं चुकीचीं अवतरणें दिलीं, मार्क्स-लेनिन यांचे बनावट संवाद छापून दिले, अशा तऱ्हेचे आरोप त्यांच्यावर केले गेले व त्यांना एकदम अर्धचंद्र मिळाला. रशियांत मार्क्स व लेनिन यांच्या वचनांचा वेदवाक्याप्रमाणें अभ्यास करणारे लक्षावधि लोक असतांना त्यांचीं चुकीचीं अवतरणें दहा वर्षांत कोणाच्याही ध्यानांत आलीं नाहींत, हें तेथील पंडितांच्या बुद्धिमत्तेचें लक्षण कीं हा तेथील फौजदाराचा प्रभाव ? कसेंहि असो; या अर्थपंडिताला पुण्यक्षय झाल्यामुळें मर्त्यलोकांत यावें लागलें हें खरें. ऑस्ट्रोव्हिट्यानॉव्ह याच्यानंतर लिऑनटेयेव्ह या पंडिताच्या 'इंट्रोडक्शन टु पोलिटिकल एकॉनमी' या ग्रंथाला मान्यता मिळाली. याच सुमारास डॉ. वार्गा या दुसऱ्या एका अर्थवेत्त्यालाहि मोठें पद देण्यांत आलें. १९४६ ते १९४८ च्या दरम्यान ए. झेडनॉव्ह हा अधिकारी कम्युनिस्ट प्रसिद्धीखात्यांत प्रमुखपदावर आला. त्याबरोबर डॉ. वार्गा याच्यावर संक्रांत आली आणि झेडनॉव्ह याचा सखा निकोलाय ए. व्हाझनेसेन्स्की याला अर्थशास्त्रचूडामणी, मुकुटमणि इ. पदव्या

मिळाल्या. पण दोन वर्षांनीं झेडनॉव्ह हा मृत्यु पावतांच या चूडामणीचा शंखशिरोमणी होऊन तो खालीं कोसळला. मध्यंतरीं सरकारी आदेशाप्रमाणें वार्गानें आपलीं मतें सुधारलीं व प्रवदा इत्यादि पत्रांत माफीपत्रें प्रसिद्ध केलीं. आत्मनिंदा भरपूर केली. तेव्हां त्याला पुन्हां मोठें स्थान मिळालें. त्यावेळीं स्टॅलिनचें अमेरिकेशीं मैत्रीचें धोरण होतें, आणि तेंच पुढें टिकेल अशा हिशेबानें वार्गानें आपला नवा ग्रंथ स्टॅलिनच्या श्रीमुखाकडे बघत बघत लिहिला. ‘ कॅपिटॅलिस्ट एकॉनमी आफ्टर दि वॉर ’ हें त्या ग्रथाचें नांव. अमेरिकेला प्रिय असें अर्थशास्त्र लिहिणें त्या वेळीं अवश्य आहे असें वाटल्यामुळें वार्गानें लिहून टाकले कीं, मार्क्समताप्रमाणें भांडवली देशांत पुन्हां पुन्हां येणारें आर्थिक अरिष्ट अमेरिकेंत मात्र पुढील कांहीं वर्षे येणार नाहीं. पण येथें त्याचा अदमास चुकला होता. स्टॅलिन त्या वेळीं बाह्यतः अमेरिकेविषयीं जरी मैत्री दर्शवीत होता तरी अंतरांतून त्याचें धोरण पालटत होतें. आणि एकदम एकाएकीं अमेरिकेवर त्यानें भडिमार सुरू केला. अर्थातच वार्गाचा ग्रंथ फुकट गेला आणि त्याला स्वतःलाहि पदच्युत व्हावें लागलें. यानंतर डॉ. शेदिलॉव्ह यानीं फौजदाराची मर्जी संपादण्यांत यश मिळविलें आणि मग ते ‘ अर्थचूडामणि ’ झाले !

दंडधरांच्या तालावर ज्याप्रमाणें अर्थचूडामणींना नृत्य करावें लागतें त्याचप्रमाणें इतिहास-मुकुटमणींनाहि करावें लागतें. साधारणतः १९२४ पर्यंत रशियांत इतिहासविषयक मार्क्सवादी दृष्टिकोन प्रमाण मानला जात असे. त्याअन्वयें रशियाचा खरा इतिहास १९०० सालापासूनच सुरू होतो, तत्पूर्वीचा इतिहास हा सर्व काळा इतिहास होय असें मत प्रचलित होतें. रशियाच्या पूर्वपरंपरा या इतर देशांतल्याप्रमाणेंच सरदार, सरंजामदार, संस्थानिक, सेनापति, राजे यांच्या पराक्रमानेंच निर्माण झालेल्या आहेत. त्यामुळें त्यांचा निषेध करून त्यांविषयीं तरुण पिढीच्या मनांत कमालीचा तिटकारा निर्माण करावा असा इतिहासलेखकांचा हेतु असे. त्याप्रमाणें मायकेल पोक्राव्हस्की यानें इतिहास तयार केला. लेनिननें त्याला प्रस्तावना

लिहिली, आणि सर्व विद्यालयांतून त्याचा पाठ्यपुस्तक म्हणून अभ्यास सुरू झाला. पीटर दि ग्रेट, पोझारास्की, कोझमा मिनीन या पूर्वीच्या वीरांचे पराक्रम अर्थातच या इतिहासाला उपेक्षणीय वाटत होते. त्यानें त्यांचा तसाच परामर्श घेतला होता; पण १९३५ सालीं फौजदारलोकांच्या असें ध्यानांत आलें कीं मरण—मारणाच्या संग्रामांत पूर्वपरंपरेच्या अभिमानानें जसें बळ येतें, त्या भक्तीनें शिपायांना जसा आवेश येतो, त्या पूर्वजांच्या स्मृतीसाठीं ते जसे प्राणार्पणास सिद्ध होतात तसें बळ, तसा आवेश व तशी सिद्धता जगतांतील कामगारांच्या प्रेमानें येत नाहीं, वर्गविग्रहाच्या प्रेरणेनें येत नाहीं, मार्क्सच्या स्मृतीनें येत नाहीं आणि नांगर, गिरण्या, कारखाने इ. अर्थोत्पादनाच्या साधनांनींहि येत नाहीं. ' मदर रशिया ' या पुस्तकांत सोव्हियेट रशियावर नितान्त भक्ति करणारा मॉरिस हिंडस यानेंहि म्हटलें आहे कीं, रशियाचा या वेळचा शत्रु जो जर्मनी त्याचें सामर्थ्य केवळ आसुरी होतें, महाभयानक होतें. त्याच्याशीं चाललेला संग्राम हा अगदीं निकराचा, अगदीं प्राणान्ताचा होता. या वेळीं स्वकीय असा जो पीटर दि ग्रेट, किंवा अलेक्झँडर नेव्हस्की त्याच्या स्मरणानें ज्या भावना उचंबळून येतात त्या परकीय असा जो कार्ल मार्क्स त्याच्या केवळ तात्त्विक भक्तीनें येणें शक्य नाहीं. त्यामुळें या वेळीं दण्डधरांना मार्क्सला वाऱ्यावर फेंकून देऊन पूर्वपरंपरेच्या पूजेला सज्ज व्हावें लागलें. अर्थात् यांत वाईट असें कांहीं नव्हतें. एखादा सिद्धान्त चुकीचा वाटला तर तो सुधारण्यास कसलीच हरकत नाहीं. पण स्टॅलिन किंवा लेनिन हे चुकत नाहींत, चुकूं शकत नाहींत! त्यांचें धोरण चुकलें आहे, तें बदलणें अवश्य आहे असें ध्यानांत येतांच त्यांना त्या धोरणाच्या पितृत्वातून मुक्त करण्यांत येतें व इतिहासचूडामणि, अर्थचूडामणि म्हणून पाळलेल्या प्राण्यांचा बळी देण्यांत येतो. पोक्राव्हस्कीचें तेंच झालें. लेनिननें त्याच्या इतिहासाला प्रस्तावना लिहिली असूनहि त्याला व त्याच्या इतिहासाला एकदम पदभ्रष्ट करण्यांत आलें. पीटर, नेव्हस्की यांच्या कार्याचें मर्म त्याला कळलें नाहीं असें जाहीरपणें सांगितलें गेलें आणि शेस्टॉकॉव्ह या पांडिताला इतिहास—

चूडामणि करण्यांत येऊन त्याच्या इतिहासाचा अभ्यास सर्वत्र जारी कर-करण्यांत आला. मार्क्सच्या मतें आतांपर्यंतचा जगाचा सर्व इतिहास वर्ग-विग्रहाचा इतिहास आहे. मार्क्सवादाचें हें मूलमहातत्त्व आहे. पण शेस्टॉ-कॉव्हनें लिहून टाकलें कीं, रशियाचा पूर्वइतिहास हा वर्गविग्रहाचा इतिहास नाहीं! आणि हें त्याचें मत म्हणजे मार्क्स-लेनिनवादाचाच विकास आहे!

सत्य घटनांचें वर्णन करणें हा सोव्हियट रशियांतील लेखकांचा कधींच हेतु नसतो. त्या त्या वेळीं जो सत्ताधीश असेल त्याला जें अनुकूल असेल तें सत्य अशीच तेथें सत्याची व्याख्या आहे. १९१७ सालीं झारची सत्ता उलथून पडल्यानंतर एक हंगामी सरकार स्थापन झालें होतें. मार्क्सच्या तत्त्वान्वयें त्या वेळीं रशियांत भांडवली पार्लमेंटरी लोकसत्ता प्रस्थापित होणें हेंच इतिहासक्रमांत बसत होतें. त्यामुळें त्या वेळीं स्वतःच्या हातीं सत्ता घेणें योग्य नव्हे असें लेनिनखेरीज सर्व बोल्शेव्हिक नेत्यांचें मत होतें. स्टॅलिन-चेंहि मत सत्ता घेण्याच्या विरुद्धच होतें. हद्दपारींतून मार्चच्या दुसऱ्या आठव-ड्यांत स्टॅलिन रशियांत परत आला त्या वेळीं जर्मनीशीं युद्ध चालू ठेवावें व केरेन्स्कीच्या हंगामी सरकारास पाठिंबा द्यावा असेंच तो प्रतिपादन करीत होता. हें प्रतिपादन लेनिनच्या मताच्या विरुद्ध होतें. युद्ध एकदम बंद करावें आणि हंगामी सरकारला पाठिंबा देऊं नये असें लेनिन स्विट्झरलंडमधून सारखें लिहीत होता—तशा तारा करीत होता. तरी स्टॅलिन, कॅमेनेव्ह म्हणतच राहिले कीं, लेनिनला येथली परिस्थिति माहीत नाहीं, येथें आल्या-वर त्याचें मत बदलेल. पण रशियांत परत आल्यावर लेनिननें मत बदललें नाहीं. पहिलेंच मत ठासून मांडलें. हें पहातांच स्टॅलिननें आपलें मत बदललें. इतर अनेकांनीं आपलीं मतें अशींच पालटलीं. कांहींनीं मात्र लेनिनला विरोध चालू ठेवला. इतिहास असा आहे. [लेनिन चरित्र—मिरस्की : पृ. ८८ ते ९४. 'रशियांतील राज्यक्रांति'—पां. वा. गाडगीळ : पृ. १७४-१७८] पण स्टॅलिनच्या आदेशानुसार लिहिलेल्या बोल्शेव्हिक पार्टीच्या इतिहासांत याहून अगदीं उलट लिहिलें आहे. युद्धाला विरोध

करावा व हंगामी सरकारवर विश्वास ठेवूं नये असेंच स्टॅलिननें प्रतिपादन केलें, असें या इतिहासांत दिलें आहे (पृ. १७७). लेनिनच्या विरुद्ध स्टॅलिन बोलत होता व पुढें त्याचें मत चुकीचें ठरलें हें इतिहासांत येतां कामा नये! कारण स्टॅलिन हा रोमच्या पोपप्रमाणें प्रमादरहित आहे. बुखारिन वगैरे कांहीं लेनिनचे मित्र व बोल्शेव्हिक क्रांतीचे नेते हे १९३६ सालापर्यंत स्टॅलिनचेहि दोस्त होते. तोंपर्यंत रशियांत त्यांचा गौरव होत होता. त्यांच्याविरुद्ध कसलाहि आरोप नव्हता. १९३७ सालीं त्यांच्यावर स्टॅलिनची मर्जी खप्पा झाली. त्यांना परलोकीं धाडण्यांत आलें. आणि आतां पार्टीच्या इतिहासात लिहिलें आहे कीं, १९१८ सालींच बुखारिन लेनिनचा खून करण्याच्या कारस्थानांत होता (पृ. २१८). जगांतील पराक्रमी लोक पुढील इतिहासाला वळण लावण्याची ईर्षा बाळगतात; पण कम्युनिस्ट मागल्या काळाच्या इतिहासांतहि नवनिर्मिति घडवून आणतात!

इतिहास, अर्थज्ञान या शास्त्रांप्रमाणें प्रायोगिक शास्त्रामध्येंहि सोव्हियेट रशियानें अशाच तऱ्हेची रानटी व आसुरी वृत्ति प्रगट केली आहे. पश्चिम युरोपांत जीवनशास्त्राची पुष्कळच प्रगति झाली आहे. त्यांत वंशशास्त्राचाहि अभ्यास झाला आहे. मेंडेल, मॉर्गन हीं नांवें या क्षेत्रांत सुविख्यात आहेत. यातील मेंडेल याचा असा सिद्धांत आहे कीं, मनुष्याचे कांहीं गुण पिढ्यान्‌पिढ्या तसेच स्थिररूपानें संक्रांत होत असतात, त्यांत बदल होत नाहीं. मार्क्सच्या तत्त्वज्ञानांतील विरोधविकासवादामध्यें असें तत्त्व आहे कीं जगात कांहींहि स्थिर नाहीं, प्रत्येक गोष्ट बदलत आहे. मेंडेलचें मत या मताशीं विरोधी असल्यामुळें सोव्हियेट शास्त्रज्ञांनीं त्याला 'फॅसिस्ट, भांडवलदारांचा गुलाम, लुच्चा' अशा शिव्या देण्यास प्रारंभ केला. वास्तविक मेंडेलचें मत मान्य नव्हतें तर प्रयोगानें, पुराव्यानें तसें सिद्ध करणें हा शास्त्रीय जगातला नेहमींचा मार्ग आहे. पण सोव्हियेट रशियांतल्या पंडितांना शिव्यांचा मार्ग जास्त पसंत वाटतो. टी. डी. लायसेंको हा सोव्हियेट शास्त्रज्ञ यासाठीं प्रसिद्ध आहे. सध्यां तो रशियांत जीवनशास्त्रचूडामणि झाला आहे. एन्. आय्.

व्हॉव्हिलॉव्ह या दुसऱ्या सोव्हियेट शास्त्रज्ञानें लायसेंकोचें मत मानण्याचें नाकारलें व त्याच्यावर टीका केली. अर्थातच त्यामुळें लायसेंकोच्या पाठीराख्या देवता कोपल्या. व्हॉव्हिलॉव्ह हा इन्स्टिट्यूट ऑफ प्लॅंट इंडस्ट्री या संस्थेचा डायरेक्टर होता. त्या पदावरून त्याला खालीं ओढण्यांत आलें. तरीहि तो नमला नाहीं. तेव्हां त्याला तुरुंगांत धाडण्यांत आलें. तेथें तो तीन वर्षांच्या अवधींत नाहींसा झाला. त्याचें काय झालें हें जगाला कळलें नाहीं ! विज्ञानाच्या क्षेत्रांतील लायसेंको नामक फौजदाराचें न ऐकल्याबद्दल, स्वतंत्र बुद्धि चालविल्याबद्दल, त्याला हें प्रायश्चित्त मिळालें

डिसेंबर १९४८ मध्यें रशियांत ज्योतिषशास्त्रज्ञांची परिषद भरली होती. त्या वेळीं सर्व शास्त्रज्ञांनीं अशी ग्वाही दिली कीं, आम्ही पश्चिमेंतील शास्त्रज्ञाच्या सापेक्षतावादाचा कधींहि पुरस्कार करणार नाहीं; त्याला नित्य विरोधच करूं. त्याचप्रमाणें विश्व हें सांत आहे हे जें क्रान्तिविरोधी (?) तत्त्व त्याचाहि, सतत अधिक्षेप करूं. त्यांनीं त्या सभेंत असा ठराव केला कीं आइन्स्टाइन् याचा सापेक्षतावाद हा प्रतिगामी, प्रतिक्रान्तिकारक आहे. पाश्चात्य शास्त्रज्ञ भांडवली सत्तेपुढें नमल्याचें, तिचे गुलाम झाल्याचें तें लक्षण आहे. याच सभेंत उत्तरध्रुव-संशोधनाविषयींहि ठराव झाला. याविषयीं ओलो शिमिट् याची उपपत्ति सभेनें मान्य केली, आणि त्या उपपत्तीला विरोध करणारा मॉस्को विद्यापीठांतील प्राध्यापक माइसिव्ह याला 'तूं आपलीं मतें बदलून सोव्हियेट शास्त्राशीं तीं सुसंगत करून घे' अशी ताकीद दिली. नंतर या सभ्यांनीं ब्रिटनमधील जगद्विख्यात शास्त्रज्ञ सर जेम्स जीनस्, सर आर्थर एडिंग्टन, ई. ए. मिल्ने यांना रीतीप्रमाणें व हुकमाप्रमाणें शिव्या देण्याचा कार्यक्रम केला. (भारतज्योति : २४ जुलै १९४९).

रशियांत ज्ञानकोशांतील शब्दांच्या अर्थांत आणि इतर माहितींतहि विज्ञान-फौजदारांच्या मर्जीप्रमाणें नेहमीं बदल केला जातो ! 'कॉसमॉपॉलिटन' हा शब्द घ्या. १९३५ च्या सुमारास रशियांत अजूनहि जगांतील कामगारांवर प्रेम करण्याची चाल होती. राष्ट्रनिष्ठेचा उदय झाला होता, तरी सर्व जगा–

कडे आपलेपणानें पहाणरा मनुष्य अजून निंद्य ठरला नव्हता. त्या सालच्या सोव्हियेट ज्ञानकोशांत 'कॉसमॉपॉलिटन' या शब्दाचा अर्थ पुढीलप्रमाणें दिला आहे: 'आपण अमुक एका विशिष्ट देशाचे नसून जगाचे नागरिक आहों, सर्व जगच आपलें घर आहे असें निश्चयानें सांगणारा मनुष्य.' यानंतर वरील अर्थानें दर्शविलेली वृत्ति ही रशियांत दण्डधरांनीं आक्षेपार्ह ठरविली. तेव्हां १९४९ सालच्या ज्ञानकोशांत त्याच शब्दाचा अर्थ मर्जीप्रमाणें बदलून देण्यांत आला. 'देशद्रोही, भांडवली वृत्तीचा, सर्व जगच माझी मायभूमि आहे असें सांगून स्वदेशरक्षणास सज्ज नसणारा ढोंगी मनुष्य' असा कॉसमॉपॉलिटन शब्दाचाच अर्थ १९४९ च्या आवृत्तींत दिला आहे [भारत-ज्योति: २७–८–५०] अगदीं नव्या आवृत्तींत ॲटम्‌विषयीं माहिती देतांना या संशोधनाचें श्रेय सर्व जगानें एकमतानें ज्याला दिलें आहे त्या आइन्स्टाइनचा उल्लेखहि केलेला नाहीं. कोणी रशियन शास्त्रज्ञ लिबिदेव याला ॲटम्‌चा संशोधक म्हणून निर्देशिलें आहे. अशा रीतीनें सर्व प्रकारच्या संशोधनाचें श्रेय बहुतेक ठिकाणीं रशियाला देण्याचा प्रयत्न केला आहे. परवां तेनसिंगानें एवरेस्टवर पाऊल ठेवल्याची बातमी आल्यावर 'टाइम्स ऑफ इंडिया'मध्यें एका गृहस्थानें पत्र लिहून रशियाविषयीं आपण निराश झालों असें सांगून पुढीलप्रमाणें कारण दिलें होतें. तो म्हणतो, 'सोव्हियेट दंडधरांनीं एव्हांना जाहीर करावयास हवें होतें कीं, हिमालय हा उरल पर्वतापेक्षां ठेंगणा आहे. किंवा हिमालय हा रशियांत आहे. आणि एवरेस्टवर पूर्वींच एक रशियन मनुष्य चढलेला आहे.' त्या पत्रलेखकानें हें उपहासानें लिहिलें आहे. पण सोव्हियेट रशियाची वृत्ति पाहतां ते लोक खरोखरच असें जाहीर करण्यास कमी करणार नाहींत असें वाटतें.

व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य हें जगाचें सर्वश्रेष्ठ धन आहे. आणि आतांपर्यंतच्या जगाच्या इतिहासांत असें दिसतें कीं जुलमी, मदांध व स्वार्थी सत्ताधारी आपल्या प्रजेचें हें धन कटाक्षानें लुबाडतात. प्रत्यक्ष धनाच्या पिळणुकीपेक्षां, रक्ताच्या शोषणापेक्षां ही पिळणूक व हें शोषण जास्त भयंकर,

जास्त घातक आहे. मागें पोपनें आपल्या प्रजाजनांपैकीं जे कोणी बायबलच्या—म्हणजे पर्यायानें त्याच्या स्वतःच्या—वचनाला विरोध करतील त्यांना जिवंत जाळून हालहाल करून मारण्याचा क्रम ठेविला होता. आतां सोव्हियेट दण्डधरांनीं तोच क्रम पुढें चालू केला आहे. त्यांच्या वचनाला विरोध केल्यामुळें ज्यांना प्राणास मुकावें लागलें अशा पडितांच्या याद्याच्या याद्या प्रसिद्ध झाल्या आहेत. रायझेनॉव्ह हा तत्त्ववेत्ता, प्लॅटानाव्ह, इगॉरॉव्ह, बोटेंको हे इतिहासपंडित, लेव्हाइन, कॅसॅरॉव्ह, इव्हॅशीव्ह हे भिषग्वर, रियाझँट्झिव्ह, कॅरेटिगाइन, किली, लॅझरेव्ह हे रसायन व पदार्थशास्त्रज्ञ, हे सर्व असे बळी गेलेले आहेत. हॅरॉनाव्ह या खगोलशास्त्रज्ञाचा तर प्रारंभीं रशियन केप्लर म्हणून गौरव होत होता; पण स्टॅलिनच्या फौजदारांची मर्जी फिरतांच तो प्राणास मुकला. फ्रेंच क्रान्तीमध्यें एकट्या लॅव्हासियर याच शास्त्रज्ञाचा असा बळी पडला होता. सोव्हियेट क्रान्ति या दृष्टीनें कितीतरी श्रेष्ठ आहे!

रशियांत विज्ञानाची, जडशास्त्रांची वाढ करावी यासाठीं दण्डधरांचा आटोकाट प्रयत्न चालू आहे. पण हे सर्व विज्ञानसामर्थ्य केवळ सरकारच्या, सत्ताधारी वर्गाच्या हातीं ठेवण्याचा त्यांचा कटाक्ष आहे. समाजांत बुद्धिस्वातंत्र्य असलें म्हणजे विज्ञान हें सामर्थ्य जनतेच्या हातीं आलेलें असतें, आणि सत्ताधाऱ्यांना शह देणें तिला शक्य होतें; पण जनतेचें बुद्धिस्वातंत्र्य मारून विज्ञानाची जोपासना करणें म्हणजे पराकाष्ठेची विषमता निर्माण करण्यासारखें आहे. भांडवली पद्धतींत गरीब हे दिवसें-दिवस जास्त दरिद्री होतात व श्रीमंत हे जास्त सधन होत जातात, असें मार्क्स-वाद म्हणतो. विज्ञानउपासनेच्या सोव्हियेट पद्धतींत जनता ही दिवसेंदिवस जास्त दुबळी, असहाय्य होत जाऊन सत्ताधारी विज्ञानबळानें जास्त बलशाली होत जातात. हा कमालीचा घातक असा वर्गभेद होय. मागें पीटर दि ग्रेट यानें युरोपांतून लष्करी विद्या रशियांत आणली. त्यावेळीं रशियन प्रजा जुन्याच वातावरणांत राहिली आणि रशियन लष्कर मात्र अद्ययावत् पाश्चात्य

झालें. त्यामुळें झार हे कमालीचे अनियंत्रित व जुलमी झाले, होऊं शकले. तेंच आतां होत आहे. स्टॅलिन, मेलेंकाव्ह हे आपल्या प्रजेला शब्दप्रामाण्याच्या, अंधश्रद्धेच्या, दौर्बल्याच्या वातावरणांत ठेवून आपण मात्र युरोपीय विज्ञानाचें सामर्थ्य हस्तगत करीत आहेत. त्यामुळें शास्ते व शासित यांच्यांत सर्व प्रकारच्या सामर्थ्याच्या दृष्टीनें कमालीची विषमता निर्माण होत आहे, झाली आहे. रशियन दण्डधरांचें तेंच उद्दिष्ट आहे.

जगात आजपर्यंत अनेक संस्कृति निर्माण झाल्या. त्यातील कांहीं अस्तहि पावल्या. भारतीय, चिनी, ग्रीक, रोमन, आरब या जुन्या व अर्वाचीन पाश्चात्य संस्कृति या सर्वांबद्दल इतिहासानें असा निर्वाळा दिला आहे कीं, पहिल्या शें–दोनशें वर्षांच्या काळांत तरी या संस्कृतींनीं मानवी बुद्धीचे, प्रज्ञेचे, कर्तृत्वाचे, प्रतिभेचे अनेक चमत्कार करून दाखविले आहेत. काव्य, नाट्य, शिल्प, चित्र, संगीत इ. कला व गणित, रसायन, ज्योतिष पदार्थ-विज्ञान, वैद्यक इ. शास्त्रें या क्षेत्रांत अमर अशा कृति, सिद्धांत व विचार या प्रथमवयांत प्रत्येक संस्कृतीनें निर्माण केले आहेत. मग कालांतरानें त्यांना जडरूप आलें. यमनियमांच्या कैचींत सत्ताधाऱ्यानीं त्यांना बसविलें आणि त्यांच्यांतील जीवतत्त्व नष्ट होऊन सांगाडा उरला. रशियाच्या मार्क्सवादी संस्कृतीचा सध्यां तर आरंभकाल आहे. अजून तिला चाळीस वर्षेंहि झाली नाहींत. तोंच तिला तेथील दंण्डराजांनीं खोड्यांत घालून टाकली आहे. या कालावधीचा बिचार केला तर काय दिसेल? इतर जगाशीं तुलना राहोच, पण झारच्या अनियंत्रित कारकीर्दीतील सस्कृतीच्या तुलनेला तरी ती येईल काय? अलेक्झँडर पुष्किन्, डोस्टोव्हस्की, टॉल्स्टॉय, गॉर्की यांसारखे वाचस्पति त्या पहिल्या सस्कृतीनें निर्माण केले होते. क्रोपोट्किन्, पॉव्हलाव्ह यांसारख्या शास्त्रज्ञांना जन्म दिला होता. बाकुनिन, लेनिन यांसारखे क्रांतिकारक तिनें जगाला दिले होते. या नव्या संस्कृतीनें यांच्या तोलाचा एक तरी थोर पुरुष निमार्ण केला आहे काय? या संस्कृतीला जन्माला येऊन चाळीसच वर्षें झालीं आहेत हें खरें, पण येवढ्यांतच तिला जडरूप आल्यामुळें हा प्रश्न उद्भवतो.

वर जी माहिती दिली आहे तिच्या आधारें वाचकांनीं त्या संस्कृतीचें स्वरूप व तिचें भवितव्य याविषयीं स्वतःच निर्णय करावा.

सप्टेंबर १९५३.

---

